# अनगड मोती

लेखक

नरहर विष्णु गाडगीळ




किंमत दोन रुपये.

**श्री. न. वि. ऊर्फ काकासाहेब गाडगीळ**
**यांचे सर्वमान्य ग्रंथ**

१ : ग्यानबाचें अर्थशास्त्र
२ : कायदेमंडळांतील सहा वर्षे
३ : राज्यशास्त्र विचार
४ : राज्यव्यवहार विचार
५ : राज्यकारभार विचार
६ : सभाशास्त्र
७ : हिंदी अंदाजपत्रकें : १
८ : घटना प्रबोधिनी
९ : अनगड मोती
१० : सालगुदस्त
११ : विधिविचार (छापत आहे)

प्रथमावृत्ति : डिसेंबर १९५५

मुद्रक व प्रकाशक : दामोदर त्र्यंबक जोशी, बी. ए. (टिळक)
व्यवस्थापक, चित्रशाळा प्रेस, १०२६ सदाशिव, पुणें शहर.

प्रवास केल्यानें मनुष्य अनुभवी होतो, त्याला शास्त्रग्रंथ विलोकन करण्याची संधि मिळते, पंडित-सभेंत प्रवेश मिळतो असें सुभाषित म्हणतें. तसेंच मनुष्याच्या अंगीं त्यामुळें चातुर्य येतें, अशीहि ग्वाही पुन्हा सुभाषित देतें. आणि त्यांतल्या त्यांत तीर्थानिमित्त झालेला प्रवास पुण्य पण संपादन करून देतो असा अनुभव आहे. परंतु प्रवासाला निघून प्रवास न करतां, तीर्थासाठीं निघून तीर्थास न जातां प्रसाद मिळाल्याचीं उदाहरणें क्वचितच सांपडतील; आणि हा अद्वितीय अनुभव मला लाभण्याचें भाग्य मिळालें, असा तो प्रसंग मी आज माझ्या स्मरणशक्तीला विश्वासांत घेऊन सांगत आहें.

आणि प्रवासाचें ध्येय कांहीं साधेंसुधें नव्हतें. लहानसहान तीर्थे नव्हतें, बारीकसारीक पुण्यसलीला नव्हती,—तर या प्राचीन देशाला सृष्टिनिर्मितीपासून ललामभूत झालेला नगराज हिमालय हें माझ्या प्रवासाचें ध्येय होतें. जर प्रवासांत चूक झाली असें कोणी म्हणेल तर तीहि सामान्य नव्हती, तीहि हिमालयाएवढी प्रचंड होती. आणि एवढ्या प्रचंड चुका करण्याचा अधिकार प्रौढपणीं नेतृत्व प्राप्त झाल्यानंतर मिळतो, तो मीं बालवयांत शालेय जीवनांत मिळविला. यावरूनच माझ्या भावी मोठेपणाचे पाय शालेय पाळण्यांत दिसले असेंहि इतिहास-संशोधकाला लिहितां येईल !

सन १९०६ सालची गोष्ट आहे. अस्मादिकांचें वय त्या वेळीं दहा वर्षांचें होतें. इंग्रजी शाळेंत प्रवेश केलेला होता. तथापि पुण्यांतल्या वातावरणांत बौद्धिक वाढ झपाट्यानें होते असें म्हणतात, आणि तो अनुभव मीं व माझ्या बालमित्रांनीं खरा करून दाखविला. आमचें दुर्दैव एवढेंच, आमच्या वडीलजनांना त्यांत मूर्खपणा वाटला. तथापि आमच्यासारखे कोणी समानधर्मी निरवधी असलेल्या कालांत उत्पन्न होतील अशी आशा धरून आतांपर्यंत आम्ही होतों. तथापि अजूनपर्यंत तसें झालें नाहीं, म्हणून स्वतंत्र हिंदुस्थानच्या भावी पिढीसाठीं हा अनुभव ग्रथित करून त्यास अजरामर करावयाचें आज मीं ठरविलें आहे.

पुण्यांतील मुलांच्या बुद्धीची वाढ व्हावी म्हणून त्याहि वेळीं पुण्यांतील नेते व वृत्तपत्रें ज्ञानसत्र अखंड चालू ठेवीत होतीं. न समजणाऱ्या विषयांवर बोलणें ही जशी साधारण गोष्ट त्या वेळीं होती,–व हळूच सांगतों, कदाचित् आजहि ती असेल,—त्याप्रमाणेंच न समजणाऱ्या विषयाच्या व्याख्यानास हजर राहणें व विनोदपूर्ण प्रश्न विचारणें ही परंपरा पुण्यांत आबालवृद्धांत तेव्हांपासूनच आहे. दर दिवशीं तिथि, त्याप्रमाणें दर दिवशीं व्याख्यान असा तो काल होता. देशभर तुफान चळवळीची लाट उसळली होती. जनमनाचा ओघ स्वातंत्र्याच्या विचाराकडे व विवेचनेकडे वहात होता. कोणी बंड करावें म्हणून अंधाऱ्या तिसऱ्या मजल्यावर नेऊन आम्हां लहान मुलांना क्रान्तिकारक बनविण्याचा प्रयत्न करीत होते. कांहीं आमच्या दंडांना लाल चिंध्या बांधून निरोधनाचे सैनिक बनवीत होते. कांहीं भाविक व सात्त्विक श्री ॐकारेश्वराला नदींतून घागरीवर घागरी भरून आणून स्वराज्यप्राप्तीसाठीं हें पुण्यकृत्य करण्यास उत्तेजन देत होते. कांहीं वर्तमान-पत्रांतून तपोमार्गाचा पुरस्कार करण्यांत येत होता. गुप्त मार्गापासून प्रकट सभेपर्यंत, शस्त्रास्त्रापासून शान्तिमय तपश्चर्येपर्यंत अनेक साधनांचा पुरस्कार करणारे आपापले कबिले तयार करीत होते. कथाकीर्तनें वेदान्ताऐवजीं देहान्त करण्याचा गानिमी पद्धतीनें उपदेश करीत होतीं. आमच्या दहाबारा मित्र-मंडळीवर या सर्व गोष्टींचा एक विशिष्ट पण विकृत नव्हे असा परिणाम होत होता.

त्या वयांत व त्या काळीं लंगोटी नेसून नदीवर स्नानास जाणें, नदींत डुबक्या मारणें ही गोष्ट मामुली बाब होती. पुराणांतून व 'मुमुक्षु'सारख्या वर्तमानपत्रांतून भक्तिमार्गाचा जो कांहीं प्रचार होत होता, त्याचा विलक्षण परिणाम माझ्या मनावर झाला; आणि आमच्यापुढें लंगोटी नेसलेली ती ध्रुवाची मूर्ति हळूहळू कायम स्थान धरूं लागली. चित्र आणि प्रेक्षक आत्यं-तिक निरीक्षणानें तादात्म्य पावतात असें म्हणतात, तसेंच आमचें झालें. पाहतां पाहतां, विचार करतां करतां आपण ध्रुव व्हावें अशी आमच्या मित्रमंडळींत उत्पन्न झालेली प्रेरणा कार्यान्वित होण्याच्या मार्गास लागली. प्रेरणेचें पहिलें परिवर्तन एतद्विषयक विचारांत झालें. विचारानें प्रयत्नांचें बाळसें धरलें, व प्रत्यक्ष कृतीपर्यंत सर्व सिद्धता झाली. आम्हीं सहा सात मंडळींनीं विद्यमान कॉंग्रेसच्या कार्यकारिणीच्या सभेप्रमाणें अनेक दिवस

विचार करून निर्णय घेतला. तथापि त्याहि वयांत आम्ही इतके दक्ष होतों कीं हें निवेदन जाहीर केलें नाहीं, अगर आमच्या 'गुफ्तगू'त कोणीहि पंचमस्तंभी येऊं दिला नाहीं. आणि हे आमचे बेत निरनिराळ्या स्थळांत बनत गेले. आम्ही सात आठ जणांनीं ध्रुवाप्रमाणें या परदास्य-शृंखलेंत पडलेल्या देशासाठीं तपश्चर्या करण्याचें ठरविलें. आणि हें तप करण्यास उत्कृष्ट स्थान म्हणून हिमालयांत जाण्याची आमची योजना सिद्ध झाली.

हिमालयांत नद्या कशा असतील याची कल्पना पुण्यांतील मुळा–मुठा पाहून आम्ही करूं लागलों. त्या प्रदेशांत असणारी वनशोभा कशी असेल याची कल्पना त्या वेळीं विशेष प्रसिद्ध असलेल्या बुधवार बागेंतील लता-वृक्षांवरून करूं लागलों. दररोज एकदां तरी आम्ही त्या बागेंत जात असूं; तींत असलेल्या मंडपांत बसत असूं. त्याच बागेंतील एका कोपऱ्यांत धुमी लावून बसलेल्या साधूकडे पाहून, त्याचे ते दीर्घ केस लक्षांत घेऊन, आम्ही कालान्तरानें कसे होऊं याचें आमच्यापुढें "मॉडेल" तयार करीत होतों. आणि कांहीं दिवसांत आमची योजना नक्की झाली. हिमालय ठरला, हिमालय हें निवासस्थान ठरलें; तपोमार्ग हें साधन ठरलें,–आणि आमची निघण्याची तयारी झाली.

हिमालयाकडे जाणारा रस्ता पुण्याहून नकाशांत तरी सरळ जातो,–आणि सरळ गेलों असतां आमच्या पालकांस सांपडूं,–म्हणून पुण्याहून भोर, आणि भोरहून तसे हिमालयाकडे जाण्याचा आमचा मनसुबा ठरला. नकाशांत भोरहून उत्तरेकडे जाण्यास मार्ग दिसत नव्हता, पण आमच्यापैकीं एका विद्वान् मित्रानें चटकन् खिशांतून पेन्सिल काढून भोरहून बद्रीकेदार-पर्यंत रेघ ओढली आणि मार्ग करून दिला. आणि त्याच्या या हुशारीबद्दल आम्हीं त्याला जवळजवळ पुढारी करण्याचें ठरविलें. आज तो कोठें आहे माहीत नाहीं, पण आज हिंदुस्थानवर आलेल्या या संकटकाळीं पाकिस्तान-विरुद्ध चढाई झाल्यास निश्चित तो यशस्वी होईल!! बरोबर काय काय घ्यावयाचें हेंहि ठरलें. कोणीं किती तांदूळ घ्यावयाचे, किती कपडे घ्यावयाचे तेंहि ठरलें. कोणीं कोणत्या मार्गानें कोठल्या संकेतस्थळीं यावयाचें याचा 'प्लॅन' ठरला. अर्चनासाठीं प्रत्येकानें आपापले देव आणावे असें ठरलें. आणि या दृष्टीनें मीं आमच्या देवघरांत अगदीं गुप्तपणें संचार करून, तेथें

असलेला नंदादीप मालवून पटकन् हाताला जो लागला तो देव घेतला. आणि तो नर्मदेंतील काळा कुळकुळीत शाळिग्राम होता! पण त्याची मौलिकता मला इतकी वाटली कीं, हा जगत्चालकच माझ्या हातांत आला असें समजून व्यवस्थित रीतीनें त्याला घेऊन – जसा कांहीं नेहमीं खेळण्यासाठीं बाहेर पडतों तसा मी 'घराबाहेर' पडलों!! आमच्यापैकीं कांहीं जणांनीं एकमेकांच्या मदतीनें खिडक्यांतून बिछाने अलद सोडून सर्व व्यवस्था आगाऊ केली होती. ध्रुवाप्रमाणें तपश्चर्येसाठीं निघालेले आम्ही शेखसल्ल्याच्या घाटावर एकत्र झालों.

सकाळीं नऊ – साडेनऊची वेळ होती. रामनवमी होऊन एकदोन दिवस झाले होते. तुळशीदासानें म्हटल्याप्रमाणें " पुनीत असा मधुमास " होता. घाटावर स्त्रिया कोणी स्नान करीत होत्या, कोणी कपडे धूत होत्या; संसारांतील सुखदुःखाच्या गोष्टी करीत होत्या. आमच्याकडे त्यांचें लक्ष होतें असें नव्हे, पण प्रत्येक व्यक्ति आमच्याकडे पाहून बोलत आहे, आम्हांला उद्देशून खुणा करीत आहे असें वाटत होतें. योजनेप्रमाणें एकाशिवाय आम्ही सर्व गोळा झालों. एकाची कांहीं वेळ वाट पाहिली,—पण असें कळलें कीं, त्याची नुकतीच मुंज झाली होती, म्हणून त्याच्या मनानें एवढ्यांत तपश्चर्येस जाऊं नये असें घेतलें होतें. थोडा विचारविनिमय झाला. कोणी म्हणाला, 'हें कांहीं बरें झालें नाहीं.' दुसरा म्हणाला कीं, 'आपण आपली योजना स्थगित करूं या.' आणखी एक म्हणाला कीं, 'कांहीं नाहीं,—आपण जेवढे आहों तेवढे जाऊं या. जे येतील ते आपले.' जे येतील त्यांना घेऊन, न येतील त्यांना सोडून, जे पुढेंमागें विरोध करतील त्यांना बाजूला सारून आपण गेलेंच पाहिजे,—असें त्याचें मत पडलें. मी म्हणालों, प्रवासाला सुरुवात तर करूं या, मग पाहूं काय होतें तें.—आणि आमच्या महान् यात्रेला सुरुवात झाली.

अर्ध्या तासाच्या आंत आम्ही सहा लहान मुलें भोरच्या मुख्य रस्त्याला लागलों. क्षणाक्षणाला आम्ही पुणें शहर मागें टाकीत होतों. चालतांना कसा आश्रम बांधावयाचा, कसा सजवायचा, कोणीं काय कामें करावयाचीं यासंबंधीं चर्चा करीत होतों. त्या वेळीं हल्लींसारखी मोटर वाहतूक तेथें नस. तथापि प्रथम जेव्हां मोटरीचा आवाज कानीं आला त्या वेळीं आम्ही

पटकन् आसपासच्यां झुडुपाच्या मागें जाऊन — जें प्रात्यक्षिक अनेक लोकांनीं मागील युद्धाच्या वेळीं केलें तें केलें. पुणें शहरांत त्या वेळीं हाताच्या बोटावर मोजण्याइतक्याच मोटरी होत्या. आणि त्यांत एक आमच्या श्रीमंत आप्ताच्या मालकीची होती. एरवीं अभिमान वाटणारी ही गोष्ट त्या वेळीं मला धोक्याची वाटत होती. कदाचित् आम्ही घरांत सांपडत नव्हतों म्हणून मोटरींतून शोधण्यास तर हे आप्त आले नाहींत ना — अशी शंका घेऊनच आम्ही झुडुपाकडे पळालों होतों. वास्तविक हा रहदारीचा रस्ता आम्हीं घ्यावयास नको होता असें एकानें प्रतिपादिलें. वास्तविक सामान्य जनापेक्षां आम्ही कांहीं तरी निराळें करीत होतों; व कांहीं तरी तसेंच असामान्य, मार्गाच्याहि दृष्टीनें, आम्हीं पहावयास पाहिजे होतें. या विचारांतील व्यवहार व विसंगती ही सहज लक्षांत येण्यासारखी होती. तथापि मोटर पुढें गेली, आणि रंगावरून ती माझ्या आप्ताची नव्हती हेंहि कळलें. त्याबरोबर भूमिगत झालेलों आम्ही प्रकट झालों ! !

आमचें मार्गक्रमण पुन्हा सुरू झालें. कात्रज घाटाच्या चढणीला लागलों तों इंजिनीयरिंग खात्यांतील एक गृहस्थ सायकलवरून येतांना दिसले, व थोडे ओळखीचे वाटले. तथापि अगदीं अट्टल व तरबेज बहुरूप्याप्रमाणें हंसत खिदळत त्यांना शंकेला जागा न देतां आम्ही पुढें सरकलों. मधून मधून भेटणारे शेतकरी, मोळीवाले — भेटत. आणि त्यांपैकीं एकानें, तुम्ही लहान लहान मुलें कोठें निघालां असेंहि विचारलें. आम्ही भोरला परत जात आहोंत असें सांगितलें; कारण हा प्रश्न मार्गावर अनेक विचारतील, त्याची कल्पना करून उत्तराची योजना केली होती. व त्यांतून उत्पन्न होणाऱ्या उपप्रश्नांनाहि कसलेल्या चिटणिसाप्रमाणें उत्तरें आगाऊ योजून ठेवलीं होतीं. आणि पुण्यास कशास गेलां होतां असें विचारतांच, "रामनवमीसाठीं—" हें आगाऊ निश्चित केलेलें उत्तर देण्यांत आलें. "अरे, रामनवमीला तर भोरला मोठा उत्सव असतो—" आणि हा उपप्रश्न आमच्या योजनाबद्ध व्यवहारांत नव्हता. किंबहुना भोरला रामनवमीचा मोठा मान्यवंत उत्सव होतो हेंहि प्रथम तेव्हांच कळलें. पण हें ज्ञान त्या क्षणाला तरी सामर्थ्य ठरण्याऐवजीं संकट ठरलें, आणि संकटांत बुद्धिहत झालेला मनुष्य ज्याप्रमाणें आपल्या पायाला पराक्रमाची संधि देतो तोच इतिहासप्रसिद्ध मार्ग आम्हीं चोखाळला, व कांहीं तरी पुटपुटत झपाट्यानें पुढें निघून गेलों. आमचें

नशीब कीं ते विचारणारे भोळेभाबडे शेतकरी होते. नाहीं तर कोणी शिकलेला असता तर अधिक प्रकार त्यानें केला असता. आमचा यात्रेकरूंचा काफिला आणखी पुढें गेला.

आणि आतां सूर्य डोक्यावर आला होता. न जेवतां निघालेलों आम्ही भुकेनें व्याकुळ व्हावयास लागलों होतों. आम्हीं धान्य बरोबर घेतलें होतें, पण शिजवलेले पदार्थ घेणें शक्य नव्हतें; – कारण ताबडतोब आमच्या योजनेची वाच्यता झाली असती. आसपासच्या खेडेगांवांतील बाया – बाजाराला निघालेल्या – चालल्या होत्या. त्यांनींहि आमची विचारपूस केली, आणि तुम्ही एवढे "लहानगे लहानगे" कोण व कुठें निघालां असें विचारलें. जवळ जवळ यक्षप्रश्नावलि सुरू केली, आणि आमच्यापैकीं कोण कोणाचा असा एकीनें प्रश्न करतांच "आम्ही सर्व भाऊ भाऊ पुण्यांतील बहिणीकडे चार दिवस गेलों होतों" असें उत्तर दिलें. बिचाऱ्या बायका आमच्याकडे निरखून पाहूं लागल्या. भावांभावांमध्यें कांहीं साम्य असतें इतकेंहि ज्ञान आमच्यांपैकीं कांहीं जणांना खात्रीनें नव्हतें हें उघड होतें. एक देशस्थी काळा, एक चित्पावनी गोरा, तिसरा किंचित् भुरका, चौथा निमगोरा, आणि नाकाच्या बाबतींत तर मानवी वंशांतील सर्व तऱ्हा तेथें प्रतिनिधित्व पावल्या होत्या. तथापि-जानपदललना पुष्कळच गोष्टींत अनभिज्ञ असतात, अधिक चौकस नसतात; आणि स्वतःचें काम टाकून सार्वजनिक बाबतींत लक्ष घालण्याइतकें उत्कट देशप्रेमहि त्यांच्यांत नसतें ही भाग्याची गोष्ट आहे. म्हणून या चौकशींतून व चमत्कारिक परिस्थितींतून आम्ही पुढें गेलों.

आतां सूर्य अस्ताला जाऊं लागला; पण पोटांतील क्षुधा नुसती उदयच पावली होती असें नव्हे, तर अधिकाधिक वाढत होती. आणि आतां शिवापूर बागेच्या जवळ आम्ही येऊन पोहोंचलों. जवळच असलेल्या पोलिस-गेटावरून आम्ही जात होतों. पोलिसाची नजर साहजिकच आमच्यावर होती, पण त्यानें विशेष कर्तव्यदक्षता न दाखविल्यामुळें आम्हांस थांबावें लागलें नाहीं. आणि तेथून थोड्याच अंतरावर असलेल्या एका पडक्या आणि– एवढें सांगितल्यावर ती लोकलबोर्डी धर्मशाळा होती हें सांगण्याचें कारण नाहीं, – सोपेवजा इमारतींत जाऊन मुक्काम ठोकला. आतां भोजनाच्या

प्रबंधाची चिंता सुरू झाली, आणि आम्हीं आमच्या योजनेप्रमाणें रानांतील काटक्या गोळा करून अक्षरशः तीन दगड मांडून अग्नि पेटविला. पाणी पिण्यासाठीं म्हणून बरोबर निघतांना प्रत्येकानें भांडें घेतलें होतें. विधायक कार्यासाठीं म्हणून तपेलीहि घेतली होती. परंतु स्वयंपाकाला कांहीं अन्य पात्रें लागतात हें आमच्या लक्षांत न आल्यामुळें म्हणा — ती आमच्याजवळ नव्हतीं. चूल तयार होती, अग्नि प्रदीप्त झाला होता, आणि तांदूळ आम्हीं पिशवींतून बाहेर पण काढले होते. पण आतां मात्र भात कशांत शिजवायचा हा पेंचप्रसंग आमच्यापुढें उभा राहिला होता. पण तेवढ्यांत महाभारतांतील कथा अनेक वेळां ऐकल्याकारणानें पांडवांनी वनवासांत पानाचे द्रोण करून अन्न शिजवल्याचें आमच्यांपैकीं एकाच्या लक्षांत आलें. जवळच्या वडाच्या झाडाचीं पानें काढून चोयांच्या अभावीं शेजारच्या शेताच्या कुंपणाचे कांटे लावून सरासरी शेरभर तांदूळ मावतील येवढा द्रोण तयार केला, व त्यांत तांदूळ व पाणी घालून अन्न सिद्ध करण्याच्या प्रयोगास सुरुवात झाली. सुमारें वीस एक मिनिटांनी जें रसायन निर्माण झालें, तें एवढें थोडें होतें कीं, कोणास द्यावें हाच प्रश्न निर्माण झाला, व तो सोडविणें भाग पडलें. एक तीळ सातांनीं खावा — ही समाजवादी दृष्टि तेथें नव्हती असें नव्हे, तथापि आम्ही सर्व बंधु नसलों तरी सर्वांत धाकटा त्यास द्यावें ही आमची हिंदु संस्कृति तेथें प्रभावी ठरली; आणि तो भात आम्हीं आमच्यांतील सर्वांत लहान 'आप्पू' यास दिला. तो किती शिजला होता हें त्याचें त्यास माहीत. आम्हीं बाकी सर्वांनी ओढ्यांतील पाण्यावर व तेथें विकत घेतलेल्या काकड्या खाऊनच गुजारा केला. रात्रीं नऊ वाजता अगदीं आश्रमवासीयां-प्रमाणें एकत्र बसून प्रार्थना केली.

आणि थोड्याच वेळांत आम्ही घोंगड्या पसरून त्यावर पडलों. कांहीं क्षणच गेले, तों अच्युत रडूं लागला,—व "माझी ताई काय म्हणेल" म्हणून विव्हळूं लागला. त्याच्या मागून दोनचार मिनिटांत दुसरा विव्हळूं लागला, आणि अवघ्या पंधरा मिनिटांत अस्मादिकांशिवाय सर्व परत जाण्याची भाषा बोलूं लागले. बारा मैल चालून त्यांच्याप्रमाणें मीहि थकलों होतों; व माझ्या मनांत त्यांच्या विव्हळण्यानें परत जाण्याचे विचार आले नाहींत असें नाहीं, पण थकल्यामुळें झोंप अधिक प्रभाव करूं पहात होती, व अधिक विव्हळणें झालें नसतें तर ती यशस्वीहि झाली असती. आम्ही आपापल्या घोंगड्यां-

वरून उठून बसलों. कोणी कांहीं बोलूं लागला. 'चलो हिमालय' ही घोषणा निःस्तब्ध झाली. 'चलो घर' या घोषणेस हलक्या आवाजांत सुरुवात होऊन झपाट्यानें झंझावात पसरावा त्याप्रमाणें वाढूं लागली. रडण्याची संवयच नसल्यामुळें हंसण्याशिवाय गत्यंतरच माझ्या ग्रावतींत नव्हतें. पुष्कळ सांगून पाहिलें. जेवढ्या कांहीं मोठमोठ्यांच्या गोष्टी ऐकल्या होत्या त्या सांगून पाहिल्या. हिमालयाचीं शिखरें, त्या सुंदर नद्या, ती वनशोभा, तो आश्रम, ती तपश्चर्या, डोक्यावर वाढलेले केस व ऋषिमुनीप्रमाणें दिसणारें तें स्वरूप, कट्टयावर आसनमांडी घालून बसलेल्या ध्रुवाचें तें चित्र – सर्व कांहीं त्यांच्या-पुढें सांगून पाहिलें. तथापि त्यांचीं मनें ओढाळ गुराप्रमाणें पुण्यांतील घाणेरड्या घरांकडे धांव घेऊं लागलीं, आणि तें आवरणें आतां कठीण झालें. "जायचेंच झालें तर उद्यां जाऊं या. आतां आपण थकलों आहोंत, पुन्हा बारा मैलांचा प्रवास ताबडतोब करणें कठीण आहे. बैलगाडीनें जायचें म्हटलें तर बैलगाड्या भेटल्या पाहिजेत,–आणि त्यांना द्यायचें काय?" तथापि आतां कोणी धर धरीना. हे सगळे निश्चयाचे महामेरु ध्रुवपद प्राप्त करण्यासाठीं निघालेले ढळूं लागले, आणि कांहीं विचारविनिमय करून निर्णय घेण्यापूर्वीच वहुतेकांनीं आपल्या बोंगड्या गुंडाळून पुण्याला अभिमुख होऊन पाऊल टाकण्यास सुरुवात केली. आतां चढाई करावयाची नव्हती, घरताई करायची होती; आणि रात्रीं दहाच्या सुमारास आम्ही हीं सहा बालकें हिमालयाऐवजीं पुण्याकडे चालूं लागलों!

कित्येक मैलपर्यंत आम्हांला कोणीच भेटलें नाहीं. अंधार नव्हता; चंद्रप्रकाशच होता. परत निघतांना परत निघायचें यापेक्षां अधिक विचार नव्हता. आपल्याला रस्त्यावर कोणी विचारील अगर हल्ला करील अशीहि शंका आली नाहीं. आणि आमचा हा परतीचा प्रवास सुरू झाला. आमच्यांतील अगदीं लहान असलेलीं थकलीं, व त्यांना तसेंच पुढें नेणें शक्य नव्हतें. परतीची योजनाच आमची नव्हती. परतीच्या योजनेंत काय करावयाचें हें ठरलेलें नव्हतें. शहाणा सेनापति जय मिळाल्यास काय करा-वयाचें व पराभव झाल्यास कसें वागावयाचें अशी दुहेरी योजना करतो. पण आम्ही तसेंच निघालों होतों, पराभवाचा व परतीचा मार्ग आम्हीं योजला नव्हता व अनुभवलाहि नव्हता. तथापि अनुभव हा योजना नसतांनाच अधिक शिक्षणप्रद होतो हेंच खरें.

थोड्या वेळानें पुण्याकडे जाणाऱ्या कांहीं बैलगाड्या आल्या, आणि गाडीवानानें एक स्वारी घेण्याचें कबूल केलें. पण दोन रुपये मागितले. आम्ही प्रवासास निघण्यापूर्वी, माझे वडील नुकतेच पुण्यास येऊन रजा संपल्यामुळें माळव्याला परतले होते, व जातांना त्यांनीं खाऊसाठीं दिलेले पैसे अस्मादिकांजवळ होते. इतरांच्याजवळ काय होतें हें माहीत नव्हतें. आणि मी आपले दोन रुपये सदरहू गाडीवानाला देऊन आप्पूला गाडींत बसवलें. रात्रभर प्रवास करून सुमारें सात साडेसातच्या सुमारास आमची सहांची सेना पुण्यनगरीच्या सरहद्दीजवळ आली. आणि तेथून आम्हीं एकत्र न जाण्याचें ठरविलें. ज्यानें त्यानें स्वतंत्र व्हावें असा मनसुबा करून आम्ही विस्कळित झालों.

आणि त्या सरहद्दीपासून शनवारांत घरीं येईपर्यंत घरचे लोक आपल्याला काय म्हणतील, आपला सत्कार कसा होईल याचा विचार करूं लागलों. आणि माझें दुर्दैव असें कीं, घरांत पाऊल टाकतांच अन्य मुलांचे नातेवाईकहि आमच्या चुलत्याकडे शोध घेण्यासाठीं आलेले दिसले. सुरुवातीला—पटकन् घरांत शिरून तिसऱ्या मजल्यावर जाऊन बसावें व हळूहळू आपल्या गुणानें प्रकट व्हावें असा बेत होता. पण मनानें चिंतिलेलें अन्य माणसांनीं निकालांत लावलें. तेथें जमलेला जनसंमर्द पाहून मागें पळणें शक्य नव्हतें. पुढें जाणेंहि अशक्य होतें. भोंवतालीं जमलेल्या लोकांच्या अर्थगर्भ डोळ्यांकडे पाहून, त्यांच्या चमत्कारिक चेहऱ्यांकडे पाहून, बरा गुलाम सांपडला, याला आज ठोकला पाहिजे,—असे विचार मला स्पष्ट दिसत होते. चहूं बाजूंनीं घेरलेल्या सैन्याप्रमाणें माझी स्थिति झाली. घायाळ झालेल्या वाघाप्रमाणें मी पुढेंमागें पहात होतों,—आणि एकानें मला उलट तपासणीवजा प्रश्न विचारण्यास सुरुवात केली. त्याच्यामागून दुसरा, त्याच्यामागून तिसरा—अशी सुरुवात झाली. तथापि "सर्व आले आहेत" हें सांगण्यापलीकडे मी बोललों नाहीं.

माझे चुलते समोर उभे होते. ते कांहीं बोलले नाहींत, पण बाहेरील मंडळी गेल्यावर त्यांनीं मला हाताला धरून खांबाजवळ उभें केलें, व घरांत बांधकाम चाललें होतें त्यानिमित्त जवळपास पडलेल्या काठ्यांपैकीं एक उचलून घेऊन,—आतां आठवत नाहीं किती फटके मारले, पण एकापेक्षां अधिक

मारले एवढी स्मृति ताजी आहे. त्यांत्यांतून नरसिंह निघतो असें ऐकलें होतें. पण प्रत्यक्ष नरसिंह त्यांत्रासमोर दिसत होता, आणि त्यांत्राशेजारीं मात्र प्रल्हादाप्रमाणें मी उभा होतों. पुराणांतील क्रम बदलला होता. येथें प्रल्हाद मार खात होता, पण शान्त होता. थोड्याच वेळांत अस्मादिकांना वर जाण्यास सांगण्यांत आलें, आणि या महान् घटनेवर पडदा पाडल्यासारखें झालें.

हिमालयासाठीं निघालेला यात्रेकरू पुन्हा पुण्यांतच राहिला; ध्रुवपदाची आकांक्षा धरणारा धांवत पळत परत आला. तपासाठीं गेलेला मारामुळें ताप घेऊन आजारी पडला. अशी ही अस्मादिकांच्या हिमालयाच्या यात्रेची कहाणी आहे.

आणि झालें एवढें पुरें नव्हतें कीं काय – म्हणून दुसऱ्या दिवशीं वर्गांत गेल्यावर आमच्या शिक्षकानें "हे पळपुटे बाजीराव आले" असें स्वागत करून एक दिवस शाळा बुडविल्याबद्दल दोन छड्या मारून शिस्तपालनाचा आपला लौकिक वाढवला; पण जें घडलें तें सर्वस्वीं फुकट मात्र गेलें नाहीं. चढाईंत व परताईंत आलेले अनुभव पुढील आयुष्यांत फार उपयोगी पडले असें म्हटलें तर माझी मित्रमंडळी खासच सहमत होतील. हिमालयाचें दर्शन झालें नसलें तरी अनुभवाचें पुण्य पदरीं पडलें ही कांहीं लहान गोष्ट नव्हे असें मी समजतों.

दीपावलि, १९४७.



# २ : इनामदारांची घोडी

. . . . . . . . . .

कित्येक घटना तशा पाहिल्या तर अगदीं साध्या; पण त्यांतील अर्थ व त्यांचा परिणाम गहन व दीर्घकालीन असतो. तो अर्थ व परिणाम त्या क्षणीं कळतोच असें नाहीं, तथापि हळूहळू स्थायी रीतीनें त्यांचा परिणाम व्यक्तीच्या जीवनावर होत असतो. असें म्हणतात कीं, ज्या स्वरूपाचें अन्न त्या स्वरूपाचा देह; इतकेंच नव्हे,—तर विचारावरहि त्याचा परिणाम होतो. कळत–नकळत घटनेची पार्श्वभूमि, ती होत असतांचे क्षण, व प्रसंगीं तीसंबंधीं केलेलें सिंहावलोकन, या सर्व गोष्टी ज्याप्रमाणें एखाद्या वस्त्रांत तंतु भरावे त्याप्रमाणें वैयक्तिक व सामाजिक जीवनांतहि प्रभाव करतात. अशाच स्वरूपाची एक घटना जी माझ्या आयुष्यांत घडली तिचें रहस्य मी वाचकांना सांगणार आहें. ज्या काळांत घडली तो काळ सुमारें चाळीस वर्षांपूर्वीचा आहे. दरसाल जसें नवरात्र, त्याचप्रमाणें पुण्याला दरसाल प्लेग ठेवलेला होता! इतरांना प्लेगची भीति, घरांतील माणसांना कोठें जावें याची विवंचना. आम्हां मुलांना मात्र प्लेग म्हणजे शाळेला सुट्टी, व झोपडींत किंवा आजोळच्या गांवीं मनमुराद खेळण्याची संधि असेंच वाटत होतें. ज्या सालचा उल्लेख मी आतां करीत आहें त्या काळीं दिवाळीच्या सुमारास आम्ही आजोळच्या गांवीं म्हणजे भीमातीरीं सिद्धटेकक्षेत्रीं प्लेगनिमित्त गेलों होतों. सिद्धटेक हें एक अष्ट-विनायकांपैकीं स्थान आहे. भीमेच्या कांठीं टेकडीवर श्रीगणपतीचें मंदिर असून देऊळवाडा व कांहीं घरें टेकडीवर आहेत. गांवचा बाकीचा भाग टेकडीच्या पायथ्याशीं वसला आहे. फरसबंदीच्या शेवटीं प्रचंड वेस असून त्यावर अष्टौप्रहर चालणारा नगारखाना आहे. असें सांगतात कीं, हरिपंततात्या फडके यांनीं बदामीचा किल्ला सर होईना म्हणून सिद्धटेकच्या गणपतीला नवस केला, कीं किल्ला सर झाल्यास किल्ल्याची वेस मोडून आणून सिद्धटेकला बांधीन. व त्याप्रमाणें त्यांनीं केलें याची साक्ष ही गांवची प्रचंड व उंच वेस देत आहे. हरिपंततात्या फडके यांचा जन्म सिद्धटेक येथें झाला असा इतिहास आहे. पुत्रप्राप्तीसाठीं त्यांच्या

मातापितरांनीं दृढ श्रद्धेनें दूर्वांचा रस पिऊन तपाचरण केलें, व श्रीगणपतीनें त्यांना दृष्टान्त देऊन 'तुझ्या पोटीं सदाविजयी असा पुत्र जन्मास येईल' असा आशीर्वाद दिला. हें पुत्ररत्न म्हणजे हरिपंत फडके होत. महाराष्ट्राच्या इतिहासांत ते अखंड विजयी सेनानी म्हणूनच गाजले. आज त्यांची तेथील वास्तु किल्लेवजा असलेली नष्ट झालेली आहे. त्यांचे वंशज अन्य मोठ्या पुरुषांच्या वंशजांप्रमाणें कालक्रमण करीत आहेत एवढें सांगितलें म्हणजे पुरे. तात्पर्य, निसर्गानें सिद्धटेक रमणीय केलें आहे, इतिहासानें त्याला प्रतिष्ठा व परंपरा दिली आहे. पण हा गांव एतद्विषयक संकटापासून अलिप्त राहिला. गांवचे इनामदार आहेत, व अस्मादिकांचें मातृघराणें मोकासदार आहे. एक पंडितांचें घराणें,–विशेषतः ज्योतिषांचें घराणें म्हणून आमच्या आजोळची प्रसिद्धि त्या गांवांत आहे. तथापि त्यांचीं भविष्यें खरीं ठरतात कीं नाहीं याबद्दल शंकाच आहे. तथापि त्या घराण्याचा मान पंचक्रोशींत तर आहेच आहे. या सर्व गोष्टींमुळें व खेडेगांवांत इंग्रजी शाळेंत शिकणारीं मुलें आल्यामुळें, विशेषतः पुण्याच्या शाळेंतील मुलें आल्यामुळें आम्हां मुलांचा भाव साहजिकच विशेष होता. मातृहीन असल्यामुळें घरांत, विशेषतः वृद्ध आजीच्या दृष्टीनें आम्ही भलत्याच कौतुकाचें स्थान झालों होतों. आणि सर्व नातवांत मी धाकटा, यामुळें कोठल्याहि गोष्टींत प्रतिबंध वा प्रत्यवाय मला नव्हता. घरांत व घराबाहेर सर्वत्र मी लाडावलेला होतों. व जें करीन तें चांगलेंच, जें बोलेन तें सुभाषित, असाच जणूं दंडक ठरला होता. वाटेल त्याच्या शेतांत जाऊन ताटें तोडावीं, वाटेल त्या पोरांना ठोकावें, व वाटेल त्या मुलींची सहजसुलभ चेष्टा करावी, वाटेल तितकें नदींत डुंबावें – असा माझा कार्यक्रम होता. किंबहुना हरिपंततात्याप्रमाणें त्या वेळच्या जीवनक्षेत्रांत मी अखंडविजयी वीर होतों. आमच्या मामांचीं तीन घोडीं होतीं. एक माकणीचें व दोन इतर. त्यांपैकीं एक आमचे थोरले मामा पंचक्रोशींत अगर आठवड्याच्या बाजारांत जातांना वापरीत, व एक शिलकी उपयोगाचें, असें मानलें जाई. अस्मादिक स्वतःच्या समजुतीप्रमाणें तर नक्कीच, मित्रांच्या समजुतीप्रमाणें साधारणतः, व इतरांच्या समजुतीप्रमाणें थोडासा घोड्यावर बसण्यांत निष्णात होतों. जीन वगैरे घालून बसणें हें मला कमी प्रतीचें वाटे. गळ्यांतील चऱ्हाट अगर 'व्होटळी' घालून घोड्यावर स्वार होणें हें अगदीं नित्यांतलें असे. पाठीवर क्वचितच कांहीं

असे. गरीब बिचारें माकणीचें घोडें कोणींहि दामटावें, त्यावर कोणीहि बसावें अशा कामाचें होतें. घरापासून भीमेच्या पाण्यापर्यंत सुमारें तीन फर्लांगांचें अंतर, शिवाय अगदीं छातीवर येणारी डगर चालून सकाळचे तीन तास काम करून तें थकत असे. तरी पण आम्ही मुलें त्याहि घोड्याला संध्याकाळच्या वेळीं दामटीत असूं. तथापि त्यावर बसण्यांत मला केव्हांहि पराक्रम वाटला नाहीं. मामांचें घोडें हें जरा खट्याळ होतें; इतर मुलें एक तर मामा रागावतील म्हणून, व दुसरें तें खट्याळ म्हणून – त्यावर बसत नसत. अस्मादिक मात्र त्याला संधि मिळेल तेव्हां दामटीत असूं. शिलकी घोडें हें राजकारणांतल्या बिनपक्षाच्या पुढाऱ्यांच्या स्वरूपाचें होतें. गरीब भेटला तर नाठाळपणा करणें, जबरदस्त भेटला तर गरीबीनें चालणें,– अशी त्याची वागणूक होती. त्यालाहि मी स्वारीस घेऊन दामटीत असे; त्याशिवाय संध्याकाळच्या वेळीं गांवांतल्या माळावर किंवा ओढ्याच्या कांठीं चरायला येणारीं गांवांतील घोडीं कमीजास्त प्रमाणांत अस्मादिकांनीं वेळोवेळीं स्वारी करून हाताळलीं होतीं. तथापि सगळ्या गांवांत अत्यंत नाठाळ, कांहींच्या मतें तेजस्वी अशी इनामदाराची घोडी होती. रंगाहि तिचा करडा होता. उंचाहि बरीच होती.आणि खुद्द इनामदाराशिवाय तिच्यावर कोणी बसलेलें पाहिलें नाहीं असा तिचा लौकिक होता. इनामदार जेव्हां तिच्यावर बसून परगांवीं जात, अगर प्रसंगीं तालुक्याच्या गांवीं जात, तेवढ्यापुरतेंच तिला काम असे. अन्य वेळीं ती स्वैरगति व सर्वसंचार अशी गांवस्वामिनी झाली होती. कोणाच्याहि शेतांत जावें, निळवा खावा, कोणाच्याहि दारांत वाळत घातलेलें धान्य खावें अगर विस्कटावें. कोणी जवळपास आल्यास आपला परिणामकारक पादस्पर्श करावा अशी तिची वागणूक होती. आमच्या आजीनें, मामींनीं, किंबहुना घरांतील सर्व मोठ्या माणसांनीं आम्हां सर्वांना तिच्या वाटेस न जाण्याचें बजाविलें होतें. आणि अन्य मुलें या उपदेशाप्रमाणें वागत होतीं. सामान्य जनांप्रमाणें चालणें त्याहि वेळीं मला पटत नव्हतें; आणि माझा भावी चरित्रकार या गोष्टींतून माझ्या पुढील आयुष्यांतील मोठेपणाचें निदान माझ्या मतें बीज होतें असें लिहील ! मुलाचे पाय पाळण्यांतच नव्हे तर सर्वत्र दिसत होते, असेंच त्याला आढळून येईल. ज्या वेळीं लोक निजले असतील त्या वेळीं घराबाहेर पडून हुंबणें; ज्या वेळीं घरांतील माणसें जागीं असतील त्या वेळीं निजणें – अगर निजण्याचें सोंग घेणें, हीं सर्व योग्याचीं

लक्षणें तेव्हांपासूनच दिसून येणारीं आहेत. मोठ्याशीं भांडणें, बरोबरच्यांची हेटाळणी करणें, व लहानांना तुच्छ लेखणें हीं अभिजात पुढाऱ्यांचीं लक्षणें त्याहि वेळीं दृश्यमान होतीं. जें अवघड असेल त्यांत हात घालणें, जेथें संबंध नसेल तेथें तोंड घालणें, जेथें समजत नसेल तेथें अधिकारयुक्त वाणीनें मत देणें, हीं सर्व 'महान्' कार्यकर्त्यांचीं लक्षणें तेव्हांपासूनच माझ्या अंगांत आलीं आहेत !

तात्पर्य, इनामदारांची घोडी ही तिजसंबंधींच्या कीर्तीमुळें माझ्या तत्कालीन जीवनांत एक आवाहन करणारी स्फूर्तिदेवता झाली. दिवसरात्र तिच्यावर कसें व केव्हां बसतां येईल याचा विचार मनांत ठाण मांडून बसला होता. रात्रीं स्वप्नांत मी तिजवर बसून गांवाच्या गर्दींतून जात आहे असें दिसे. दिवसा दूरवर ती असलेली पाहून मन बावरून जात असे. तिला कसें धरावें याचा विचार सारखा मनाला सतावूं लागला. आणि एकदां मनानें एखाद्या गोष्टीची जिद्द घेतली कीं ती पुरी केल्याशिवाय राहावयाचें नाहीं; याला कोणी दुर्गुण म्हणा,— अगर उत्तम जनांनीं हातांत घेतलेलें कार्य न सोडण्याचा गुण म्हणा, असें माझ्या बाबतींत होत होतें. जसजसा एक दिवस जाई, पण विजय जवळ येईना, तसतसें मन विषण्ण होऊं लागलें. बालमित्रांशीं मनसुबे केले. तींहि सर्व पोक्त सल्ला देतीं झालीं. मोठ्या माणसांना विचारण्याची सोयच नव्हती. राजू रामोशी — ज्याचे लूटमारीचे पराक्रम आम्ही मुलें आनंदानें ऐकत होतों, आणि ज्याच्या भक्कम व पीळदार शरीराकडे पाहून आदर उत्पन्न होत असे अशा मुरब्ब्याशीं पण चर्चा केली. भर दिवसां बाजारांत दरोडा घालून भीमा नदींत पूर ओलांडून त्यानें दरवडा पचविला होता, असा त्याचा पराक्रम होता. त्याच्याशीं गुफ्तगूं केलें; त्यानें कौतुक केलें, पण त्या घोडीचा नाद सोडण्यास सांगितलें. भिमथडीच्या तट्टांना अटकेचें पाणी पाजणारा मराठ्यांचा इतिहास आमच्या शालेय पुस्तकांतून वाचला होता. थोरल्या बाजीरावाप्रमाणें घोड्यावर बसून शेतांतून भाल्याऐवजीं धुणें वाळत घालावयाची काठी घेऊन कणसें झोडीत मी अनेक वेळां गेलों होतों. देवळांत होणाऱ्या पुराणांतून अभिमन्यूदिकांच्या कथा श्रवण केल्या होत्या, व त्याचबरोबर उत्तर-गोग्रहणाचें आख्यानहि ऐकलें होतें. सर्वत्र मला आतां एकच विषय दिसत होता. प्लेग संपत आला अशीं पत्रें येऊं लागलीं होतीं. मुलांना परत केव्हां धाडायचें म्हणून थोरले मामा

शुभदिन पाहण्याच्या मार्गास पण लागलेले कळलें होतें. मुलांच्या मेळाव्यांत काय वाटेल तें झालें तरी इनामदारांच्या घोडीवर बसल्याशिवाय पुण्यास जाणार नाहीं अशी घोषणा केली होती. आजच्या भाषेंत या घोषणेचा अर्थ लावायचा झाल्यास– 'स्वराज्य मिळाल्याशिवाय साबरमतीस जाणार नाहीं.' इतक्या महत्त्वाची व गंभीरतेची ती घोषणा होती. घोषणा अंमलांत आणावयाच्या नसतात, निदान पुढाऱ्यानें अंमलांत आणावयाच्या नसतात, हें तंत्र त्या वेळीं माहीत नव्हतें. जय झाल्यास जय, पराजय झाल्यास नैतिक विजय, या दिव्य तत्त्वज्ञानाचा साक्षात्कार त्या वेळीं झाला नव्हता. क्षणाक्षणानें पुण्यास जाण्याचा दिवस जवळ येत होता. काळाचें आयुष्यहि तोकडें होत होतें. आणि अद्यापि महत्त्वाकांक्षा सफल होण्याची आशा दिसत नव्हती. तथापि माझा पूर्ण विश्वास होता कीं मीं जें ठरविलें आहे तें होणार. कसें होणार हें कळत नव्हतें. होणार याची चाहूल मात्र सारखी लागली होती. शेवटीं तो भाग्याचा दिन – तो भाग्याचा क्षण आला. आणि त्याचें असें झालें कीं, नित्याप्रमाणें संध्याकाळीं साडेचार पांचच्या सुमारास आम्ही कांहीं मुलें घरचीं व गांवचीं मिळून घाटाजवळील सात चिंचांत गेलों होतों. या ठिकाणीं भीमा नदीचें पात्र अफाट असून प्रत्यक्ष पाण्याचा प्रवाह मात्र सुमारें दोनशें फूट रुंदीचा होता. हा घाट हरिपंत फडके यांनीं बांधला असून अत्यंत प्रचंड असा हा आहे. पाण्याच्या पातळीपासून डगरीच्या वरच्या टोंकापर्यंत अडीचशेंच्या वर पायऱ्या आहेत. बांधकाम रेखीव, आकार विस्तीर्ण, व एकंदर त्याचें स्वरूप शोभिवंत असेंच आहे. बुरुजावरून पाण्यांत उड्या मारून तिथें पाणी भरण्यास आलेल्या नारीजनांना सतावणें हा एक तेथील मुलांचा जन्मसिद्ध हक्क होता. घाटाला लागून चिंचेचीं सात मोटीं झाडें होतीं. तेथील चिंचा पाडून त्या खाणें हा एक नित्यक्रम होता. प्रसंगीं पलीकडल्या तीरावर असणाऱ्या रामटेकच्या रामाला जाणें हेंहि आम्ही करीत असूं. त्या दिवशीं चिंचा खाऊन नदीपलीकडे जावें असें आमचें ठरलें होतें. आणि ज्या वेळीं घाटावर आलों त्या वेळीं डगरीच्या वरच्या टोंकाला व घाटाच्या वरच्या भिंतीला लागून इनामदारांची घोडी कांहीं तरी चरत असलेली दिसत होती. तिला पाहिल्याबरोबर – त्या 'विलोचन-चांद्रिके'ला पाहिल्याबरोबर हा नयनमहोत्सवच मला वाटूं लागला. माझें स्वप्न खरें होणार या जाणीवेनें मन आनंदित होऊं लागलें. डावपेंचाच्या दृष्टीनें अगदीं

आदर्श अशी स्थिति होती. तिच्याजवळ जाऊन तिजवर स्वारी करणें म्हणजे पिलाजीरावाला त्राटिकेबाबत जें अशक्य झालें तें करणें होतें. मागून जावें तर पायाचा प्रसाद मिळणार, पुढून जावें तर तोंडसुख मिळणार, बाजूनें जावें तर केंव्हां तोंड फिरवील याचा भरंवसा नाहीं,— अशी स्थिति होणार; म्हणून कांहीं मार्ग मला आतांपर्यंत सुचत नव्हता. आज हा दैवानें योग घडून आणला होता. प्रयत्न सुरू होण्यापूर्वी परमेश्वररूपी ही महामाया उभी होती. प्रयत्नान्तीं काय झालें हें आतां कळेलच. त्या स्थितींत तिला पाहतांच कसलेल्या सेनापतीप्रमाणें हल्ला करण्यास ही संधि योग्य आहे असें मीं हेरलें. माझ्या मित्रांना व अन्य भावंडांना सांगितलें. त्यांनीं मोडता घातला. कांहींनीं बालपणाला न शोभणारें प्रौढतेचें व मुत्सद्दीपणाचें मत दिलें. कांहीं मौन धरून राहिले. कोणी स्वार्थी बोलले. तात्पर्य, एकाशिवाय कोणीहि मला उत्तेजन देता झाला नाहीं. त्या गांवांत कांहीं रजपूत पिढीजात राहिले आहेत. त्यांचीं हीं कांहीं मुलें माझ्या हेड क्वार्टर्सच्या स्टाफमध्यें होतीं. त्यापैकीं रघूनें — ज्याचें नांव रघुवीरसिंग होतें पण ज्याला आम्ही रघू म्हणत असूं — त्यानें 'धरा बगा — सोडूं नका' सांगितलें. तात्पर्य, महान् कार्याला स्थायी व तात्कालीन अशी दुहेरी प्रेरणा मिळाली. महान् नेता मी तर होतोंच होतों. जर यशस्वी झालों तर गांवांत मी केवढा होईन याचा विचार मनांत येतांच अंगावर रोमांच उभे राहिले. आणि दुसरें कांहीं झालें तर — हा विचार शिवतो न शिवतो तोंच माझ्या पावलानें गति घेतली, व त्या विचारांचें मनांत स्पष्टीकरण होऊन घाबरटपणाला विवेकशीलतेचें स्वरूप येण्यापूर्वीच कृतीचा उपक्रम सुरू झाला. हरिणाच्या चापल्यानें, वाघाच्या गुप्त चालीनें, व सिंहाच्या विश्वासानें माझ्या व त्या घाटाच्या भिंतीमधील अंतर मी आक्रमून टाकलें, व सुमारें चार फूट असलेली भिंत सिंहगडावरून चढतांना ज्या सफाईनें तानाजीचे मावळे चढले असतील त्या सफाईनें चढलों; आणि त्या घोडीचें अस्तित्व व माझें अस्तित्व असें एकमेकांला कळून पुढील कांहीं हालचाल होण्यापूर्वींच मी उडी मारून तिच्या पाठीवर बसलों.

आणि क्षणार्धांत तिनें झपाट्यानें पळण्यास सुरुवात केली. तिच्या गळ्यांत दोर नव्हता, पायांतहि नव्हते चौकरे. ती दौडूं लागली. मध्येंच मागील पाय झाडी, तोंड वळवून चावण्याचा प्रयत्न करी, तथापि अस्मादि-

कांनीं जी बैठक तिजवर मारली ती अगदीं भक्कम होती. दोन्ही पायांत करकच दाबून, मानेवरील केस हातांत घट्ट धरून हा विजयी वीर बसला होता. सर्वत्र मुलांनीं ओरडून कोलाहल केला होता. त्यामुळें जास्तच ती घाबरली होती. गणपतीच्या प्रदक्षिणेला जाणारीं माणसें पण घाबरलीं, व सर्वत्र इनामदाराच्या घोडीवर जोशांचा भाचा बसलेला पाहून भीतिग्रस्त झाली होती. खडकाळ रस्त्यांतून ' स्तोकमुर्व्याम् प्रयाति ' अशा रीतीनें ती चालली होती. पाय घट्ट होते, माझे हात घट्ट होते. मन सुरुवातीस घट्ट होतें, पण शेजारचीं माणसें घाबरलेलीं पाहून मनांत किंचित् चलबिचल सुरू झाली. तिच्या गतीमुळें मी कोठें व कसा चाललों आहे याचें आकलन होईना, आणि येवढ्यांत गावकुसाच्या मारुतीजवळ भरधांव वेगानें ती आली आणि माझें लक्ष गेलें,— व मी आणखी मान खालीं घेतली म्हणून बरें झालें, नाहीं तर तेथील झाडाची फांदी लागून एका महान् पुरुषाच्या कर्तृत्वाला निदान महाराष्ट्र मुकला असता.—निदान या लेखाला तरी वाचकवर्ग मुकला असता ! पाटीला त्या फांदीचा स्पर्श झाला न झाला असा भास झाला. त्या क्षणांत मृत्यूची व माझी तोंडओळखच झाली म्हणाना. जीवनाच्या सरहद्दीवर मी पोंचलों, पण जिच्या वेगानें मला या संकटांत आणलें, तिच्याच वेगानें तारलें. तिचा वेग किंचित कमी झाला असता तर माझी खात्री होती कीं माझें मन इतकें साशंक व सतर्क झालें नसतें, व वर लिहिल्याप्रमाणें सर्व ग्रंथच संपला असता. गांवकुसाच्या मारुतीजवळ गावांतील कांहीं स्त्रीपुरुष होते. त्यांनीं माझी परिस्थिति पाहून कांहींनीं ओरडण्याला- कांहींनीं राजकारणांतलें महाप्रभावी शस्त्र म्हणजे शंखध्वनि करण्यास सुरुवात केली. या सगळ्या बाह्य स्थितीनें माझें धैर्य खचूं लागलें होतें. मी बसलों खरा, पण उतरणें कठीण झालें होतें. अभिमन्यूप्रमाणे व्यूह भेदून विजयानें आंत गेलों, पण परत येण्याचा मार्ग दिसेना. कोठें तरी ही आपल्याला स्वतःसह खड्ड्यांत घालील असा विचारहि मनाला चाटून गेला. माझें सुदैव—कीं त्या खेडेगांवांतील रस्ते सरळ व सखल नाहींत. तिनें आपली गति इनामदारांच्या वाड्याकडे वळविली आणि कोपऱ्याजवळ दोन खडकांच्या-मध्यें काय तिला बुद्धि झाली कोण जाणे, ती क्षणभर थांबली, आणि त्या क्षणाचा धूर्तपणें उपयोग करून मीं पटकन् उडी मारून शेजारच्या घरांत शिरलों. तिनें मागेंपुढें मान केली. मागले पाय उधळले. पण तिचा

अपमान करणारा, तिचा आत्मगौरव नष्ट करणारा महान् वीर केव्हांच पसार झाला होता. तें गुरवाचें घर होतें. आणि अवघ्या पांच मिनिटांत गांवांतील अनेक मंडळी तेथें येऊन पोंचली. आणि आतां उपसंहाराला सुरुवात झाली. कोणी रागावले, कोणीं वाहवा केली, कोणीं असल्या भानगडींत पडूं नको असा हितोपदेश केला. वृद्धांच्या कौतुकाचा मी विषय झालों; मुलांच्या स्वाभिमानाचा झालों. इनामदारांना काय वाटलें हें सांगतां येत नाहीं, पण त्यांच्या घोडीची अप्रतिष्ठा मात्र गांवभर झाली. 'साहसांत श्री आहे', पण तें साहस अखेरपर्यंत टिकलें नाहीं तर मध्यंतरीं काय होतें याचा धडा त्या पांचसहा मिनिटांच्या काळांत मी शिकलों. त्या पांच मिनिटांत जें केलें, जें अनुभवलें, तें आतां पन्नाशी उलटली तरी विसरलों नाहीं. सुरुवातीचें ध्येय अखेरपर्यंत राहणार नसेल तर कार्याला हात घालणें ठीक नव्हे. जे टिकतात – ते मिरवतात व मिरविले जातात. जे गळतात त्यांच्याबद्दल अश्रुसुद्धां क्वचितच गाळले जातात. मी जर मध्येंच पडलों असतों, तर माझ्या हाडाबरोबर माझी प्रतिष्ठा व त्याहिपेक्षां अधिक महत्त्वाचें माझें मनहि मोडलें असतें. सुरुवातीचा क्षण ओळखला व अखेरीचाहि क्षण ओळखला,– यांत या गोष्टीचें रहस्य मी समजतों. गुरवाच्या घरांतून मी जणूं कांहीं निवडून आलेल्या उमेदवाराप्रमाणें घरीं गेलों. मामा मनांत आनंदलेले व बाहेर रागावलेले दिसत होते, आणि वृद्ध आजीला माझी दृष्ट काढतांना मीठ–मिरच्याच पुरेनाशा झाल्या. सांगायला नकोच कीं, दुसरे दिवशीं श्रीगणपतीला मोठा मोदकांचा नैवेद्य झाला, व त्यांत सर्व इतरेजनांनीं निःशंक मनानें भाग घेतला. आणि जेव्हां जेव्हां आयुष्यांत सर्व लोकांनीं परावृत्त केलें असतांहि धाडसाचें कृत्य करण्याचा प्रसंग येतो, त्या वेळीं समाजाचें नित्य मंगल चिंतणारी जनता कौतुकच करील; प्रचलित मार्गाला सोडून चालल्याबद्दल रागावलेले, पण यशामुळें आनंदितच होतील; व सफलतेमध्यें सर्व सहकारी भाग घेतील,– हा विश्वास माझा कायम असतो. आणि हा विश्वास इनामदारांच्या घोडीनें प्रथम निर्माण केला आहे.

दीपावलि, १९४८.

● ● ●

## ३ : मी नवस फेडतों !

'तुम्हीं हा नवस केव्हां केला? आणि केलेला नवस फेडणार? दोन्ही आश्चर्य वाटण्यासारख्या गोष्टी आहेत!' जी व्यक्ति हें बोलली ती सामान्य व्यक्ति नाहीं. आज मुंबई इलाख्यांतील राजकारणांत एक मानाचें स्थान असलेली ती व्यक्ति होती. इतर कोणी असता तर फटकळपणें मी उत्तर देऊन मोकळा झालों असतों. सामान्य माणसांना डाफरावयाचें व अधिकार-पदावर असलेल्यांना गोंजारावयाचें हा सर्वसाधारण आचारधर्म आहे. तथापि लोकशाहींत सामान्य माणूस असामान्य महत्त्व पावला आहे. प्रत्येक पुढाऱ्याला त्याची काळजी वाटत आहे. प्रत्येक शिक्षणतज्ज्ञ याच्यासाठीं झुरत आहे. लाल बावटेवाल्यांची सर्व खूनखराबी त्या बिचाऱ्यासाठीं आहे. साम्यवादी सर्व तत्त्वज्ञान व सर्व आचारविसंगति त्याच्या उद्धारार्थ आहे अशी श्रद्धा बाळगतात. सर्वोदयवादी तो एकदम श्रीमंत होऊन बावरून जाऊं नये म्हणून त्यास प्राप्त हेंच श्रेष्ठ व कल्याणकारक आहे असें सांगत आहेत. या सर्व गोष्टी व हें असलें वातावरण मजभोंवतीं असूनसुद्धां सामान्य माणसाला डिवचण्यास मीं कमी केलें नसतें. कारण पाय दिल्याशिवाय नाग फणा काढीत नाहीं, व फुंकर मारल्याशिवाय अग्नि प्रज्वलित होत नाहीं. सामान्यांच्या अपमानांतूनच क्रान्ति निर्माण होते असा माझा दृढ विश्वास आहे. जगांत सर्वांशीं नम्रतेनें वागून कार्य होत नाहीं, व प्रसिद्धि तर त्याहून मिळत नाहीं. कोणीच टीकाकार नसले तर राजकारणी पुरुषाला कसेंसेंच होतें. मात्र फार टीकाकार झाले तर भलतेंच होतें. तात्पर्य, राम रावणामुळें प्रसिद्धि पावला. आजच्या जगांतहि हाच अनुभव आहे. महात्माजींना त्यांच्या मारेकऱ्यांनीं अजरामर केलें; व आजचीं मंत्रि-मंडळें टीकांमुळेंच तरारून आहेत. या सर्व अनुभवांचा मी द्रष्टा व भोक्ता आहें. म्हणूनच जमेल तेथें व पचेल त्यांची रेवडी – अर्थात् सभ्य शब्दांत उडविण्याची माझी संवय मला एक सद्‌गुणस्वरूपी वाटते. प्रश्न विचारणारी व्यक्ति जरी सामान्य नव्हती तरी टिंगल उडविण्याची माझी प्रवृत्ति जवळ जवळ कार्यान्वित झाली होती, पण—

ज्या विषयाबाबत नवस केला होता तो गंभीर होता. ज्या ऐतिहासिक पार्श्वभूमीवर तो केला होता ती उन्नत होती. ज्या वयांत केला होता तें उमेदवारीचें वय होतें. ज्या कालांत केला होता तो काल महान् घटनांनीं गजबजला होता. १९१८ च्या मार्चे अखेरीची ती गोष्ट आहे. मुंबई विश्वविद्यालयाची बी. ए.ची परीक्षा संपली होती. पेपर्स बरे गेले होते; व पास होण्याची खात्री होती. आम्ही पुण्यांतील एका कॉलेजांतील एकच ऐच्छिक विषय असलेले तीन विद्यार्थी बरोबर अभ्यास करीत होतों, व मुंबईसहि बरोबर येऊन एकाच ठिकाणीं राहिलों होतों. परीक्षा संपल्यामुळें डोक्यावरील ओझें कमी झालें होतें. विद्यार्थीदशा संपली म्हणून आनंद झाला होता. पुढें काय याची चर्चा जरी अकालीं होती, तरी थोडीशी आम्हीं केलीहि. पुण्याला गेल्यानंतर व निकाल होईपर्यंत महाराष्ट्रांत कुठें हिंडावयाचें याचाहि मनसुबा केला. १९१८ साल म्हणजे होमरूल चळवळीच्या प्रकर्षाचें तें साल होतें. परीक्षेच्या सुमारास चिरोल केसचाहि बोलबाला चालला होता. राजकीय वातावरण गरमागरम होतें. गव्हर्नरच्या सभेंतून टिळक उठून गेल्याची घटना ताजी होती. मराठी व इंग्रजी पत्रें जोरांत लिहीत होतीं. महायुद्ध संपलें नव्हतें, पण अखेरची कलाटणी त्यानें घेतलेली दिसत होती. आम्हां तरुणांना कुठल्या तरी नव्या युगाच्या उंबऱ्यावर उभे आहोंत असें वाटत होतें. ब्रिटिशांचें राज्य असह्य वाटत होतें; तथापि प्रचंड युद्ध इंग्लंड जिंकणार,– व मग या देशाचें काय होणार याची काळजी अनेकांना वाटत होती. मॉंटेग्युसाहेबांचा रिपोर्ट अद्याप बाहेर पडला नव्हता. त्यावर आशा देऊन अनेक व्यक्ति कारागृहांत करपत होत्या. अनेकांच्या मागें पोलिसी भुंगे चालूच होते. आईबापांना जेवढी मुलांबद्दल माहिती नव्हती, तेवढी जिल्ह्याच्या पोलीस अधिकाऱ्यांजवळ असे. आम्ही तरुण एकत्र जमत असूं. कांहीं विचारहि करीत असूं. देवपूजनापासून देहपातापर्यंत साधनें आमच्या डोळ्यांपुढें येत. चहा सोडण्यापासून प्राणयज्ञापर्यंत आमचीं मनें हेलकावे खात होतीं. जे मार्गदर्शक दिसत ते बोलण्यापलीकडे जात नव्हते. जे दहशतवादी भेटत ते प्रथम बिचकत, पुढें थापा मारीत, व शेवटीं निरुपयोगी ठरत. मनें कावरींबावरीं होत होतीं; कारण आदर्श निश्चित झाले नव्हते. तथापि स्वातंत्र्यासाठीं वाटेल तें करण्याची तयारी असणारा – लहान का होईना – तरुणांचा वर्ग होता. पर्वतीमागें जमावें, वनविहारांच्या निमित्तानें बाहेर जाऊन मसलती

करण्यात. पण यापलीकडे प्रयत्न सरकत नव्हते. साधनांचें शुचित्व त्या वेळीं तेजींत नव्हतें. 'भाईयुग' भविष्याच्या उदरांत होतें, व 'ताईयुग' कधीं तरी येईल असें कोणालाहि वाटत नव्हतें. तात्पर्य, तें सामान्य युग नव्हतें, व ती पिढीहि अगदीं मामुली माणसांची नव्हती. आमच्या मनःप्रवृत्ति कालानुरूप होत्या. प्रेरणेसाठीं इतिहासाकडे पहात होतों. प्रयत्नासाठीं स्वतःच्या कुवतीकडे, यश सर्वस्वी प्रयत्नाधीन आहे असें वाटत असलें तरी — भगवंताचें अधिष्ठान असावें असें वाटत होतें. या अशा वैचारिक संदर्भात पुढें काय करावें याचा विचार करीत होतों. सहज कल्पना निघाली कीं, मुंबईहून पुण्यास पायीं जावें. तथापि माझ्या मनांत फार दिवस वसईचा किल्ला पहावा असें होतें. त्रिवर्गांना हा विचार पटला. हा किल्ला पाहून मुंबईस यावयाचें व तेथून पुण्यास पायीं जावयाचें.

दुसऱ्या दिवशीं आम्ही वसईस गेलों. किल्ल्यांतील धड व पडक्या इमारती पाहिल्या; गणपतीच्या देवळाबरोबर येशूचें पवित्र मंदिर पाहिलें. आमचा वाटाड्या प्रत्येक इमारतीबद्दल आस्थेनें सांगत होता. एका इमारतीजवळ येतांच त्यानें सांगितलें कीं, या वास्तूंत बसून बाजीरावानें १८०३ सालीं तह करून ताम्रमुखीला घरांत घेतलें. चिमाजी अप्पानें हा किल्ला जिवाची तमा न करतां फिरंग्याकडून घेतला, व त्याच्या नष्ट वंशजानें केवळ जिवाच्या तमेसाठीं हा व अनेक किल्ले आणि प्रदेश परक्यांना दिले. या शंभर वर्षांतला इतिहास डोळ्यासमोर आला. भाग्याचे चढ-उतार हर्ष व खेद उत्पन्न करते झाले. १८०३ नंतरचें शतक डोळ्यापुढें आलें. तुटलेला पतंग जसा गोते खातो तसेंच या देशाचें चालू आहे म्हणून विषाद वाटला. वर सूर्य तळपत होता. ऊन हाय हाय करीत होतें. मन तळमळत विषण्ण झालें होतें. मधून मधून बाजीरावाबद्दल त्वेषाचा झटका येत होता. पानपताहून पळालेल्यांचा मनांत उद्धार करीत होतों. मुत्सद्द्यांच्या चुका शोधून नांवें ठेवीत होतों. सेनापतीच्या योजनांत दोष काढीत होतों. तथापि हें सर्व करून आतां काय? आज १९१८ मध्यें जळीं स्थळीं व नभीं परराज्य दरोबस्त ठाण मांडून आहे. तृणवत् जगावें अगर मरून जावें, याशिवाय तिसरा विकल्प दिसत नव्हता. विचारांचा प्रवाह मनाचा बांध मोडून बाहेर पडण्याच्या मर्यादेपर्यंत आला. भावनांनीं हृदयाचा कबजा घेऊन त्याला स्फोटक परिस्थितीपर्यंत आणलें. माझें अस्तित्व मला असह्य झालें. कांहीं तरी झाल्याशिवायच कांहीं तरी

वेडेंवांकडें होईल असेंहि वाटूं लागलें. काय झालें कोणास ठाऊक, माझें लक्ष डोक्यावरील छत्रीकडे गेलें, व ताड्कन् अंगांत यावें त्याप्रमाणें मीं छत्री बंद करून ओरडलों, "होय, याच ठिकाणीं मराठ्यांचें राज्यछत्र मोडण्यांत आलें. मी कांहींच करूं शकत नाहीं हें खरें,– निदान तोंपर्यंत ही विलायती छत्री तरी मी डोक्यावर घेणार नाहीं." असें म्हणून ताड्कन् तिला जमिनीवर आपटून समोरच्या तळ्यांत फेकून दिली. मन मोकळें झालें. दाटलेला कंठ साफ झाला. सुतक संपल्यावर स्नान केल्यानंतर मनाला जी एक प्रसन्नता येते ती आली. माझे दोघे मित्र चाकित झाले, पण माझा चक्रमपणा त्यांना अपरिचित नव्हता. ते बोलले नाहींत. आम्ही तिघे मुंबईस परत आलों तरी माझ्या डोळ्यांपुढें वसईचा किल्ला अद्याप माझ्या भावनांशीं लढत असलेला दिसत होता.

दुसऱ्या दिवशीं अवजड सामान म्हणजे परीक्षेसाठीं आणलेलीं पुस्तकें व अन्य– एका मित्राबरोबर आम्हीं पुण्यास गाडीनें धाडून दिलें. प्रत्येकीं एक लहान पिशवी,–ज्यांत सतरंजी, धोतर, टॉवेल व सदरा याप्रमाणें पाथेय घेऊन आमच्या प्रवासास आम्हीं प्रारंभ केला. साधारणपणें कोणत्या गांवीं जावयाचें याचें टिपण केलें होतें. पुण्यापर्यंत पायीं जावयाचें हें ध्येय होतें. तथापि प्रसंग पडल्यास गाडीनेंहि जाणें भाग पडेल हें आम्ही जाणून होतों. तात्पर्य, योजना व डावपेंच यांचा समन्वय कार्यसिद्धीसाठीं व्हावा लागतो हें आम्ही जाणून होतों. इतिहासाचे आम्ही विद्यार्थी असून अर्थशास्त्र व राज्यशास्त्र हे आमचे ऐच्छिक विषय होते. अर्थशास्त्र व राजकारण यांतील सिद्धान्त सापेक्ष असतात, व इतिहास केंव्हांहि पलटी खात असतो, हें आम्ही जाणून होतों. 'मराठ्यांचें बळ पायांत आहे' ही महादजी शिंद्याची उक्ति आम्हांला माहीत होती. जें करावयाचें तें केल्यानंतर तेंच अनिवार्य होतें, व तेंच योग्य होतें, हा मुत्सद्देगिरीचा पहिला सिद्धान्त माहीत होता, पण प्रयोगांत आणला नव्हता. सांगण्याचा मुद्दा असा कीं, गिरगांवांतील मुक्कामापासून दादरपर्यंत गेल्यानंतर नुसतीं घरें व गर्दी पाहण्यांत काय अर्थ आहे, असा विचार मनांत आला. पायीं प्रवासाचें हें का ध्येय आहे? प्रवासांतील अनुभव म्हणजे कांहीं एक आमची विशिष्ट कल्पना होती. पाय थकले होते ही सत्यकथा होती,– पण निर्णयासाठीं विचारांत घेण्यांत येण्यासारखी ती बाब महत्त्वाची नव्हती. महत्त्वाची गोष्ट क्षुद्र व क्षुल्लक

लेखून, क्षुद्र गोष्टीला तत्त्वाचें स्वरूप देऊन प्रतिपक्षाला गोंधळावयाचा, व त्याची नैतिक अप्रतिष्ठा करावयाची, ही रामराज्यांतील नीति त्या वेळीं स्पष्ट नव्हती. पण तिचें जनकत्वच जर शोधावयाचें असलें तर आमच्यापैकींच कांहींना तो मान द्यावा लागेल. ज्या गोष्टबिद्दल जिद्द धरली तर पराभव नक्की होणार हें समजून कुठली तरी दुय्यम गोष्ट पणाला लावून ती मिळतांच प्रचंड जय झाला म्हणून गाजावाजा करावयाचा,—हें तत्त्व आम्ही त्या वेळीं कॉलेजचे अधिकारी यांच्याशीं भांडतांना अंमलांत आणीत असूं. तपशीलवार चर्चा करण्याचें हें स्थान नाहीं. सांगण्याचें तात्पर्य हें कीं, स्वतःला फसविण्याची कला आम्हीं हस्तगत केली होती. व आमचें म्हणणें सत्य म्हणून सर्व मानतात असा आमचा ग्रह होता. पायीं प्रवासाच्या जाहिराती आधींच पुढें गेल्या होत्या. एका तपानंतर झालेल्या 'दांडीकूच'चें हें कदाचित् ट्रेलरहि म्हणतां येईल ! दादरच्या स्टेशनवर आम्हीं तिघे विचारार्थ आलों. कुठें तरी बसावयाचें म्हणून स्टेशन योजलें. गाडीनें गेलों तर वेळ वांचेल, केवढी मौलिक कल्पना वाटली !! नाहीं तरी मुंबई ते ठाणें पाहण्यासारखें काय आहे ? ज्ञानानें माहिती पुरविली. झालें. ठाण्यापर्यंत गाडीनें जाण्याचा निर्णय ठरला, व कार्यक्षम सनदी नोकराप्रमाणें आम्हीं तो झटपट अंमलांत आणला. कांहीं मिनिटांत ठाणें आलें. तेवढा तेथें फक्त आम्हांला किल्ला पहावयाचा होता.

उतरल्यावर चौकशी करूं लागलों; तर लोक रस्ता दाखवीत, पण चमत्कारिक रीतीनें आमच्याकडे बघत. आम्हीहि थोडे कावरेबावरे झालों. तथापि ध्येयच्युति आरोप सहन करणें शक्य नव्हतें. अंगांतून घामाच्या धारा वाहात होत्या. माध्यान्हींचा सूर्य आकाशाची भलतीच किंमत वसूल करून घेत होता. अनेक क्रॉस रस्त्यावर पाहिले. क्षणभर असें वाटलें कीं, ठाणें पूर्वी नुसतें स्मशानच होतें कीं काय ? शेवटीं एकदांचे किल्ल्यासमोर आलों. त्र्यंबकजी डेंगळा ज्या किल्ल्यांतून पळाला, तो हा ऐतिहासिक किल्ला होता. दार मोडून, भिंत ओलांडून, खाडीपार करून, अंतरावर असलेल्या झाडाखालील घोड्यावर स्वार होऊन इंग्रजांच्या हातावर तुरी दिलेला हा गृहस्थ— एरवीं भेकड व नीच असला तरी या कृत्यानें तो आमच्या मतें एक वीर होता;—व म्हणून तर या वास्तूच्या दर्शनार्थ आम्ही आलों होतों. जें दृश्य आम्हांला दिसलें त्यानें आम्ही अगदींच गोंधळलों. मोठा

जाळीचा दरवाजा दोन बुरुजांत असून त्याच्यापुढें बंदुका घेतलेले शिपायी पहारा करीत होते. माझे दोघे मित्र या भानगडींत न पडतां शिस्तवार माघारीचा सल्ला देऊं लागले. अर्थात् माझा स्वभाव याविरुद्ध होता. संकट म्हणजे आव्हान मानणारा, म्हणून मी एकटाच फाटकापर्यंत गेलों. कोणीं गोळी झाडली नाहीं, अगर बागनेट खुपसलें नाहीं. जातांना जोरांत जात होतों, पण पोटांत भीति नव्हतीच असें मात्र नाहीं. देहिक भीति व मानसिक अहंकार — यांच्या झगड्यांत अहंकार श्रेष्ठ ठरला. दाराजवळ पोंचतांच कोणाला भेटावयाचें आहे? अर्ज आणला का? — प्रश्न विचारले गेले. मी म्हणालों, मला किल्ल्यांत जावयाचें आहे. एवढ्यांत एक गोरा गृहस्थ बाहेर आला. मला त्यानें न्याहाळलें, तसेंच संरक्षणाची दुसरी फळी अंतरावर उभी असलेली त्यानें पाहिली. मनांत त्याच्या संशय आला असावा असें वाटलें. कोण, काय, म्हणून प्रश्न विचारले. मींहि पुणेरी इंग्रजींत फर्डी उत्तरें दिलीं. व्याकरणामुळें झालेली त्याची करमणूक मजविषयीं त्याची दृष्टि स्नेहमय करती झाली. तो म्हणाला, आंत जावयास लायकी लागते; 'You must deserve it.' मी म्हणालों, 'मी तें करावयास तयार आहे.' तो हसला व म्हणाला, 'गड्या, हा तुरुंग आहे, व येथून कैद्यांना अंदमानला धाडतात. तुम्ही बाहेरून पहा, पलीकडे खाडीला लागून असलेल्या भिंतीवरून तुमचा हीरो पळाला!' अर्थात् मी परतलों. हें होईपर्यंत — तोफखान्यानें काम केल्यानंतर पायदळ जसें पुढें सरकतें, तसे माझे दोन्ही मित्र माझ्या मागें येऊन उभे राहिले होते. आम्ही लांबूनच डेंगळ्याची पराक्रमभूमि पाहिली व पुढें पुलावरून भिवंडीचा रस्ता धरला. त्या वेळीं कल्पनाहि नव्हती कीं, १२ वर्षांनीं या किल्ल्यांत अनेक परीनें राहण्याची पात्रता मजमध्यें येणार आहे!

प्रवासाला निघतांना आम्हीं ठाणें जिल्ह्याचा नकाशा घेण्याचें ठरविलें होतें. पुण्यांतील व पुणें जिल्ह्यांतील मार्ग माहितीचे होते. बाजारांतून नकाशाहि आणला होता. पण नेमका तोच ट्रंकमधून पुण्याला गेला, व आम्ही मात्र या गोष्टीची जाणीव होतांच हात चोळीत बसलों. तथापि रस्त्यावरील फलक व अंतराचे आंकडे यांना मार्गदर्शक करून प्रवास सुरू केला. त्या ठाणें.— भिवंडी रस्त्यावरून हे तीन यात्रेकरू निघाले होते. कुठें जावयाचें हें निश्चित होतें, व नेत असलेला मार्ग अचूक होता असा आमचा

विश्वास होता. आमच्या कार्यक्रमाप्रमाणें अनगांव–कवाड येथें रात्रीं मुक्काम करावयाचा असें ठरलें होतें. तथापि सदरहू गांव दूरवर होतें. पाय गति घेईनात. भूक तर कांहीं सुचूं देईना. खिशांत पैसे होते, पण 'विश्रान्तिगृह' नजरेंत येईना. दोन्ही बाजूंस जंगल. रस्त्यावरून एखाद–दुसरा मोळीविक्या दिसे. त्याला विचारावें तर त्याचें मराठी आम्हांस समजेना, व आमचें त्याला. ब्रह्मांड आठवलें. पण त्यानें काय होणार ? चालतां चालतां, रस्त्या-लगत एका झोपडींत 'चाय'चें दुकान सांपडलें. रामाला भरत भेटल्यानंतर जितका आनंद झाला असेल तितका आनंद झाला. दुकानदार आजच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे austirity standard प्रमाणें पोषाख घालून होता. थोडक्यांत म्हणजे एक लंगोटी त्याच्या त्या भव्य पण काळ्या शरीरावर होती. त्याचे केस कांहींसे विचित्र दिसत होते. तथापि या गोष्टी महत्त्वाच्या नव्हत्या. चहाचें सुभाषित या बालापासून आम्हांला घ्यावयाचें होतें. गाण्याचें माधुर्य नाकाच्या नकटेपणानें थोडेंच कमी होतें. कमाल औत्सुक्यानें त्यानें पुढें केलेला इवलासा कप घेतला. चहा इतका काळा असूं शकतो ही गोष्ट तेव्हां लक्षांत आली. हॉटेलमधला चहा म्हणजे – आधुनिक कविता.—पुष्कळसे शब्द, थोडीशी कल्पना, व किंचित् अर्थ. पुष्कळ पाणी, थोडा चहा, व किंचित् दूध ! व तें किंचित् दूधहि येथें दिसेना. न प्यावें तर पंचाईतच. क्षुधा भडकणार, व शिवाय पैसे द्यावे लागणार. हुज्जत घालतां येईल असें तें स्थळ नव्हतें; व व्यक्तीहि तसली नव्हती. प्यावें तर राम जाणे काय होईल. तथापि हिय्या करून थोडा घेतला व कप खालीं ठेवून पैसे दिले. दोघे मित्र तेंच करते झाले. प्रवासी पुन्हा रस्ता चालूं लागले. अनगांव आमच्यापैकीं एकाचें गांव होतें, व तेथें गेल्यावर स्वागत होईल, सर्व श्रमपरिहार होतील, या आशेवर आम्हीं स्वतःला ढकलीत होतों. रात्रीं नऊचे सुमारास मुख्य रस्त्यावरून गांवच्या रस्त्यावर वळतांच एखाद्या पुढाऱ्यावर वर्तमानपत्रें तुटून पडतात तशी गांवची 'होमगार्ड चमू' म्हणजे कुत्रीं भुंकून आमच्यासमोर समूहानें उभीं राहिलीं. भुंकणारे चावत नाहींत, हा राजकीय क्षेत्रांतील अनुभव अद्याप यावयाचा होता. तसेंच भुंकणाऱ्यांचीं तोंडें बंद करण्याची युक्ति अद्याप माहिती नव्हती. प्रसंग बांका होता. परत फिरणें शक्य नव्हतें. पुढें जाणें सोपें नव्हतें. हातांत काठ्याहि नव्हत्या. दगड घेऊन मारावें तर शत्रु अधिक चवताळावयाचा. दंड अशक्य; भेद-

नीतीसाठीं जरूर असणारा मलिदा नव्हता,– तेव्हां तीहि गोष्ट अशक्य. दाम तर उघडच अप्रस्तुत मार्ग होता. 'उपेक्षा पंचमी स्मृता'. पण ही पांचवी नीति स्वीकारणें धोक्याचें होतें. सामाचा मार्ग होता. पण कशी सुरुवात करावी हें कळेना. कोणत्या नांवानें सुरुवात करावी,– वाघ्या, मोत्या, गब्रू– इंग्रजीं नांवें येथें जुळणार नाहींत एवढें मी समजून होतों. वास्तविक त्यांच्या गांवचा नागरिक आमच्याबरोबर होता. त्याला तरी त्यांनीं नीट वागवावयाचें होतें. तो तर कांहींच बोलेना. शेवटीं कांहीं वेळ स्वस्थ उभें राहण्याचें ठरविलें. आपण उभे राहिलों कीं भीति पण उभी राहते तसेंच झालें. त्यांचा आवाज किंचित् कमी झाला. थोडें गोंजारून, थोडें आर्जवून, नाना नांवें घेऊन मी त्यांच्याकडे बघून पण एकएक पाय पुढें ढकलीत होतों. जणूं कांहीं एखाद्या कसलेल्या निवडणुकीच्या उमेदवारानें करावें तसें! एवढ्या वेळांत यायचीं कांहीं माणसें आलीं. 'भाऊकाका'ची ओळख पटली, व आम्हां तिघांना गांवांत जाण्याचा मार्ग मोकळा झाला. 'होमगार्ड' आतां ढाला फिरवून आमच्या पुढें पुढें चालत होते. मित्राच्या घरीं आम्हीं गेलों,—ठरलेल्या दिवसापूर्वीं चार दिवस आम्ही आधीं आलों होतों. आजींनीं आम्हांस येवढी वाटचाल झालेली समजतांच तेल व ऊन पाणी दिलें. त्यांनीं पाय धुतल्यावर खरोखरच श्रमपरिहार झाले. आयत्या वेळचें महाराष्ट्रीय जेवण म्हणजे झुणका–भात आम्हीं मनसोक्त जेवलों, व अंथरुणावर पडतांच झोंपीं गेलों.

दुसऱ्या दिवशीं आम्हीं अगदीं सकाळीं उठून वज्रेश्वरीचीं उन्हाळीं पाहण्यासाठीं निघालों. ऊन पाण्याचे झरे म्हणजे काय हें जाणण्याची उत्सुकता होती. शिवाय भाऊकाकानें त्यांची फार स्तुति केली होती. शिवाय वज्रेश्वरी हें स्थान रम्य आहे असेंहि त्यानें सांगितलें, म्हणून आमच्या कार्यक्रमांत हें स्थान पहावयाचें असें आम्हीं ठरविलें होतें. अनगांवापासून बारा मैल रस्त्यानें व जंगलांतून पायवाटेनें गेल्यास नऊ मैल होईल अशी माहिती मिळविली. अनुभवाचे मोतीं तळापर्यंत गेल्याशिवाय मिळत नाहींत म्हणतात. आम्ही तर त्याच्याच शोधार्थ निघालेले वीर होतों. पायवाटेनें जाण्याचें ठरलें. भाऊकाका साशंक होता. राम नक्की सांगेना. मी निश्चयानें पायवाटेनें जावें असें सांगितलें व प्रवास सुरू केला. दोघां मित्रांचे पाय व मनें सरळ माझ्या मागें आलीं. सकाळची सुंदर

वेळ होती. गर्द जंगलांतून पायवाट होती. दोन्ही बाजूंस झाडेंझुडपें, व मधून कोठें सरळ, कोठें वक्र, कोठें सखल, कोठें ओढ्यांतून, कोठें किंचितशा टेकाडावरून पायवाट धांवत होती. कांहीं ठिकाणीं जणूं कांहीं भू-सुंदरीच्या डोक्यावरील केसांचा भांग पाडावा, तसें चित्र दिसत होतें. आमचीं मनें प्रफुल्ल होतीं. साहजिकच काव्य-कल्पना सुचत होत्या. मध्येंच दोन वाटा दिसाव्यात, आम्हीं घोटाळ्यांत पडावें. साधारण दिशा लक्षांत घेऊन चालावें. याप्रमाणें तीन तास चालल्यानंतर मुख्य रस्त्याला काट-कोनांत असणारा रस्ता आला. माणसें भेटलीं व कळलें कीं आम्ही वज्रेश्वरीच्या शिवारांत आलों. जंगलांतून जातांना ऊन फारसें लागत नव्हतें. पण रस्ता लागल्यानंतर ऊन लागूं लागलें. थोड्या वेळांत आम्हीं उन्हाळ्यां-जवळ आलों. समोर तान्सा नदीचें पात्र होतें. लहानमोठे चार पांच झरे बांधून काढलेले कांठालगत होते. खुद्द नदीच्या प्रवाहांतहि ऊन पाण्याची एक धार दिसत होती. पाण्यांतून वाफा निघत होत्या. आम्ही कपडे काढून कुंडांत उतरलों. गंधकाचा वास येत होता. थोड्या वेळांत मी बाहेर आलों. नंतर थोड्या वेळानें भाऊकाका आला. राम डुंबत राहिला. मीं लवकर बाहेर येण्यास सांगितलें. देवदर्शन घेऊन आम्हांस संध्याकाळच्या आंत अनगांवास पोहोंचायचें होतें. 'फार मजा आली', 'फार मजा आली' म्हणूंन तो ओरडे व डुंबत राही. शेवटीं वर आला व धोतर बदलतां बदलतां बेहोष होऊन जमिनीवर पडला. आम्ही घाबरलों. त्यानें डोळे पांढरे केले. छाती धडधडत होती, पण नाडीचा पत्ता लागेना. थोड्या वेळानें कळलें कीं, भलत्याच बाजूला मी नाडी पाहात होतों. धांवत जाऊन नदीचें गार पाणी आणलें, तोंडावर मारलें. हात पुढेंमागें केले. मनांत देवाला विनविलें; भलतेंच झालें तर काय करा ! त्याचे आईबाप पहिल्या-पासून माझ्या संगतीबद्दल त्याच्यावर रागवून होते. दैवानें खैर केली. थोडी हुशारी आली. नंतर तो पूर्णपणें सावध झाला. धोतरें पिळलीं व डोक्यावर पसरून देवळाकडे निघालों. बाराचा सुमार होता. देवळाजवळ खाणावळ असेल म्हणून चौकशी केली. सदावर्त आहे, व ब्राह्मणांना जेवण मिळतें म्हणून समजलें. आम्ही सदावर्ताकडे गेलों. तेथल्या व्यवस्थापकानें आम्हांस न्याहाळलें व तो म्हणाला, 'येथें ब्राह्मणांना फक्त जेवण मिळतें.' त्या वेळचें राज्य निधर्मी नव्हतें, म्हणून 'आम्ही ब्राह्मण आहोंत' असें म्हणालों. त्याच्या

चेहऱ्यावरून त्याला पटेल असें वाटेना. भाऊकाकानें आपण अनगांव-कवाडचे अमक्याचे पुत्र, अमक्याचा नातू, लग्नांत उपाध्याय म्हणतात त्याप्रमाणें सांगून पाहिलें. व्यवस्थापकानें अमकी बाई तुमची कोण, अमका तुमचा कोण लागतो वगैरे प्रश्न उलट तपासणीच्या आवेशानें विचारले. भाऊनें उत्तरें दिलीं. भाऊ उत्तीर्ण झाला. माझी पाळी आली. मी म्हणालों, संध्या म्हणून दाखवितों. पुरुषसूक्त, रुद्राचा एखादा अन्वक म्हणतों. गोत्र व प्रवर सांगितले. त्याचें मन ग्वाही देईना, पण तो 'ठीक' येवढें म्हणाला. मी 'मार्जिनवर' पास झालों. भाऊकाकानें केस ठेवले नव्हते. माझे काय, सुवर्णमध्य.— म्हटलें तर ठेवले होते, म्हटलें तर नाहीं. पण राम मात्र अगदीं चट्टोपाध्यायी केशरचनेचा भोक्ता होता. त्याचे ते लांब केस, ठेंगू मूर्ति पाहून व्यवस्थापकाला हा कुणी तरी नाटकांतला असावा असें वाटलें. आमच्या परीक्षा चालू असतां, कुठलेंहि गोत्र सांग असें हळूच त्याला इंग्रजींत सांगितलें, व गोत्राचा उच्चार न करतां स्पेलिंग सांगितलें. रामची परीक्षा न व्हावी म्हणून दुसरेच विषय काढून व्यवस्थापकाशीं बोलण्याचा प्रयत्न केला. चालू युद्धाची बातमी येथें येते का, वर्तमानपत्रें येथें मिळतात का? बी. ए.च्या परीक्षेला युद्धाचा प्रश्न आला होता. तात्पर्य-ज्ञान, बहुश्रुतता, कुलीनता याबाबत त्यावर रुबाब मारण्याचा मी प्रयत्न करीत होतों. उद्देश — त्यानें रामला कांहीं विचारूं नये. शेवटीं रामला त्यानें गोत्र विचारलें. रामनें पढविलेल्या साक्षीदाराप्रमाणें गोत्र सांगितलें. लागलीच धूर्तपणें मीं पिण्यास पाणी मागितलें;—आम्हांला तहान फार लागली आहे. काम झालें. त्यानें पाणी आणण्यास सांगितलें व लागलीच म्हणाला, 'तुम्ही एक तासानें जेवण्यास या, जो प्रसाद मिळेल तो खा.' आम्ही विजयी झालों. अन्नमय जग व अन्नमय जीवन आहे हेंच खरें! आम्ही नंतर देवळांत गेलों. तेथील बाजूच्या ओऱ्यांत सतरंजी अंथरून पडलों. जेवणानंतर दर्शन घ्यावयाचें ठरविलें. मनांत आलें कीं, जेवणाला बसतांना सोवळें नेसावें लागेल, कपडे काढावे लागतील. लागलींच मनानें धाय घेतली कीं— जानवें नाहीं! व जानवें नसेल तर तो महाभाग भरल्या पानावरून उठवील. रामजवळ तर जानवें कधींच नव्हतें. भाऊकाकाजवळ दोन होतीं. दोन जानवीं व तीन माणसें एकदम जेवावयास बसणार, तेव्हां एकामागून एकानें घालावें हेंहि शक्य नाहीं. पेंचप्रसंग निर्माण झाला.

डोळे मिटून देवाचें स्मरण केलें. तोंड सुचली. दोन जानव्यांचे सहा पदर होतात. दोन दोन पदरांचीं तीन करून प्रत्येकानें एक एक घालावें; व गळ्यांत दुहेरी करून घातलें तर पदर कमी आहेत हें लक्षांतहि येणार नाहीं. ठरल्याप्रमाणें केलें. जेवतांना आपोषणी व चित्राहुतीबद्दल व उठतांना आपोषणीबद्दल रामला माहिती दिली. बेसावधपणाला जागा ठेविली नाहीं. सर्वांचीं जेवणें ठरल्यावर आम्हांला बोलाविलें. फाटक्या धाबळ्या आम्ही नेसलों. भात व आमटीचा महाप्रसाद आम्हीं घेतला. रामनें चुकून दोनदां आपोषणी घेतली व अधिक चित्रावती घातल्या. पण कोणीं पाहिलें नव्हतें. भाग्य एवढेंच कीं—जेवण घातलें. जेवून कांहीं काळ विश्रान्ति घेऊन देवळांतील मुख्य गाभाऱ्यांत आलों. देऊळ कोणीं बांधलें, केव्हां बांधलें याची विचारणा केली. तेथील उपाध्यानें सांगितलें, चिमाजी अप्पा पेशवे वसईचा किल्ला लढवीत होते. विजय होईना. निदान माझें शिर तोफेच्या गोळ्यास बांधून तोफ उडवा, म्हणजे तें तरी किल्ल्यांत पडेल—अशी निर्वाणीची भाषा बोलूं लागले. त्याच सुमारास वज्रेश्वरीची यात्रा होती. अप्पा येथें आले. दर्शन घेतलें. दृष्टान्त झाला,—या रानावनांत माझी व्यवस्था नाहीं. तर परम देवभक्त दुष्टांचें शासन व सज्जनांचें संरक्षण करण्यास तुला उदंड सामर्थ्य मिळो ! चिमाजी नवस बोलला, 'माते, तुझे पांग फेडीन. सध्यां कामगिरी पुरी झाली नाहीं. यशाचा विडा पुरा झाला नाहीं. वसई फत्ते करतांच तुझी सेवा पुरी करीन.' उजव्या बाजूनें फूल पडलें. साक्षात्कार मानून अप्पांनीं तें घेतलें. विजयी झाले व लागलींच हें भव्य मंदिर, सदावर्ते, कायम उत्पन्न कौलं करून दिलें. असा हा इतिहास आहे. ४८ तासांपूर्वी वसईच्या किल्ल्यांत छत्रत्याग करून मी आलों होतों. ते सर्व विचार पुढें आले. नास्तिक म्हणून गाभाऱ्यांत आलों होतों. आस्तिक म्हणून मूर्तीपुढें उभा राहिलों. 'हे जगदंबे, या देशाला स्वातंत्र्य प्राप्त झाल्याबरोबर तुझ्या दर्शनाला येईन. आज मी धनहीन, सत्ताहीन आहे. आज नमस्काराशिवाय तुझ्या चरणीं वाहण्यासारखें कांहीं नाहीं.' अशी मनांत प्रार्थना करून साष्टांग नमस्कार करून परतलों. मित्रांना नवस सांगितला तेव्हां त्यांनीं थट्टा केली, व मींहि हें सर्व थट्टेंत केलें असें त्यांना वाटलें.

बरोबर ३० वर्षांनीं स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर विद्यमान वैभवानें मी ठाणें जिल्ह्यांत येणार होतों, व पालघरहून विरार, वसई करून कल्याणला जावयाचें

होतें.–व जवळचा रस्ता वज्रेश्वरीहून आहे असें सुरुवातीस उल्लेखिलेली व्यक्ति म्हणाली. तेव्हां मी म्हणालों ठीक. काय योगायोग आहे. आतां ' बोललेला नवस फेडतों.' मी नवस करीन अगर कधीतरी फेडीन हें त्या व्यक्तीला असंभाव्य वाटलें, व म्हणूनच तिनें सुरुवातीस उल्लेखिलेले प्रश्न विचारले; आणि जेव्हां सर्व हकीकत सांगितली तेव्हां त्यांनाहि पटलें. मनुष्य हा विरोधांचा संचय आहे, व म्हणूनच त्याचें वैशिष्ट्य आहे. सांगण्याचें तात्पर्य, मीं दर्शनाचा नवस फेडला. नास्तिकांच्या मनाला धक्का दिला. सनातनी व आस्तिक यांना मी जवळचा वाटूं लागलों. खरें सांगावयाचें म्हणजे हजारों वर्षांच्या संस्कृतीच्या पाशांतून सर्वस्वीं कोणी सुटत नाहीं. नवसाला देव पावतात हें पावत नाहींत इतकेंच खरें नाहीं का ? तरी पण पुन्हा मी नवस करणार नाहीं याची खात्री नाहीं.



पुण्याजवळील इतिहासप्रसिद्ध अशा प्रदेशांतून आमची मोटर जात होती. ज्या रस्त्यानें आम्ही जात होतों तोहि रस्ता मराठ्यांच्या इतिहासांत महशूर होता. उत्तरेला स्वारी करण्यासाठीं जाण्याचा मराठ्यांचा तो मार्ग होता. प्रदेशांतील बहुतेक गांवें नाणावलेल्या मराठे सरदारांना पूर्वीच्या पराक्रमासाठीं दिलेलीं असून, आज पराक्रम न करण्याच्या शर्तीवर तीं इंग्रजानें चालू ठेवलीं असावींत. आमची मोटरहि एका सरदाराच्या कृपेनें मिळालेली होती. मराठे विजयादशमीच्या मुहूर्तानें स्वारीला निघत, व मृग-नक्षत्र लागण्यापूर्वी परतत. आणि आम्ही मृगनक्षत्र लागण्याच्या दिवशींच बाहेर पडलों होतों. आमच्या प्रवासाचें ध्येय 'चलो दिल्ली' नसून 'चलो विसापूर' होतें. विसापूर नांव उच्चारतांच गेल्या अर्ध्या शतकाचा इतिहास अनेकांच्या डोळ्यांपुढें उभा राहील. तुरुंगसुधारणासमितीच्या कामानिमित्त आम्ही जात होतों. मुंबई प्रान्तांतील राजकीय कैद्यांना तीव्रतेनें वागवणारा येरवडा (राजमहाल) याला डावी घालून आम्ही पुढें जात होतों, व कैद्यांना अमानुषपणें वागवण्यांत नामवंत झालेल्या विसापूरकडे जात होतों. सकाळची वेळ होती, व भोंवतालचा प्रदेश जरी रुक्ष दिसत असला, तरी सूर्याच्या बालकिरणांनीं त्यांत किंचित् सौम्यता आली होती. जाधवांची वाघोली, कंदाची लोणी पाठीमागें टाकून आमची गाडी पुढें जात होती. डाव्या बाजूचें इतिहासप्रसिद्ध फुलगांव, तेथील पेशव्यांचा रेखीव वाडा, व विशाल घाट माझ्या मनश्चक्षूपुढें उभे राहिले; आणि तेथूनच थोड्याशा अंतरावर असलेलें तुळापूर,—ज्या ठिकाणीं भीमा, भामा व इंद्रायणी यांचा त्रिवेणी-संगम आहे, तें नयनमनोहर दृश्य विचाराच्या चितान्यानें क्षणांत रंगाविलें. आणि त्याच ठिकाणीं धर्मवीर संभाजीचा अमानुषपणें मोगल बादशहानें केलेला अंत—परिचयानें स्वभाव बनलेल्या अहिंसेनें मनाला फार वेळ पाहूं दिला नाहीं. लक्षावधि मोगल सैन्याचा अंवतींभोंवतीं तळ पडला आहे, आणि धाडसानें व दांडगाईनें जीविताची तमा न बाळगतां त्या सेनासागरांत

शिरून धांदल उडविणारे मराठे वीरहि डोळ्यांसमोर उभे राहिले. आणि हा प्रदेश,–ज्यांतील मातीचा कणन् कण मराठ्यांच्या मोठेपणाची, बुद्धिमत्तेची साक्ष देत आहे,–आमच्या गाडीनें झपाट्यानें आक्रमिला, व भीमेच्या तीरावर आम्ही येऊन ठेपलों.

समोर पंढरपुराकडे धांव घेणारी भीमा नांवाप्रमाणेंच ओबडधोबड अशी दिसत होती. पण भीमा म्हटल्याबरोबर माझ्या मनांत नितान्त आदर उत्पन्न होतो. त्याचें कारणहि तसेंच आहे – आणि तें केव्हां तरी वाचकांना विश्वासांत घेऊन मी सांगेनहि. आज वास्तविक उन्हाळा असून पाण्याचा प्रवाह येथें असेल अशी भावनाहि नव्हती. तथापि आपत्कालांत ज्याप्रमाणें सन्मित्र शक्तिनुसार मदत करतो, तद्वत् अल्पसा कां होईना, पण पाण्याचा प्रवाह चालू होता. एवढ्यांत रस्त्याच्या उजव्या बाजूस चौकोनी परिसरांत उंच दगडी चबुतऱ्यावर उभारलेला दगडी स्तंभ गाडींतील स्नेह्यानें पाहिला व त्यानें विचारलें, “हा कसला जयस्तंभ?” मीं त्यांना सांगितलें, “त्याचा मोठा इतिहास आहे. आपण तो संध्याकाळीं परततांना पाहूं.” नंतर मी त्यांना म्हणालों, “पहा, नदी कशी बांक मारून पुढें जात आहे.” त्यानें सांगितलें, “होय बा, दिसतें खरें तसें.” आणि मी म्हणालों, “त्याचेंहि कारण संध्याकाळीं सांगेन.” आमचें हें भाषण होईपर्यंत आमच्या गाडीनें भीमा ओलांडली. भिमथडी तट्टें घेऊन मराठ्यांनीं अटकेपार झेंडे लावले. त्या भिमथडीच्या राहाळांत आज माकणीचें घोडेंसुद्धां दिसत नाहीं. ‘हाफ टनी’ गाड्यांचा सुळसुळाट मात्र सर्वत्र नजरेस येतो. रस्त्याच्या आजूबाजूस दिसत असलेलीं खेडीं भग्नमनोरथ झालेल्या माणसाप्रमाणें दिसत होतीं. निम्म्यावर घरें पडलेलीं, निम्मींएक मोडकळीस आलेलीं,–व एखाददुसरें चांगलें दिसावें,–बहुधा तें सावकाराचें असावें असें सर्वमान्य चित्र होतें. हा अनुभव निवडणुकीच्या प्रचारांत शेंकडों खेड्यांना भेट देतांना आला होता. किल्ले-वजा वाडा असावा,–बाहेरच्या भिंती फक्त उभ्या व आंतलें सर्व वैभव जमीनदोस्त झालेलें! हीच अवस्था सर्वत्र दिसून येते. वाडा देशमुखांचा; पण विद्यमान देशमुख देशमुखी करण्याऐवजीं मोटर क्लीनरचें काम करीत आहेत! वाडा देशपांड्यांचा,–फक्त दिंडी दरवाजा शिल्लक; बाकीचें वैभव खलास. आणि विद्यमान देशपांडे मामलेदार कचेरींत अर्ज लिहिण्याचें काम करीत आहेत! हाहि अनुभव आलेला आहे. एके काळीं ज्यांनीं चौथ व

देशमुखी उत्तर व दक्षिण भारतांत बसविली, त्या मराठ्यांच्या मायभूमींत आज दुष्काळ, भीति व कलह यांनीं संपूर्ण कब्जा बसविला आहे. असे विचार मनांत येत आहेत, जात आहेत,–तों आम्हीं घोडनदी गांठली. आणि ज्या घोडनदीचा लौकिक पराक्रमी रिसाल्याबद्दल होता, त्या ठिकाणीं आज मोटरी, गाढवें, व शेव-डाळ-गांठी यांचीं हॉटेलें नजरेस आलीं. शहाजी-राजांच्या सुपें प्रान्तांतून आम्ही जात होतों. इतका उजाड, खडकाळ प्रदेश क्वचितच सांपडेल. त्यांतूनच वाट काढीत थोड्याच वेळांत आम्ही विसापूरच्या तुरुंगाच्या प्रवेशद्वाराजवळ आलों.

सभोंवार मीं पाहिलें, पण कोठेंहि भेवडवणाऱ्या भिंती नव्हत्या. पश्चिम बाजूस प्रचंड तलाव डोंगरांतून येणाऱ्या उष्ण वाऱ्यांना सौम्य व शीतळ करून पुढें पाठवीत होता. डोक्यांत उत्पन्न होणारे तीव्र विचार रसवंतीनें, मधुर भाषेनें सौम्य व सह्य करून श्रोतृजनांना ऐकवावे असाच थोडासा प्रकार होता. तीन तास आम्ही सर्वत्र हिंडलों, आणि जेव्हां तलावासंबंधींची हकीकत बंधाऱ्याजवळील स्फटिकावर लिहिलेली वाचली, त्या वेळीं मनुष्य योजकतेनें काय करूं शकणार नाहीं असा आत्मविश्वास वाटला. १८९७ सालीं सिंध प्रान्तांतील रानटी व बदमाष 'हूर' कैद्यांच्या साहाय्यानें ज्या तलावाच्या बांधकामास सुरुवात झाली, दक्षिणेंतील अट्टल गुन्हेगारांच्या साहाय्यानें (Deccan Gangs) ज्याचें काम चालू ठेवण्यांत आलें, व २१–२२ सालांतील राजकीय चळवळींतील कैद्यांनीं ज्या प्रचंड तलावाच्या बांधकामाची शेवटची टोपली टाकली,–तो हा प्रचंड तलाव पाहून मन उद्विग्नहि झालें व उल्हसितहि झालें. ३० वर्षें हजारों कैद्यांनीं खपून बांधलेल्या या तलावानें शेंकडों एकर जमिनींना पाणी मिळालें. देशाच्या संपत्तींत भर पडली, निर्जल प्रदेश सजल झाला; पण हें कसें घडून आलें ? गुरांना एका दावणींत बांधावें त्याप्रमाणें एका सांखळींत अनेक कैद्यांना बांधून, मानवतेला न शोभणाऱ्या वर्तनानें काम करून हें सुंदर दृश्य व ही संपत्ति निर्माण झाली होती. समाजांतील नीतिनियमांना झुगारून चालणाऱ्यांना समाजानें प्रायश्चित्त द्यावें हें योग्य; पण प्रायश्चित्तांतहि कांहीं तरी विवेक, कांहीं तरी मानव्य असावें कीं नाहीं ? संपन्नतेचें शिखर अवनत मार्गांनींच गांठावयाला पाहिजे असें आहे का ? आणि ज्यांनीं या गुन्हेगारांपेक्षांहि समाजाचा व

राष्ट्राचा अधिक द्रोह केला व करीत आहेत त्यांना आज समाज कांहीं करूं शकत नाहीं, हेंहि खरें आहेच कीं ! त्यांना कोण सुधारणार ? निदान येथें काम केलेल्या गुन्हेगारांनीं ठळक व नजरेस भरेल अशी निश्चित सेवा केली याची साक्ष आमच्या डोळ्यांसमोर उभी होती. दुपारभर हाच व असेच विचार डोक्यांत घोळत होते.

संध्याकाळच्या वेळेला परत निघालों त्या वेळींहि ह्या विचारांचें चक्र थांबलें नव्हतें. अशाच विचारांत असतांना भीमेच्या कांठावर आमची गाडी आली, आणि पुन्हा वर उल्लेखिलेला स्तंभ दृष्टिपथांत आला व आम्हीं गाडी थांबवली. जवळच दुसरी एक रिकामी गाडी होती. आम्ही उतरून जयस्तंभाकडे चालूं लागलों. प्रशस्त मैदान व चारी बाजूंना लोखंडी गजांचें कुंपण घातलेलें असा प्रकार होता. दरवाजा उघडण्याचा आम्हीं प्रयत्न केला, पण जमलें नाहीं म्हणून कसलेल्या मराठी वीराप्रमाणें कुंपणावर चढून आम्हीं पलीकडे प्रवेश केला. सुमारें २५ × २५ व ६ फूट उंचीच्या चौकोनी चौथऱ्यावर तितकाच उंचीचा, साधारणपणें पायाशीं ६ फूट रुंद असलेला – वरतीं निमूळता होत गेलेला जयस्तंभ आम्हीं पाहिला. आणि माझ्या स्नेह्याला मी म्हणालों, "मधल्या स्फटिकावर काय लिहिलें आहे तें वाचा." "१ जानेवारी १८१८ रोजीं ह्या ठिकाणीं झालेल्या लढाईत ज्यांनीं ब्रिटिश सरकारसाठीं धारातीर्थीं पतन केलें, व पतन करून देशाच्या शत्रूचा नाश केला–त्यांच्या स्मरणार्थ हा जयस्तंभ आहे ! आणि त्याखालीं प्रमुख वीरांची नामावळी होती. आणि त्या नामावळींत एक दोन इंग्रज सोडून बाकी सर्व या देशांतील संतानांचीं नांवें होतीं. कोणी सुभेदार होते, कोणी डफेदार होते, कुणी जमादार तर कोणी हवालदार होते. त्यांत हिंदु होते, महार होते, मराठे होते, आणि मुसलमान होते. या सर्वांनीं देशाच्या शत्रूचा पराभव करण्यासाठीं कंपनी सरकारच्या वतीनें लढतांना सद्गति प्राप्त करून घेतली होती. १ जानेवारी १८१८ – खिस्ती वर्षाचा प्रथम दिवस. दक्षिणेंत ब्रिटिश अंमलाचा पाहिला दिवसच ठरला. खडकीला पराभूत होऊन, किंबहुना न लढतां पळून येऊन मराठी सैन्यानें कोरेगांवनजीक आडव्या आलेल्या कंपनी सरकारच्या सैन्यावर हल्ला केला होता. रावबाजीनें धीर धरला असता, व लढाईचा निर्णय लागण्यापूर्वीच रणांगण सोडलें नसतें,–तर हा विजयस्तंभ येथें दिसला नसता. कोरेगांवहून पळून अष्टीच्याहि रणक्षेत्रांतहि रावबाजीनें तेंच

केलें; आणि शेवटीं ब-हाणपूर मुक्कामीं फिरंग्यांच्या हातांत एखादी खाजगी मालमत्ता द्यावी त्याप्रमाणें मराठ्यांचें राज्य दिलें. मी व माझे स्नेही पुनः पुनः तीं नांवें वाचीत होतों व पुनः पुनः एकमेकांकडे बघत होतों. त्या थोड्या क्षणांत आमच्या उभयतांच्या मनांतून शेंकडों वर्षांचा आमच्या महाराष्ट्राचा इतिहास झपाट्यानें जात होता. पांच हजार मैलांवरून मूठभर इंग्रजांनीं यावें, हातांत तराजू घेऊन आमच्याच हातांतील तलवारीनें आमचेंच तख्त मिळवावें, व शेवटीं इंग्रजांचें निशाण हिंदी माणसाकडून लावून "गेले ते इंग्रज व राहिले ते पेशवे" अशी सोज्ज्वळ तात्त्विक भूमिका या दुर्घट घटनेला यावी,–यापेक्षां ह्या इतिहासाचा दुसरा अन्वय व अर्थ कोणता? संताप, लज्जा, तिरस्कार, अवमानिता इत्यादिकांच्या लहरी मनामध्यें उचंबळून आल्या. पण इतिहास कोणाला बदलतां आला आहे? परंतु इतिहास मार्गदर्शक असूंच नये का? एका देशाचे, एका धर्माचे, एका भाषेचे हे सुपुत्र एकमेकांविरुद्ध उभे राहतात हें कशाचें द्योतक, व कशामुळें? भाषेहून अधिक, धर्माहून श्रेष्ठ, संपत्तीहून मौल्यवान्,–कीं ज्यासाठीं जगावें आणि मरावें असें कांहीं आहे कीं नाहीं? आपला स्वार्थ म्हणजे देशाचा स्वार्थ व सेवा, असें गणित कसें बरोबर म्हणतां येईल?

आम्ही दोघे एकमेकांकडे पहात होतों व आलटून पालटून जयस्तंभाकडे पहात होतों. पुन्हा पुन्हा तेहि नांवें वाचीत होते व मीहि नांवें वाचीत होतों. भावनेनें त्यांच्या वाणीला गोठून टाकलें. माझीहि तशीच स्थिति झाली. आम्हीं जयस्तंभाला प्रदक्षिणा घातली. चारी बाजूंवर लढाईतील वीरांचीं नांवें,–व कोणीं जयस्तंभ बांधला, आणि कशाचा हा पुरावा आहे हें कोरलें होतें. पुन्हा आम्ही त्या स्फटिकापुढें आलों, आणि माझे स्नेही म्हणाले, "आमच्या हिंदी संस्कृतींतील त्याज्य वृत्तींचा हा जयस्तंभच नव्हे का?" मीं म्हटलें, "निराळ्या अर्थानें तें खरें आहे. ज्यांना आम्हीं सामाजिक दृष्ट्या जवळ केलें नाहीं, ज्यांच्या स्पर्शानें आम्ही अपुनीत होतों असें मानलें, ज्यांना आम्ही साध्या माणुसकीचे हक्क देण्यास तयार नव्हतों, त्यांना ज्यांनीं स्वार्थानें कां होईना जवळ केलें, व त्यांच्यांतील माणुसकी व पराक्रम प्रदीप्त केले, त्यांची योजकता तर आपण मान्य केलीच पाहिजे. विद्यमान हिंदु संस्कृतीला व हिंदी राष्ट्रीय वृत्तीला हा जयस्तंभ हा एक आव्हान आहे. भविष्यकालांतील मार्ग काढतांना अचूक वाट दाखविण्या-

साठीं व संकटें टाळण्यासाठीं हा दीपस्तंभ आहे. काय करावें व काय करूं नये असें अन्वय-व्यतिरेकानें सांगणारा राष्ट्रीय स्मृतिग्रंथच हा नव्हे काय!"

"तुम्ही फार कल्पक आहांत," असें माझा स्नेही म्हणाला. मी म्हणालों, "नव्हे, मी अगदीं वास्तववादी आहें, आणि आतां परदास्याची रात्र संपली आहे. आज जूनची ९ वी तारीख आहे, आणि अवघ्या थोड्या दिवसांत आमचें स्वातंत्र्य आम्हांस मिळणार आहे. एक जानेवारी १८१८ चा संग्राम संस्मरणीय व्हावा म्हणून उभारलेला हा जयस्तंभ २ जून १९४७ रोजीं अपार्थिव व नैतिक अर्थानें स्मृतिशेष झाला आहे. १२९ वर्षांनीं हें सुतक फिटलें आहे. आपल्याच बालकांनीं आपल्यालाच परदास्यांत आणलेलें पाहून किंचित् बांक घेऊन गेलेली भीमा परत सरळ वाहूं लागेल; गोदावरी, कृष्णा या दुआबामधील पुरुष पुन्हा पराक्रमी, पुन्हा तेजस्वी होतील, व पुन्हा अटकेपर्यंत — व पारहि नवभारताचा झेंडा नेतील. असें सांगतात कीं, कोरेगांवच्या लढाईनंतर भीमेचा प्रवाह बदलला. इतिहासाचाच प्रवाह बदलला, आणि त्याचें पार्थिव स्वरूप म्हणून भमेचा प्रवाह बदलला."

एवढ्यांत मोटरची घरघर सुरू झाली म्हणून आमची दृष्टि कुंपणाच्या बाहेर उभ्या असलेल्या दुसऱ्या मोटरीकडे वळली. त्यांत एक ब्रिटिश लष्करी ऑफिसर व त्याची पत्नी अशीं दोघें होतीं. पुण्याकडे गाडी वळतांना पाहून पुन्हा पुन्हा दोघेंहि जयस्तंभाकडे पहात होतीं. तें पाहून मीं माझ्या स्नेह्याला म्हणालों, "पहा, इंग्रज अधिकाऱ्यांना ज्या साधनांनीं भारताचें राज्य मिळालें, व ज्याचें पार्थिव दृश्य म्हणजे हा जयस्तंभ आहे,— ती आतां शक्तिहीन झाली, वठली; आणि म्हणूनच त्यांचें शेवटचें दर्शन ब्रिटिश सत्ता या लष्करी अधिकाऱ्याच्या रूपानें घेत आहे असाच याचा अर्थ नाहीं का?

"आणि तुमच्या मनांत अविवेकानें जर क्षणभर विध्वंसक विचार आला असेल, तर निराळ्या अर्थानें हा जयस्तंभ — जयस्तंभ ठरला आहे!"

स्नेह्याला पटलें कीं नाहीं कोणास ठाऊक, पण त्याचा चेहरा खुलला!

आणि आम्ही पुण्याकडे परतलों.

● ●

# ५ : ती रात्र!—

" हें पहा, तुमच्याशीं मी आतांपर्यंत अत्यंत समजूतदारपणानें वागलों. " ( You see, I have been very reasonable towords you. ) इंग्रजी पोषाखांतील जाड बांध्याचा, मध्यम उंचीचा हिंदी पोलिस अधिकारी कांहींसा ठसक्यांत बोलला. आवाज, आशय व अभिनय या तिन्हींवरून त्यानें जणूं कांहीं अंतिम खलिता देऊन पुढील घटनेची सूचनाच दिली होती. वेळ मध्यरात्रीनंतरची होती. पण पहांटेची चाहूल लागण्यास अजून अवकाश होता. भोंवतीं पाऊस पडल्यानंतरचा होणारा मुंबईतील निस्तेज करणारा उकाडा तडफडवीत होता. ज्या स्थळीं ही वाणी शब्दरूपानें बाहेर पडली होती तें स्थळ सामान्य जनतेचें नव्हतें व असामान्य जनताहि क्वचितच तेथें जाण्याचें अगर राहण्याचें पत्करते. मी व बोलणारी व्यक्ति समोरासमोर होतों. उजवीकडे बंद केलेला जाळीचा दरवाजा होता. डावीकडे बारीक जाळी असलेल्या मोठमोठ्या खिडक्या होत्या. त्यांतून मुंबईतील चुकार वारा आंत येण्याचा प्रयत्न करीत होता. आंतील प्रकाश बाहेरील अंधार ठळकपणें दाखवीत होता. माझ्याभोंवतीं कांहीं नागरी पोषाखांतील तर कांहीं पोलिसी गणवेषांतील लोक उभे होते. सन १९४३ सालांतील सप्टेंबर महिन्यांतील बहुतकरून ती ७ तारीख होती. १९४२ च्या ऑगस्ट ८ ला रात्रीं अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीच्या बैठकींत ' करेंगे या मरेंगे ' ही घोषणा केल्यावर त्या दोहोंपैकीं कांहींहि न करण्याचें महाभाग्य ज्यांना इंग्रज सरकारनें लाभूं दिलें त्यांपैकीं मी एक ' महान् नेता ' होतों. काय करावयाचें, कसें मरावयाचें, याचा विचार करण्यापूर्वीच न करतां व न मरतां मी येरवड्याच्या ' स्वराज्य-भवनां 'त या प्राचीन देशाच्या स्वातंत्र्या-साठीं कष्टमय जीवन व्यतीत करीत होतों !! जे पहिल्या झपाट्यांत सुटले, त्यांपैकीं कोणीं काय केलें व कोण मेले याचा इतिहास अनंत कालपर्यंत अज्ञात राहणार हें निश्चित. चित्त आणि वित्त सुज्ञ कोणाला सांगत नाहींत. राष्ट्रानेंहि तसेंच असावें असें माझें ' प्रामाणिक ' मत आहे. अज्ञात

इतिहासाच्या भांडवलावर मुत्सद्दी, कवि, कादंबरीकार व राजकारणांतील हैदरअली यांचा योगक्षेम चालतो. आणि जर का वास्तविक इतिहास ज्ञात झाला, तर कित्येक वाघ बेगडी ठरतील, व सिंह अन्य कांहीं ठरतील. तेव्हां स्वातंत्र्याची प्रभात होण्यापूर्वीचा हा इतिहास काळोखांतच असणें इष्ट आहे. तात्पर्य, जे तुरुंगांत आले ते पुढारी ठरले, व जे बाहेर राहिले ते भूमिगत व क्रान्तिसिंह ठरले. निदान माझा तरी तसा दृढ विश्वास आहे.

मी एक महान् पुढारी म्हणून शिवाजीनगर स्टेशनवर ता. ९ ऑगस्टला पकडला जाऊन येरवड्यांत स्थानबद्ध झालों होतों. हजारों राजबंदी त्या वेळीं तेथें होते, व प्रत्येकाला आपल्या पुढारीपणाची खात्री व जाणीव असल्यानें उचित रुबाबांत ते सर्व वागत होते. ४२ च्या ऑगस्टनंतर येरवड्याच्या तुरुंगांतील कथा युद्धांतील वार्तांप्रमाणें रम्य, पण कांहींना त्यांची जाणीव दीर्घकाल रहावी अशाच होत्या. लाठीहल्ले, गोळीबार, पलायनें, तसेंच अहिंसात्मक प्रचार, प्रवचनें व चर्चा इत्यादिकांनीं तो काल गजबजून गेला होता. राजबंदींची अवस्था आजच्या निर्वासितांपेक्षांहि प्रसंगीं खडतर होती. वरतीं आकाश, खालीं धरणी, नेसण्यास जवळ जवळ वल्कलें, भोजनास – वर्णन करणें कठीण, अशी स्थिति होती. सर्व जेलची व्यवस्था कोलमडली होती. त्यांतहि अन्य प्रक्षोभक घटना होत होत्या. बाहेरील घटना तर तशा स्वरूपाच्या होत्याच, पण आंतहि व्यक्ति व वृत्तिपरत्वें नाना भानगडी चालूच असत. गांधीवाद्यांचीं नानास्वरूपी 'अनशनें' म्हणजे उपवास, समाजवाद्यांचे कुडांलासुद्धां तुंबड्या लावण्याचे उद्योग, पूर्वीचे अन्यपक्षीय पण कॉंग्रेसचा चालता काळ पाहून तिला मिळालेले – पण आतां पस्तावलेले यांचा पंचमस्तंभी उपद्व्याप,– यांनीं तुरुंगांतसुद्धां मानसिक स्वास्थ्य मिळणें कठीण केलें होतें. तथापि या सर्व विवंचनापूर्ण वातावरणांत राहून साहित्य प्रसवणारे व विवाह जमविणारे स्थितप्रज्ञ अगदीं नव्हतेच असें नाहीं. परंतु बंधनकाल अमर्यादित असल्यामुळें, उत्साह विरून उदासीनता येई, व उदासीनतेचें पर्यवसान मनें तडकण्यांत व बुद्धि विपरीत होण्यांत होई. एकंदर वातावरण साहजिक स्फोटक होत गेलें. जेलची शिस्त बिघडली म्हणून व त्याला कारण राजबंदी असें समजून अधिकाऱ्यांनीं सुमारें १५० निवडक राजबंद्यांना बेळगांव, नाशिक व साबरमती या ठिकाणीं

धाडण्याचें ठरविलें होतें, व यांपैकीं साबरमतीच्या तुकडीमध्यें मी असल्यामुळें मी मुंबईला आलों होतों.

येरवडा सोडतांना ज्या रीतीनें टोळ्या करण्यांत आल्या होत्या त्यांत सरळपणा नव्हता. तसेंच येरवड्याहून निघतांना जेलच्या नियमांचा भंग करून सर्व चाललें होतें. कांहींना तर पोलिसांनीं उचलून गाडींत ठेवलें होतें. सरळ गाड्या पुण्यास न नेतां खडकीला आम्हां सर्वांना नेण्यांत आलें होतें. तथापि आमच्यांतील बहुतेक बाहेर बातम्या धाडण्यांत निष्णात असल्यामुळें खडकी स्टेशनवर बहुतेकांच्या इष्ट देवता व जानी दोस्त हजर होते. व त्यांपैकीं कांहींनीं आमच्याबरोबर मुंबईपर्यंत प्रवासहि केला. दादरवर आम्हीं उतरलों, व आमचा म्हणजे १० बंदींचा चार्ज मुंबईच्या पोलिसांना देण्यांत आल्यानंतर आम्हांला वेटिंग-रूममध्यें ठेवण्यांत आलें. साबरमतीची गाडी दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं असल्यामुळें आम्हांस ती रात्र व दुसरा दिवस मुंबईस काढणें भाग होतें. पोलिसांना आमच्याबद्दल विश्वास असल्यामुळें जो तो वेळेवर परत येतों म्हणून, सांगून आणि लागेल त्या हॉटेलांत जेवून–व आणखी कांहीं कामें करून परत आला होता. रात्रीचे दहा वाजले. आमच्यांपैकीं एक असामी आग्रह करूं लागला, आपण सेंट्रलवर रात्र काढूं. तेथें व्यवस्था ठीक होईल. मी या बेताच्या विरुद्ध होतों. कारण तेथें पोलिस अधिक शिस्त दाखवितील ही भीति होती. पण पुढारी असल्यामुळें अनुयायांच्या म्हणण्यास मान देऊन पोलिस अधिकाऱ्याला तशी व्यवस्था करण्यास सांगितलें. त्यानें याकरितां मोटरीची मागणी वरिष्ठांकडे केली. पण त्याला हुकूम आला कीं, आम्हां सर्वांना लॉकअपमध्यें घेऊन जावें, मोकळें ठेवणें इष्ट नाहीं. ज्या गृहस्थांनीं सेंट्रलवर जाण्याची ही सूचना केली होती ते म्हणाले कीं, आपण हालणार नाहीं. पण पोलिस अधिकाऱ्यांनीं उचलून ठेवण्याची सूचना करतांच यशस्वी माघार घेऊन सर्व तयार झाले ! भायखळा व किंग्ज सर्कल या दोहोंमध्यें विभागणी करण्यांत आली. भायखळ्याचा दुर्लौकिक ऐकला होता, म्हणून किंग्ज सर्कलकडे मीं जाण्याचें ठरविलें. निदान राजाचें नांव असलेल्या जागेंतील लॉकअप उत्तम असेल असें मी समजलों ! मी व अन्य चार असे पोलि सव्हॅन-मधून सुमारें १२ च्या सुमारास रात्रीं किंग्ज सर्कलच्या लॉकअपमध्यें आलों.

तेथील अधिकाऱ्यानें आम्हांस नीट न्याहाळलें. चौघे टेबलासमोर उभे राहिले. अस्मादिक खुर्चीवर विराजमान झाले. प्रत्येकाचें नांव, त्याच्या वस्तु

यांची नोंद झाली. माझी पाळी येतांच त्यानें विचारलें, 'परवानगीशिवाय तुम्ही कसे बसलांत?' आधींच दिवसभर गरम वातावरणांत मी होतों. येरवड्याहून निघतांना बाचाबाची झाली होती. खडकी स्टेशनवर इष्ट देवता आली होती, पण फारशी बोलली नाहीं व मुंबईला येण्याचें तर तिनें टाळलें, या घटनेनें पारा अधिक चढला होता. इतरांच्या प्रवासांतील लाजरें व नाजूक पाथेय पाहून मनांत मत्सर उत्पन्न झाला होता; यामुळें परिस्थिति स्फोटक झाली होती. विचारलेल्या प्रश्नानें भडका उडणार असें माझ्या सवंगड्यांना वाटलें असलें पाहिजे असें त्यांच्या चेहऱ्यावरून दिसत होतें. उत्तराला प्रत्युतर देण्याची मराठी रगेल वृत्ति माझ्यांत नव्हती असें नाहीं. स्थल, काल, पुरुष, व प्रसंग या चौघांनीं माझें धोरण जणूं निश्चित केलें होतें. निश्चय नम्र भाषेंत सांगणें अवश्य होतें. एक बाण वायां गेल्यास अन्य बाणांची व्यवस्था होईलच असा विश्वास नव्हता. एका क्षणांत विद्यमान व भविष्य यांचें आकलन करून दीर्घपरिणामी शब्द उच्चारावयाचा होता. अगदीं शान्त व गंभीर वाणीनें मीं उत्तर दिलें, "मी आरोपित नाहीं, अगर शिक्षा झालेला कैदी नाहीं, मी स्थानबद्ध आहे व बाहेरील जीवनांत प्रांताच्या गव्हर्नरइतका दर्जा असलेला इसम आहें. पोलिस अधिकारी कोणाशीं बोलत आहे हें जाणत नाहीं." (Police officer does not know whom he is speaking to; I am not on undertrial nor a convict. I am a detenue and outside I hold as a high position as that of the Governer of the province.) सुटलेला बाण व बोललेला शब्द परत येत नाहींत. आव तर मोठा आणला. सिंहाच्या कातड्यांत दुसरें कांहीं निघणार नाहीं, ना अशी शंका क्षणभर मनाला आली. आधीं पुणेरी, त्यांतच कॉंग्रेसवाला, व त्यांत महाराष्ट्र प्रान्तिक कॉंग्रेसचा अध्यक्ष. केवढा मान व केवढी सत्ता!!" आणि जर या स्थितींत डोक्यांत उन्माद न आला तर मुक्त किंवा मंदच मी असलों पाहिजे हें उघड होतें. आणि त्यांत म. प्रां. कॉं. चा अध्यक्ष म्हणजे महाराष्ट्राचा गव्हर्नर असा उल्लेख मुंबईतील धूर्त वर्तमानपत्रें करीत आलीं होतीं. तात्पर्य, माझें बोलणें साधार होतें, करणें समर्थनीय होतें. पुढारी आपल्या घोषणेचा परिणाम अनुयायांवर झाला म्हणजे धन्यता मानतात, पण या प्रसंगीं तो अधिकारी जर न नमला तर अनुयायांची सहानुभूति अर्थहीन होती. शिवाय कठीण प्रसंगीं कामास येणें

ई आधुनिक अनुयायांचें लक्षण नाहीं. चालत्या काळांत पुढाऱ्याबरोबर यक्क सांगणें, व पडत्या काळांत त्यांवर दोष टाकून पाय काढणें, हा अभिजात अनुयायांचा धर्म आहे.

एकंदरीनें मी पोलिस अधिकाऱ्याच्या तोंडाकडे पहात होतों. त्यानें मला नांव विचारलें. वाणी अधिकारापेक्षां सभ्यतेकडे झुकलेली दिसली. मी म्हणालों, "एन्. व्ही. गाडगीळ." "काकासाहेब का?" "होय." झालें! मैदान मारलें ही खात्री झाली. नंतर सर्वांना त्यानें खुर्च्या दिल्या. सर्व नोंद झाली. चष्मा ही मौल्यवान् वस्तु आहे, सबब ती द्या अशी अधिकाऱ्यानें मागणी केली. मी म्हणालों, 'चष्म्याशिवाय अंधारसुद्धां मला दिसणार नाहीं.' विनोदानें पूर्ण यश दिलें. थोड्या वेळांत त्यानें आम्हां पांच जणांना व्हरांड्याला लागून असलेल्या लॉकअपजवळ आणलें, व एका लहान खोलींत पांचांनाहि जाण्यास सांगितलें. मी म्हणालों, 'पांचजण येथें निजणें अशक्य आहे. आम्ही जाणार नाहीं.' आणि हें उत्तर ऐकूनच सुरुवातीस उल्लेखिलेलें वाक्य अधिकाऱ्यानें उच्चारलें. प्रसंग असा होता,— अधिकाराचा उपयोग करून जर त्यानें जबरदस्ती केली तर काय? तथापि पुन्हा मी म्हणालों, 'वाईट वाटावें असें कांहींच तुम्ही केलें नाहीं.' (That is not a matter of regret.) तोहि गोंधळला. समजूतदारपणानें वागणें पोलिसी सृष्टींत तो वर्ज्य गोष्ट समजत असला पाहिजे. त्याला काय बोलावें व काय करावें हें सुचेना. एवढ्यांत खोलीच्या दारावर 'For three prisoners' 'तीन कैद्यांसाठीं) अशी पाटी आमच्यापैकीं एकानें पाहिली, व मला दाखविली. मी म्हणालों, 'पहा, याप्रमाणें तुम्हीं करावें हें इष्ट.' झालें! त्यानें अन्य कैदी सुमारें ७ एका खोलींत कोंडून, दोन खोल्यांत आम्हां पांचांना घातलें. एका खोलींत मी व मुंबईचे याज्ञिक असे शिपायानें कोंडले. दार लावलें. 'गुड नाइट' करून अधिकारी गेला. एक अंक संपला; हायसें झालें;— पण——

आपत्तींतून आपत्तीच जन्मते म्हणतात, तसेंच झालें. यापूर्वी अनेक कोर्टांच्या व पोलिसी लॉकअपमध्यें राहण्याचा प्रसंग आला होता. त्यामुळें सुरुवातीस तरी कांहीं विशेष असें वाटलें नाहीं. दिसण्यास खोली उंच, साधारण रुंद, जाळीचा पण प्रशस्त दरवाजा, डोक्यावर विजेचा दिवा,

खालीं लाकडी तक्तपोशी,– याप्रमाणें सजली होती. अन्यत्र आढळणारीं मलमूत्रविसर्जनाचीं साधनें तेथें नव्हतीं, व यामुळें नेहमीं अनुभवाला येणारी घाण नव्हती. मनाला वाटलें, तीन-चार तास झोंप चांगली मिळेल, सुप्रभात होईल, व सर्व कांहीं ठीक होईल. मी व याज्ञिक यांनीं बिछाने पसरले व आम्ही अंथरुणावर पडलों. अंगावर हळूहळू कांहीं तरी पडल्यासारखा भास झाला. बाजूनें खुटखुट ऐकूं येऊं लागलें. नंतर शरीराला कोणी दंश करीत आहे याची जाणीव झाली. गादीवर बसलों, तर वरून ढेकूण पडत असल्याचें आढळून आलें. दोन तीन उंदीर इतस्ततः पळत असल्याचें दिसलें. बिछान्यावर जणूं टिकल्या काढून नक्षी केली आहे असें वाटलें. वरूनच ढेकूण पडत होते असें नाहीं; त्यांचा मोर्चा चारी बाजूंनीं येत असल्याचें दिसून येत होतें. पुढें, मागें, वर, खालीं,– दशदिशांनीं हें आक्रमण चालू होतें. जणूं कांहीं सर्पयज्ञांत ज्याप्रमाणें दशदिशांनीं सर्प येऊन होमकुंडांत पडले,–तसेंच होत होतें. याज्ञिक तर शेजारींच होता. क्षणभर वाटलें कीं, यानें तर हा यज्ञ नाहीं ना सुरू केला? या मत्कुणयज्ञांत फरक एवढाच होता कीं, त्यांत त्यांची आहुति न पडतां माझी पडत होती; आणि पूर्णाहुति होऊन संपूर्ण सांगताहि होईल असें वाटूं लागलें. काय करावें, सुचेना. खचणारें धैर्य मी सांवरीत होतों. मूषक मराठी ऊर्फ गनीमी काव्यानें लढत होते. मांजरासारखा आवाज काढून नाटकांतील वीराप्रमाणें पाय आपटून त्यांना तर हटवलें; पण हें लाल विघ्न मात्र क्षणाक्षणास वाढत होतें. त्यांना मारावें तर घाण सुटणार, व वस्त्रें खराब होणार. क्षणाक्षणानें काळ जात होता. जवळ घड्याळ असतें तर कांटे सरकवून पहांट जवळ आणण्याचा प्रयत्न भांबावलेल्या मनानें खास केला असता. तथापि विघ्नाशीं झगडण्याची अंगभूत रग स्वस्थ बसूं देईना. मनाच्या सेक्रेटरिएटमध्यें अनुभव, हिकमत, धैर्य यांची बैठक क्षणार्धांत भरून योजना ठरली. प्रथम सर्व आंथरूण झटकलें; नंतर शिलकी धोतर, टॉवेल व चादर यांचा चौफेर कोट करून, गादी फेंकून देऊन केवळ सतरंजीवर निजण्याचें ठरविलें. तथापि आकाश-मार्गें होणारी ' ब्लिझ्क्रिग ' कशी थोपवावयाची हा प्रश्न शिल्लकच राहिला! तथापि बारीक शाल – व ती खादीची असल्यामुळें अधिक कार्यक्षम होईल असें समजून पायापासून डोक्यापर्यंत घेतली. गुदमरत होतों. तथापि एवढा त्याग करणें अवश्य होतें. आतां झोंप येणार म्हणून आनंद झाला; पांच

मिनिटेंहि झालीं नाहींत तों चावण्यास सुरुवात झाली. खादीला गांधीजी कामधेनु म्हणत. मला वाटलें, तिच्याखालीं निदान स्वस्थ झोंप तरी मिळेल. पण हाय ! तेंहि झालें नाहीं. तिचा विरळपणा विषमय ठरला. जो कोट केला त्यावरून मत्कुणसेना सहज लीलेनें येत होती. पुन्हा उठलों. बाहेर पहारेकरी शिपाई होता. त्याला लघुशंकेसाठीं दार उघडण्यास सांगितलें, बाहेर गेलों, पुन्हा आलों. याज्ञिक चळवळत होते, पण त्यांना फारसा त्रास होत नव्हता असें दिसलें. मराठी रक्ताची गोडी ढेकणांना अधिक असावी, किंवा शोषक कुळाच्या अभिमानामुळें त्यांना वगळून मजकडे त्यांचा मोर्चा वळला असावा !! तथापि मत्सरानें हा प्रश्न सुटणार नव्हता. पुन्हा विचार केला, मारलें तर ! पण भीति वाटली कीं, न जाणो,--त्याच रक्तापासून पुराणांतील राक्षसांप्रमाणें सहस्रपट होतील, कदाचित् वासानें अधिक येतील. इतक्यांत कवीला सुंदर उपमा सुचावी तसेंच होऊन एक युक्ति सुचली. तांब्यांतील पाण्यानें 'परिसमूहनम्'प्रमाणें बिछान्याभोंवतीं तें टाकलें, व पुन्हा तोंडावर पांघरूण घेऊन निजलों; आणि आतां 'बुडाला दुष्ट हो पापी, शान्त निद्रा चहुंकडे' असें वाटून स्वस्थ पडलों.

पण दोन मिनिटांतच पुन्हा तेंच सुरू झालें. पुन्हा उठलों, पुन्हा बाहेर जाऊन आलों. आतां मन खचूं लागलें. त्यानें विचाराची कात टाकली. हतबुद्ध झालों. उत्तम जन आहेत ते प्रयत्न सोडीत नाहींत, ही शिकवण मनांत धरून पुन्हा मन सांवरलें. हातरुमाल काढून आतां शत्रूंना पकडून हद्दपार – अगर मुंबईच्या पोलिसी भाषेंत तडीपार – करण्याचें ठरविलें. प्रयत्न करून रुमालाच्या झोळींत एकाला टाकावें, तर आंत असलेला पटकन् खालीं पडे. मीठ-सत्याग्रहांत पोलिस व स्वयंसेवक यांच्या झटापटीची आठवण झाली. पंधरा मिनिटें काम करून सुमारें दहाएक गोळा करून दारावाटे बाहेर टाकले. पण रुमाल झटकतांना निम्मे आंत पडले व निम्मे बाहेर गेले असें मी समजलों. डॉक्टरच्या प्रिस्क्रिप्शनप्रमाणें हें एकदोन वेळां 'रिपीट' केलें, पण व्यर्थ ! निजे, उठे, चाले, पुटपुटत शिव्याहि दिल्या. आतां परिस्थिति असह्य झाली. झोंप डोळ्यावर खटकटत होती, पण प्रवेश नव्हता; प्रयत्नाला आतां वाव नव्हता. आशा मृत्यु पावली होती. परिस्थिति व मन यांना जोडणारे सर्व दुवे तुटले. मन गिरक्या खाऊं लागलें. आतां हें विमान कोसळणार हें उघड झालें. मानवी कृति यापुढें निष्क्रिय झाली. आतां

परमेश्वर आठवूं लागला. आपल्याला वेड लागणार, व सकाळपर्यंत जिवंत राहतों कीं नाहीं याची शंका भिववूं लागली. साधी रात्र काळरात्र होईल असें वाटलें. आपण आत्महत्या तर नाहीं ना करणार ! लागलींच तुरुंगांत आत्महत्या केलेल्या राजबंदींचीं स्मृतिचित्रें आठवलीं ! तो नैनीगोपाळ,– हाच एक मार्ग सुटकेचा आहे असा संदेश देत आहे असें वाटलें. खरोखर देव किती धूर्त ! लक्ष्मी कमळांत, विष्णु क्षीरसागरांत, व शंकर हिमालयांत विश्रान्ति घेतात – तें कां हें कळलें. मी मानव काय करूं, कोठें जाऊं, कोणाचा आश्रय घेऊं,– कांहीं कळेना. निराधार मन भाविक झालें, नास्तिक पार्थिव-पूजेला तयार झाला, आजीनें शिकवलेलें स्तोत्र आठवून म्हणूं लागलों. आबा गुरुजींनीं शिकविलेली रामरक्षा थोडीबहुत येत होती तीहि म्हणालों. मध्येंच लहानपणींची आठवण होऊन – ब्रह्मगांठ जानव्याची दाखविली तर विघ्नें पळतील म्हणून छातीशीं हात लावला,— पण हाय ! कैक वर्षांपूर्वी यज्ञोपवीत काढून टाकल्याचें ध्यानीं आलें. निराशा – निराशाच झाली ! ज्याच्या स्मरणानें विघ्नांच्या राशी नाश पावतात, त्या सिंदूरवदनाची प्रार्थना केली. प्रयत्न कळेना, देव पावेना. मी फेऱ्या घालूं लागलों. पंधरा पंधरा मिनिटांनीं लघवीला जावें लागल्याचा भास होई. पहारेकरी दार उघडी. शेवटीं शेवटीं त्यालाहि संशय येऊं लागला. "मी पळून जाईन" असें त्याला वाटलें असावें. तो म्हणूं लागला, "हुकुमाबाहेर तुम्हांला जाऊं देत आहें, आतां लवकर पहांट होईल, स्वस्थ निजा." जणूं कांहीं मी निजण्यास तयारच नव्हतों ! माझें मन त्याच्या सौजन्याचा फायदा घेण्यास तयार नव्हतें. आतां परिस्थिति आणखीच बिकट होऊं लागली. काळ गति विसरला असें वाटूं लागलें. परमेश्वराप्रमाणें ही रात्र अनंत होणार असें दिसूं लागलें. पुन्हा कालवाकालव सुरू झाली. प्रार्थनेनें जमेना म्हणून देवांना नवसाची लुचपत देण्यास सुरुवात केली. कोंकणांतील ओबडधोबड देवापासून मनमोहन मुरली-धरापर्यंत नवस बोलण्यास सुरुवात केली. निर्जली उपवासापासून सत्यनारायणी शिऱ्यापर्यंत क्षेत्र विस्तारलें. तथापि आशेचा किरण दिसेना. भक्तांचा वाली बारा अवतार घेऊं शकतो. सर्व दैत्य व दानव त्यानें हताश केले, मग क्षुल्लक मत्कुणांना तो मारूं शकत नाहीं हें कसें ? जाणून पाप माझ्याकडून झालें नव्हतें; तथापि, ज्ञाताज्ञात दोहोंची मनांत माफी मागितली. कदाचित् संशयरत्नमालेंत म्हटल्याप्रमाणें वाटेंत अन्य कामें निघालीं म्हणून गुंतला

नाहीं ना ? का कृपाळूपणें अल्पधारिष्ट पहात आहे ? कांहीं कळेना, सुचेना. ‘ नमो भगवते ’ मंत्र सुरेलपणें म्हणूं लागलों—

आणि कुठून तरी कोंबडा आरवला. दिवसाची ‘ बांग ’च जणूं ऐकली. अनंतशयन जागा झाला. परिश्रमी दिवस व चिंताग्रस्त रात्र सान्त आहेत म्हणून बरें. तथापि मला मात्र नमो भगवते मंत्रानें ती रात्र लवकर संपविली असें अद्याप वाटतें. पुढील क्षण झपझप जाऊं लागले; थोड्याच वेळांत उत्तेजन देणारा पण उन्माद थांबविणारा, सर्व रोग परिहार करणारा, कवींना स्फूर्ति, वीरांना धैर्य देणारा चहाचा पेला दृष्टिपथांत आला. आतां जीवांत जीव आला. जगणार,– नव्हे जगलों, याची जाणीव झाली. भानुशंकर याज्ञिक यांना नांवानें हांक मारली, व त्यानें ओ दिल्यामुळें मी वेडा झालों नाहीं हा विश्वास आला. जें भोगलें तें स्मृतिशेष होऊं लागलें. तथापि हा अनुभव अमर रहावा म्हणून हा प्रयत्न केला आहे. परन्तु अद्यापिहि जेव्हां जेव्हां गतजीवनाची स्मृति होते व त्यांत हा भाग येतो, तेव्हां पुन्हा मन भयग्रस्त होतें, आणि जेव्हां जेल सुधारणा कमिटीचा सभासद या नात्यानें लॉकअप पाहण्याचा प्रसंग आला, तेव्हां मीं युक्तीनें तें टाळलें. आज मला माझ्या शत्रूला शिक्षा अगर शाप देण्यास सांगितलें तर ‘ एक रात्र किंग्ज सर्कल लॉकअपमध्यें तूं असावेंस, ’ असाच शाप मी देईन. माझ्या शत्रूचें मात्र भाग्य असें आहे कीं,– मी अजातशत्रु आहें—फक्त मत्कुण सोडून ! !



तसें म्हटलें तर कलकत्त्याला जाण्याची माझी ती पहिलीच खेप नव्हती. लहानपणीं 'माणिकतोळा बॉंब केस', 'अलिपूर जेलमधील खून' वगैरे रोमांचकारी घटनांबद्दल वर्तमानपत्रांतून वाचलें होतें. माझ्या कॉलेज जीवनांत कलकत्याच्या विश्वविद्यालयाचा लौकिक मीं ऐकला होता. तेथें बहुतेक विद्यार्थी पहिल्या वर्गात पास होतात, व तिसऱ्या वर्गात थोडे,– अशी स्थिति असल्यामुळें आपल्या नशिबाची परीक्षा तेथें पहावी, व निदान एकदां तरी पहिला वर्ग मिळाल्याचा मान घ्यावा अशी माझी महत्त्वाकांक्षा असे. राजकारणांत प्रवेश केल्यानंतर कलकत्ता म्हणजे चढाऊ व लढाऊ राजकारणाचें केंद्र म्हणून मी समजत होतों. बंगाली म्हणजे एक तर खुदीराम, नाहीं तर सुरेंद्रनाथ, नाहीं तर रवींद्र असें मी प्रामाणिकपणें समजें. थोडें बंगाली शिकण्याचाहि मीं प्रयत्न केला; पण मराठीचा स्वाभिमान अधिक ठरला, व मराठीशिवाय दुसरी भाषा आपल्याला येते अगर समजते, ही स्थिति अनेकांप्रमाणें मलाहि अप्रिय वाटूं लागली. आज इंग्रज राहून इंग्रजी जाती तर मला अधिक आनंद झाला असता! बंगाली भाषा जरी मीं हस्तगत केली नाहीं तरी कलकत्ता हें माझ्या मनांत एक तीर्थक्षेत्र झालें होतें. चौरंगीचे रंग कसे असतील? बाऊबझार खराच भीतिदायक असेल का? श्यामबाजारांत सर्वत्रच श्याम असतील का? 'मराठा डिच' कसा असेल, वगैरे नाना तऱ्हेचे विचार माझ्या मनांत उद्भवत व विलीन होत. १९२८ चें कॉंग्रेसचें अधिवेशन कलकत्त्यास झालें, व त्या वेळीं प्रतिनिधि म्हणून मी प्रथम कलकत्त्यास गेलों. त्या वेळच्या तीन चार दिवसांच्या मुक्कामांत वस्तु व व्यक्ति त्यांच्या त्यांच्या कीर्तीप्रमाणें नसतात, असा अनुभव आला. बहुतेक बंगाली भोंगळ व बडबडे असल्याचें आढळून आलें. दाढीवाल्यांमध्यें सुरेंद्र व रवींद्र कोणीच नव्हते. पुण्यांत सर्वच पगडीधर जसे बळवंतराव नव्हते, त्याचप्रमाणें ही स्थिति होती. खुदीराम तर अभावानेंच तळपत होता. चौरंगी रात्रीं विविध रंगी होते, व तिला पहावयाचें असेल

तर रात्रींच, असा मुरब्बींचा अभिप्राय पण पडला ! इतिहासप्रसिद्ध झालेलीं ठिकाणें पाहिलीं. 'डिच' तर नव्हताच, पण तेथें मोठा प्रासाद पाहिला. तात्पर्य, लौकिक व अनुभव व्यस्त प्रमाणांत पडले. 'कालीमंदिरां'तील प्रकार पाहून मजबरोबर असलेले मुंजेपंथीय हिंदुसंघटनवीर घेरी येऊन पडण्याच्या बेतांत आले. लहान लहान अजापुत्रांना दोन खुंट्यांत दाबून क्षणांत सुरीनें कापतांना पाहून, आणि पडणारें रक्त प्रसाद म्हणून कपाळाला लावून व किंचित् प्राशन करून कृतकृत्य मानणारे स्त्री-पुरुष पाहून बंगालीतर मनुष्याला शिसारी आल्याशिवाय राहणें शक्य नाहीं. तात्पर्य, पहिल्या भेटींत कलकत्त्याबद्दल वाटणारा आदर बहुतेक सरदला होता.

कॉंग्रेसच्या त्या 'जलशां'त झालेल्या 'कारवाई'मुळें साधारणतः जो हट्टी तो पुढारी, व महान् हट्टी तो महात्मा – असें माझें इतरांप्रमाणें मत होत चाललें होतें. मोतीलालजींच्या रथाला ४२ घोडे होते, पण त्यांच्या राजकारणांतील रथाचे घोडे त्याहून अधिक व अनंत दिशांनीं चालू पहात होते. खुद्द त्यांच्याच चिरंजीवानें 'संपूर्ण स्वातंत्र्या'चा जयघोष सुरू केला होता. माझ्यासारख्या 'युवकां'ना कोणामागें जावें हें समजणें कठीण झालें होतें. या पेंचप्रसंगांत सोडवणुकीचा मार्ग म्हणजे स्वतःच पुढारी होणें हा होता ! या भागांत माझी प्रगति कशी झाली हें येथें सांगण्याचें कारण नाहीं. पण पुढारीपणाचें मुख्य लक्षण म्हणजे स्वतःच प्रसिद्धि घडवून आणणें यांतील ओनामा मी शिकलों खास ! पहिल्या भेटींत वर लिहिल्याप्रमाणें कलकत्त्याबद्दल माझा आदर सरदला, तरी माझ्याबद्दल कलकत्त्याच्या आदराला सुरुवात झाली. कुठल्या तरी दैनिकांत एका मोठ्या पुढाऱ्याबरोबर माझा फोटो छापून आला. मला मात्र असें वाटलें कीं, माझा फोटो घेत असतां तो पुढारी बळेंच माझ्याशेजारीं आला !! त्याला काय वाटलें हें मीं विचारलें नाहीं,— आणि यांतच खरी मुत्सद्देगिरी आहे !!!

१९३७ च्या सप्टेंबरांत अ. भा. कॉंग्रेस कमिटीचा जलसा कलकत्ता येथें झाला. त्या वेळीं या हिंदवर 'कॉंग्रेसराज्य' सुरू झालें होतें. अस्मादिक पण त्या वेळीं मध्यवर्ति कायदेमंडळाचे सभासद होते. या खेपेस आमची सोय अगर गैरसोय म्हणा—मारवाडी विद्यालयांत केली होती, व जवळपासहि बरेच मारवाडी सभासद होते. त्या सर्वांना त्यांचेंच राज्य

सुरू झालें असें वाटत होतें व त्या दबावांत ते वागत होते. त्या अधिवेशनांत मद्रासचे पंतप्रधान यांच्याविरुद्ध सोशालिस्ट मसानी यांनीं निंदाव्यंजक ठराव आणला होता. कां? तर त्यांनीं बाटलीवाल्यांवर खटला भरला होता. आज ते दोघे राजकारणांत कुठें आहेत हा विचार प्रस्तुत नाहीं; तथापि त्या वेळीं जवळजवळ सभा मारून नेण्यापर्यंत वेळ आली होती. त्या वेळीं अस्मादिकांनीं उपसूचना सुचवून सभेचा रंग बदलला. हा इतिहास एवढ्यापुरताच प्रस्तुत आहे कीं, कलकत्त्यांत माझा भाव त्यामुळें अधिक वाढला. तथापि मारवाडी विद्यालयांतील भोजनादिक व्यवस्थेमुळें माझी प्रकृति जवळजवळ ढांसळली. जर जगांत चहा नसता, व मनांत जिवंत राहण्याचा निश्चय नसता – तर काय झालें असतें हें न सांगितलेलेंच बरें!! यानंतर पुन्हा त्रिपुरी कॉंग्रेसमध्यें सुभाषचा लौकिक व लौकिकाचा जय जमीनदोस्त केल्यानंतर— व लोकशाही तंत्रानें हें केल्यानंतर—कॉंग्रेसची लोकशाही १९३९ च्या मे–जूनमध्यें अ. भा. कॉं. कमिटीच्या 'कारवाई'-साठीं कलकत्ता येथें जमली होती. चढविलेला मुकुट काढून घ्यावयाचा होता. रंगभूमीवर राजाचें काम केल्यानंतर तेथेंच भूमिकेचा परिहार व्हावयाचा होता. द्वेष, मत्सर, राग, विद्वेष, कर्तव्यबुद्धि, अपरिहार्यता, देशहित या सर्व भावनांचा त्या वेळचा खेळ पाहतां इतिहासांतील ती एक अपूर्व घटना होती. लोकोत्तरांचीं मनें वज्रापेक्षां कठोर आहेत हें तेथें रोख दिसलें. त्यांची कुसुमापेक्षांहि अधिक मानलेली मृदुता उधारखातींच वाटली. एकाचें वैभव व दुसऱ्याची विफलता, एकाचा उदय व दुसऱ्याचा अस्त एकाच क्षणांत झाला. आणि या घटनेंतील विशेष म्हणजे दोघेहि स्वयंप्रज्ञ नव्हते, दोघेहि परिस्थितीनें कबजांत घेतलेले उघड उघड दिसत होते. याहि मुक्कामांत मारवाडी विद्यालय माझ्या वांट्याला आलें होतें. पण झालेल्या घटनेंतील तेजीमंदींत मीं भाग घेतला नाहीं. यापुढें शक्य तर कलकत्त्यांत जावयाचें नाहीं असें ठरवून परतलों. आणि जेव्हां ही प्रतिज्ञा मोडून मी कलकत्त्याला आलों तेव्हां माझें मन मलाच खात होतें.

पण प्रभु कृष्ण जर प्रतिज्ञा मोडतात, (कां, तर महाभारत त्यांना घडवून आणावयाचें होतें!) तर मी भारताचा एक मंत्री केवळ भारताला समृद्ध करण्यासाठीं प्रतिज्ञा मोडता झालों तर तें स्पृहणीयच नव्हतें काय? निदान माझ्या मनानें तसा कौल दिला! 'संदेहपदेषु' अंतःकरणाची

प्रवृत्ति हेंच प्रमाण असें मोठे लोक मानतात. माझें मोठेंपण या वेळेला माझे शत्रु — म्हणजे टीकाकार व घरसोडी मित्र वगळून प्रस्थापित झालें होतें ! आणि आतां तर विमानतळावर माझ्या स्वागतार्थ डगलेवाले पोलिस, गव्हर्नरसाहेबांचा ए. डी. सी., खवचट बातमीदार, धांदरट फोटोग्राफर, व इकडून तिकडून गोळा झालेली जनता आली होती. आतां या प्रश्नावर दुमत असणें शक्यच नव्हतें. चोराला सर्व जग आपल्याकडे संशयानें पाहतें असें वाटतें; पुढाऱ्याला हजर असलेली जनता त्याच्याच स्वागतार्थ आली आहे असें वाटतें ! !

थोडक्यांत म्हणजे मंत्री झाल्यानंतर मी कलकत्त्याला आलों होतों. अद्यापि टीकाकारांना कंठ फुटला नव्हता, कॉंग्रेसचें नाणें तेजींत होतें. आत्मनिंदेचे झटके अद्याप सुरू झाले नव्हते. स्वातंत्र्याची नवलाई कौतुकाच्या भाषेंत बोलत होती. वाटेल तें बोलावें, वाटेल ते आरोप वाटेल त्या मंत्र्यावर करावेत, हें युग अद्याप सुरू व्हावयाचें होतें. तात्पर्य, नूतन जांवयाचें कौतुक मंत्र्याच्या वांट्याला येत होतें. कलकत्त्याच्या गव्हर्मेंट हाउस-वर मी राहणार होतों. प्रान्तपतीची गाडी, पुढेंमागें संरक्षकांच्या गाड्या, डमडमपासून गव्हर्मेंट हाउसपर्यंत ठायींठायीं पोलिस, व पोलिस उभे पाहून कुतूहलपूर्ण दिसणारी जनता, असा तो देखावा. कोणीं तरी हात उचलला असा भास होतांच थाटानें मी नमस्कार करीत होतों. निदान माझें जोडलेलें करद्वय पाहून जनता तसेंच करील, व कोणी तरी वार्ताहर हें सर्व पाहील, आणि मग—उद्यां जगभर हें सर्व प्रक्षिप्त होईल अशी माझी कल्पना होती. माझ्यांतील शेख महंमद जागा होत होता. गाडी गव्हर्मेंट हाउसपर्यंत आली, देवडींत दाखल झाली. अस्मादिक रुबाबानें उतरले. तो भव्य प्रासाद, संगमरवरी दरबार हॉल, भिंतींवर टांगलेले फोटो, सुंदर गालिचे, नीट पोषाख केलेले नोकर,— एकंदर सर्व पाहून मन भ्रमूं लागलें.

इंग्लंड रिटर्न्ड प्रायव्हेट सेक्रेटरी एकाएकीं दिसेनासा झाला. या व्हरांड्यां-तून त्या व्हरांड्यांत, एका लिफ्टमधून दुसऱ्या — याप्रमाणें अनेक योनी फिरून मनुष्यजन्म यावा, त्याप्रमाणें मी एकदांचा माझ्यासाठीं मुक्रर केलेल्या खोलीसमोर आलों. खोलीचा दरवाजा हत्ती-दरवाजा शोभेल असा होता. वर ' प्रिन्स ऑफ वेल्स 'ची खोली असें सोनेरी अक्षरानें लिहिलें होतें.

मी थबकलों. पण ए. डी. सी.नें बाह्यतः अदबीनें व मनांत कदाचित् थट्टेनें 'यावें यावें' म्हणून विनविलें. मनांत शंका येऊं लागली कीं, हा बनवीत तर नाहीं? तसें म्हटलें तर बहुसंख्याक लोकांची जन्मतीथ म्हणजे १ एप्रिलची ती तारीख नव्हती. मध्यवर्ती मंत्र्याला तो काय बनवितो, असा विचार येऊन थोडी हुशारी वाटली. पुन्हा पुण्याचा अभिमान मदतीला आला. आम्हां पुणेकरांना बनविणारे अद्यापि जन्मावयाचे आहेत असें आम्ही खुद्द समजतों. आणि कदाचित् इतरांच्या मतें बनलों तरी आमची दृढ श्रद्धा आम्हींच इतरांना बनविलें अशी नेहमीं ग्वाही देत असते. तथापि थोडा बावरलों खराच. पण धैर्याचा वारु सजण्यापूर्वी तो ठाण धरीत नाहीं असा अनुभव आहेच कीं नाहीं? शेवटीं हिय्या करून सरहद्द ओलांडणाऱ्या सैनिकाप्रमाणें झपाट्यानें पुढें जाऊन टेबलासमोरील खुर्चीवर बसलों. टेबलावर छापील कागदावर त्या दिवशीं कोणत्या खोलींत कोण पाहुणे येणार आहेत अगर आले आहेत याचा उल्लेख होता. त्यांत नांव पाहतांच, परीक्षेचा निकाल वर्तमानपत्रांत आल्यावर जसा विद्यार्थ्याला आनंद होतो तसा मला झाला. खात्री झाली कीं, ज्या खोलींत केव्हां तरी इंग्लंडचे युवराज राहिले असतील त्याच खोलींत – जो युवराजहि नव्हता व ज्याच्या बापाचें कुठेंहि राज्य नव्हतें असा एक प्राणी आज आला आहे, व त्याच्याचकरितां ही जागा आहे. बसल्या बसल्या सभोंवार पाहिलें. सर्व खोली शृंगारलेली होती. कोच, खुर्च्या, पुस्तकानें भरलेलीं कपाटें होतीं. भिंतींवर उत्कृष्ट चित्रकलेचे नमुने होते. प्रथम पुस्तकें पाहूं लागलों तर असें वाटलें कीं, विक्रेत्याच्या कपाटांतून ज्या स्थितींत आलीं त्याच स्थितींत स्थितप्रज्ञाप्रमाणें तेथें राहात असावींत. हें ज्ञानभांडार उघडें असून कोणींहि हात लावलेला दिसत नव्हता!

अस्मादिकांची ही पाहणी चालली आहे, एवढ्यांत नोकर आंत आला व 'चहा कीं कॉफी आणूं?' म्हणून त्यानें विचारलें. विमानांत 'लंच' देत असतां घेतला नाहीं; कारण मोठ्याकडे पाहुणा जाणार म्हणून तेथेंच 'लंच' घेऊं, असें पी. एस्. ला म्हणून मी तसाच आलों होतों. त्यानें मात्र हातांतलें न सोडण्याचें धोरण स्वीकारून व्यवहारीपणा दाखविला होता! त्यामुळें जेव्हां नोकर जेवणाची गोष्ट न काढतांच चहाची बात करूं लागला, तेव्हां सर्दच झालों! बरें, जेवण पाहिजे हें 'एटिकेट'ला

धरून आहे कीं नाहीं हें पी. एस्. सांगणार; पण त्याचा पत्ताच नव्हता. तथापि बावळट म्हणून घेण्यापेक्षां उपवासी राहणें मीं पत्करलें. कारण संभाविताला मरणापेक्षांहि कीर्ति अधिक वाटते. एक एक शब्द ठसक्यानें बोलून चहा आणण्यास सांगितलें. पटकन् म्हणालों असतों तर माझ्याबद्दल त्याला आदर वाटला नसता, असा माझा समज होता. प्रिन्स ऑफ वेल्सच्या खोलीचें वातावरण परिणाम करूं लागलें होतें. मध्येंच फेऱ्या घालीत होतों. लक्ष्मीधरासारखी चाल, व बहुतेक त्याच्यासारखे हावभाव करीत ते कसे दिसतात म्हणून आरशांत पहात होतों. थोड्या वेळांत चहा आला, व त्याबरोबर दोन बिस्किटें ( कीं ज्यांचा एकच घास झाला अशीं ) आलीं. तथापि 'स्वल्पमपि बहु' या न्यायानें मीं चहाचा तो समारंभ संपविला.

संध्याकाळीं गव्हर्मेंट हाउसच्या आवारांत फिरलों. पण अधिक फिरलों तर अधिक भूक लागेल ही भीति ! एक वेळ मनांत आलें कीं, बरोबरच्या आमच्या चपराशाला बाजारांतून कांहीं तरी आणण्यास सांगावें ! पण न जाणो, त्याच्या तोंडून ही गोष्ट षट्कर्णी व्हावयाची, व आमच्या सरकारचा दुर्लौकिक व्हावयाचा ! शिवाय राजप्रासादांत राहून या वाघ्याचें येळकोट जाईना अशीहि अपकीर्ति व्हावयाची. पुण्याच्या कॉंग्रेस भवनांतील रोज संध्याकाळच्या भेळ-बैठकींचा मी तहाहयात अध्यक्ष होतों. भेळ खाणें हें पुण्यास तरी आम्हीं मंडळींनीं शिष्टसंमत केलें होतें. पण येथें तें इष्ट नव्हतें, व शक्य नव्हतें. पी. एस्. हुशार व चाणाक्ष आहे, पण त्यालाहि विश्वासांत घेण्याला मन धजेना. कारण खाजगी कारभारी म्हणजे मालकाच्या सर्व गोष्टी जाहीर करतो तो,– अशी व्याख्या अलीकडे झाली आहे. तेव्हां तोहि मार्ग खुंटला. मनांत म्हटलें, हरवलेलें धन म्हणजे दान, व न घडलेलें भोजन म्हणजे उपवास. तेव्हां आपल्या खातीं हा उपवास जमा होईल असें मानून जेवणाच्या घडीची वाट पहात राहिलों. आणि जेव्हां जेवणाची सूचना देणारी मृदुनाद घंटा ऐकली, तेव्हां नीटसा पोषाख म्हणजे सदऱ्याच्या गुंड्या वगैरे लावून डायनिंग हॉलमध्यें आलों. कुणीं कोठें बसावें याचा छापील तक्ता मिळाला. प्रान्तपतीच्या शेजारीं बसण्याचा मान माझ्या वांट्याला आला. कुठलेंहि पेय – अर्थात् तीं सर्व 'अहिंसात्मक' होतीं— मा घेतलें नाहीं. कारण भक्कम जेवण्याचा मीं निश्चय केला होता. किंबहुना

परिस्थितीनें तसें मला नियुक्त केलें होतें. जेवण्याचा आरंभ एका पातळ – र्की ज्यांत भोपळयाच्या साली टाकल्या होत्या, अशा पदार्थानें ( Soup ) झाला. नंतर भात, व त्याच्या जोडीला भाजी व पापड. भात दक्षिणी पद्ध-तीनें ग्रंथास उपोद्घात इतक्या बेतानें खाल्ला, व आतां या राजभवनांत, या भव्य व दिव्य प्रासादांत कांहीं तरी उत्तम पक्वान्न खावयास मिळेल व क्षुधाशान्ति होईल या आशेनें बसलों. एवढ्यांत केळयांचे तुकडे व किंचित् साय ( Cream ) घातलेली मोठी बशी पुढें आली;– त्याबरोबर चरकलों ! या बशीचा अर्थ हें शेवटलें वाढप असाच होता. ' मधुना समापयेत् ' हा याचा मंत्र आहे. झालें ! जेवणाच्या अंकाचा – शेवटचा प्रवेश— याची जाणीव झाली. आतां पुन्हा भात मागणें शक्य नव्हतें. कारण एक तर तें रीतीला सोडून होतें, व शिवाय माझ्या समजुतीनें तो पदार्थ दृष्टीआडहि झाला होता. आतां ही शिखरण मी खाणार तरी किती, व तिचा काय उपयोग ? तेव्हां हें शिखरिणीवृत्त जीवनकाव्याला योग्य नाहीं असें ठरवून, मनांत रागानें व बाहेर कसलेल्या आभिजात वृत्तीनें तें घेतलें न घेतलें करून तो प्रसंग संपविला. दुःखावर डागण्या देण्यासाठींच जणूं कॉफी पुढें आली. उपवासाच्या दिवशीं खाणावळींत संध्याकाळीं कॉफीवर भागवितात. हा १२ वर्षांचा अनुभव होता. झालें. हा उपवास यथासांग घडला असें समजून कॉफी घेतली. तो कॉफीचा पेला म्हणजे मुलींच्या भातुकलीच्या पेल्याच्या आकाराचा होता ! व तोहि ' एकच प्याला ' घ्यावयाचा, असा अनुल्लंघ-नीय संकेत आहे. तेव्हां तोहि प्याला – सॉक्रेतिसानें ज्या समाधानवृत्तीनें विषाचा प्याला घेतला त्या वृत्तीनें घेऊन, प्रान्तपतींना ' सुंदर जेवण ' दिल्याबद्दल दखल देऊन इकडच्या तिकडच्या फुटकळ राजकारणाच्या गोष्टी बोलून अस्मादिक निवासस्थानाकडे परतले.

झालें तें झालें, आतां फक्त रात्र काढून सकाळीं या तुरुंगाबाहेर पडूं. स्टेशनवर खूप खाऊं, वगैरे विचार मनांत मूळ धरूं लागले. निदान झोंप तरी चांगली मिळेल; झालेल्या कष्टांना, मिळालेल्या अनुभवांना ती विस्मृति देईल, या कल्पनेनें मी आनंदित झालों. रात्र संपेल, सुप्रभात होईल, रविराज उगवेल,—पण – हंत हंत !—आणि असेंच झालें. मी खोलींत आलों तर तेथें मच्छरदाणी लावून पलंगावर शय्या सज्ज केली होती. पिण्याचें पाणी ठेवलें होतें. नोकर होता. तेथें त्यानें विचारलें, ' छोटा चहा केव्हां

आणूं ?' 'छोट्या' हजेरीची माहिती होती, पण 'छोटा चहा' हें काय प्रकरण आहे हें माहीत नव्हतें. तथापि गंभीर चेहरा करून 'सावधपणें सर्व विषयीं' ही रामदासांची शिकवणूक आठवून 'नेहमीं केव्हां आणतोस ?' असा प्रश्न केला. त्यानें '५॥ किंवा ६ सकाळीं' असें उत्तर दिलें. तेव्हां आपलें वैशिष्ट्य दाखविण्याच्या दृष्टीनें ५॥। ला आण असें सांगितलें. निदान हें संकट सकाळपर्यंत टळलें असें वाटून समाधान वाटलें. 'छोटा चहा' म्हणजे 'काढेचिराइताचा काढा' का आणखी दुसरें 'भलतें' कांहीं याचा थांग लागेना; पण तूर्त तो प्रश्न 'निकडी'चा नाहीं असें मानून मीं पुढील भविष्याकडे वळलों.

नोकर गेला. त्यानें दार लावून घेतलें. अस्मादिकांनीं उकडत असल्यामुळें सदरा काढून टाकला. बिछाना न्याहाळला, व त्यावर बसतांच एकदम वर फेकल्याचा भास झाला. दिव्याच्या प्रकाशांत धोरणानें काय होतें तें पहावें असा विचार करून उताणा झालों. सत्र ठीक वाटलें. नंतर कुशीवर वळतांच पुन्हा वर फेकल्याचा भास झाला. पुन्हा खालीं आल्याचा भास झाला. पुन्हा वळलों, तेंच झालें. मनांत संशय आला कीं, बिछान्याखालीं कांहीं तरी भानगड आहे. उठलों तर पलंगावरून खालीं उतरतांना एकदम फेकला गेलों. त्या भानगडींत मच्छरदाणी पण थोडी फाटली. सावधपणानें पलंगाखालीं पाहिलें. तेथें कांहीं नव्हतें. तेव्हां असें वाटलें कीं, गादींतच कांहीं तरी असावें. म्हणून छापा घालावा अशा बेतानें हातांत काठी घेऊन जोरानें तीन चार ठिकाणीं रोवली; कांहीं बोध होईना. मग पुन्हा निरनिराळ्या ठिकाणीं गादीला काठीनें झोडपलें, पण आवाज निघेना. तेव्हां धीर आला कीं – कांहीं भानगड नाहीं. पुन्हा मग पलंगावर अगदीं हळू चढून उताणा झालों. दोन उशा अधिक उंच वाटल्या, एक लहान वाटली; योग्य उशी नसेल तर झोंप येणार नाहीं, तेव्हां काय करावें याचा विचार चालू केला. कुशीवर वळतांच पुन्हा वर फेकला गेलों व पुन्हा खालीं आलों. छाती धडधड करावयास लागली. कारण दृश्य संकट नाहीं याची खात्री झाली होती; पण संकट तर अनुभवाला येत होतें. मनांत आलें, येथें कांहीं तरी जादूटोणा तर नसेल ना ? बंगाली जादू व जारण–मारण याबद्दल थोडें ऐकलें होतें, वाचलें होतें, व आतां तोच अनुभव येणार असें दिसलें. पण कुणाचेंहि मीं वाईट केलें नाहीं, परधन व परजाया याबाबत मीं कुठेंहि

कांहीं केलें नाहीं, असा निदान माझा विश्वास होता. मग मजवर हे प्रयोग होण्याचें काय कारण? कोणाच्याहि उन्नतीच्या मार्गांत मीहून केव्हांहि आलों नव्हतों. तथापि या जगांत अकारण मित्र व अकारण शत्रू असतात असें म्हणतात. मनांत नाना तऱ्हेचे विचार सुरू झाले. लहानपणापासून भोंचक प्रवृत्ति व शोधक बुद्धि असल्यामुळें या गोष्टीचा थांग लावण्याचा निश्चय केला. डॉक्टर ज्याप्रमाणें रोग्याची छाती व पाठ तपासतो, त्याप्रमाणें दोन्ही हातांनीं गादीवर ठिकठिकाणीं दाबून पाहिलें. पलंगाखालीं जाऊन तसेंच केलें. गादीची उंची एक फुटावर होती. चिकित्सेचें मूळ म्हणजे गादी स्प्रिंगची आहे असा निर्वाळा मिळाला. करणी वगैरे कांहीं नाहीं, हें पाहून मनाला समाधान वाटलें!

आणि मग लागलीच निराळें वातावरण अनुभवास येऊं लागलें. सजवलेली खोली, तो रंगीत पलंग, तीं नानाविध चित्रें, ती आकर्षक शय्या, वा वा,—अरेबियन नाइटमधील राजकन्येच्या महालाची आठवण झाली. रस्त्यांतील प्रवाश्याला तेथें नेलें होतें, व तो दिपून गेला होता; तसें मलाहि वाटूं लागलें. सर्व कांहीं होतें,— फक्त राजकन्या नव्हती; आणि ती असती तर? मन अधिक खुलूं लागलें. पण ती नाहीं हेंहि एका अर्थी बरें असें वाटलें. उल्लसित मनानें मीं दिवा मालविला व शय्येवर पडलों. बाहेरील दिव्याचा प्रकाश थोडा खिडकीवाटे येत होता. विजेचा पंखा वारा घालीत होता. तथापि झोंप येईना. कुशीवर वळलें कीं पुन्हा वरखालीं व्हावें. उशीचा पेंचप्रसंग कायम होता. दोन तास या झटापटींत गेले. मध्यरात्र उलटून गेली होती, चंद्र कलत चालला होता. पण या प्राण्याला या सुखशय्येवर झोंप येत नव्हती. शेवटीं मनानें निश्चय केला. मी उठलों. दिवा लावला. खोलींत होल्डॉल होता तो सोडला, व चादर काढून जमिनीवरील गालिच्यावर पसरली. उशी काढली व आतां तेथें निजणार, एवढ्यांत वैरी मनानें संशय उत्पन्न केला, समजा, संरक्षक जो बाहेर निजला होता, त्यानें कर्तव्य म्हणून दार उघडून पाहिलें तर? आणि जर त्याला संशय आला तर? मंत्र्यावर हल्ला करण्यासाठीं कोणी तरी आंत आला आहे असें समजून त्यानें पिस्तूल झाडल्यास—नको – नको तो विचार!— आणि जर दुसरें कोणी माणूस तेथें आहे असें त्याच्या मनानें घेतलें, व त्यानें गवगवा केला,— तर तूर्त तरी माझ्या शीलाला गोळीच लागेल!! झालें! सर्व वातावरण पुन्हा बदललें. मींच माझ्यावर

चिडलों. कशाला येथें आलों ? पण आतां काय त्याचा उपयोग ! 'प्राप्तं प्राप्तं उपासीत हृदयेनापराजितः' हें ध्यानांत घेऊन न थांबतां विचार करूं लागलों. ठरलें; दार लावून टाकावें. दार लावलें होतें, पण बोल्ट लावला नव्हता. बाहेरून ओढून घेतलें होतें. बोल्टकडे पाहतांच तो एवढया उंचीवर होता कीं, माझा हात पुरणें शक्य नव्हतें. माझ्या कमी उंचीचा मला राग आला, पण बौद्धिक उंचीचा अभिमान जागृत झाला. खुर्ची आणली. त्यावर उभा राहिलों, तरीहि हात पुरेना. प्रयत्न सोडावा तर अस्मितेचा अवमान होत होता. टेबल प्रचंड होतें. तें आणणें शक्य नव्हतें. खुर्चीवर खुर्ची ठेवून बघावी हा विचार मनांत येतांच स्वतःचेंच कौतुक वाटलें. त्याप्रमाणें सर्कशींतील प्रयोगाप्रमाणें खुर्चीवर खुर्ची तर ठेवली. तानाजी जसा अगदीं आवाज न करतां घोरपडीला बांधलेल्या दोरानें सावधपणें चढला असेल, अगदीं तशा सावधानपणानें मीं चढण्याचा प्रयत्न केला. आवाज झाला तर संरक्षक पटकन् आंत येईल, आणि मग काय होईल याचा विचार दुःसह होता. थोड्या वेळांत हें अशक्य आहे हें लक्षांत आलें. पुन्हा खुर्च्या जागच्या जागीं ठेवल्या. वाटलें, उडी मारून बोल्ट बसविण्याचा प्रयत्न करावा; यशस्वी झाला तर कोणीहि आंत येणार नाहीं, व जर अयशस्वी झाला तर— नव्हे, हा मार्ग नव्हे. प्रयत्न असा पाहिजे कीं तो फसल्यास जें आहे त्यापेक्षां वाईट होऊं नये. हा व्यावहारिक सिद्धान्त मनांत आला. मग काठीनें प्रयत्न करावा असें विफलतेवर मात करणाऱ्या बुद्धीनें सुचाविलें. हळूच काठीनें फार आवाज न होईल अशा रीतीनें बोल्ट वर सरकविण्याच्या प्रयत्नाला लागलों. बोल्ट वर जावा, पुन्हा खालीं यावा; कोळयाएवढें तरी आपण प्रयत्नवादी व्हावें व चिकाटी दाखवावी असा दृढ संकल्प करून अर्धा तास घालविला, व शेवटीं असें आढळून आलें कीं, कित्येक काळ कोणीं तो न लावल्यामुळें वरच्या कोंदड्यांत तो जाणें अशक्य झालें आहे. झालें. आतां प्रयत्नांना वाव नाहीं; बुद्धि आतां प्रतिहत झाली. जें भोक्तव्य आहे तें भोगल्याशिवाय गत्यंतर नाहीं याची जाणीव होतांच, मन अपरिहार्यतेशीं जुळवून घेण्याच्या तयारीला लागलें. पलंगावर निजणें अशक्य व असह्य. जमिनीवर निजणें म्हणजे घातुक, व कदाचित् दुर्लौकिक आणणारें. या संकटांत हरिजागर करण्याशिवाय मार्ग दिसेना. गादी गुंडाळली. पलंगावरील बिछाना नीट करून दिवा मालविला, व खुर्चीवर बसून

'उर्वरित शर्वरी' काढण्याचें ठरविलें. उपवास घडलाच होता. आतां रात्रभर हरिस्मरण करून संपूर्ण पुण्य तरी संपादावें हाहि मार्ग वाईट नव्हता. काळहि थांबला नव्हता. रात्र दिवसाला भेटण्यासाठीं आतुरतेनें क्षणाक्षणाला पुढें धावत होती. कलकत्त्याला लवकर मावळतें म्हणून लवकर उगवतेंहि. आतां लवकरच ही रात्र संपेल, हा विचार मनांत येतांच उदासी मन उल्हासी झालें. खुर्चीवर बसून आयुष्यांतील स्मृतींकडे बघत होतों, किंग्ज् सर्कलच्या लॉकअपमधील रात्र जशी विसरणें कठीण, तशीच हीहि रात्र ठरणार हेंहि उघड झालें. विरोध व संगति हीं विचारांचीं बीजें होत. खुर्चीवरील तंद्रींत फार वेळ बसावें लागलें नाहीं. थोड्या वेळांतच 'साब, छोटा चहा लाया है' असें म्हणून नौकर आंत आला. ट्रेमधील चहाचीं उपकरणीं पाहून तो चहाच आहे याची खात्री झाली. रात्र संपली, संभाव्य भीति संपली. अनुभवाची विफलता व रात्रीच्या दुःखाची स्मृति घेऊन मीं तो प्रासाद सोडला. पण रसिक मनानें त्या घटनेला साहित्यिक स्वरूप देऊन चिरंजीव करण्याचा प्रयत्न केला आहे. किंग्ज् सर्कलच्या लॉकअपमधील ती रात्र व राजवाड्यामधील ही – दोन्ही एकाच मालकाच्या वास्तूंत काढल्या, आणि म्हणूनच कीं काय समान अनुभव आला !— सुसंगति ! !



## ७ : वाण्या, तेवढा कोट दे ना!

" महारडा फार माजलाय्—! मस्ती आली आहे त्याला!"

बोलणारी व्यक्ति फार त्वेषानें बोलत होती. त्वेषाचा सोबती राग थरथर कांपत होता. अपमानित अभिमान दंशासाठीं फणा काढून तयार झालेल्या नागाप्रमाणें भासत होता. भोंवतालील वातावरण कलहवृत्तीचेंच होतें. प्रेक्षक कलहांत रस घेऊन त्यांत व्यवसाय व व्यापार करणारे होते. ज्या धर्माची ती व्यक्ति होती तो धर्म सौजन्यासाठीं प्रसिद्ध होता. अनुद्वेगकर वाक्य बोलूं नये अशी त्या धर्माची शिकवण होती. सर्व तपांत वाङ्तप श्रेष्ठ अशी त्याची घोषणा होती. सर्वाभूतीं परमेश्वर आहे असा त्याचा संकेत होता. ज्या जातीची ती व्यक्ति होती ती जात नम्रतेनें सर्व जिंकण्यांत प्रवीण होती. सौद्यांचा उपक्रम व उपसंहार हा नम्र व गोड वाणीनें करावा हा दंडक मानणारी ती होती. 'कार्यमध्ये तु कर्कशः' हें तिचें लक्षण होतें. जो व्यवसाय ती करीत होती त्यांत वाणीचें माधुर्य हें भांडवल होतें, व लेखणीचें मोल हें दिवसरात्र चालणारें व्याज होतें. बोलणारी व्यक्ति हिंदु धर्माची, वैश्य जातीची, सावकारी करणारी होती.

या सर्व पार्श्वभूमीवर त्या व्यक्तीनें उच्चारलेले शब्द आश्चर्य व नंतर खेद उत्पन्न करणारे होते. माझा धंद्यांतील अनुभव त्या क्षणापर्यंतचा फार नव्हता, पण जो होता तो वर दिलेल्या पार्श्वभूमीला सुसंगत असा होता.

१९२४ मधील ती गोष्ट असावी. असहकारितेची लाट इतिहासजमा झाली होती. गांधीजी शस्त्रक्रियेनंतर सुटून विधायक कार्यक्रम, निष्क्रियांना काम, व शूरांना पराक्रमाची संधि कशी देईल याच्या विवंचनेंत होते. 'ना वकील ना दलील'चे नारे खतम झाले होते. १९२०–२१ मध्यें नवीन वकीलपत्र घेणार नाहीं म्हणून प्रतिज्ञा केलेले वकील आतां 'बट्टू'-मार्फत काम न चालवितां स्वतः चालवूं लागले होते. तसें म्हणाल तर ज्यांना वकिलीनें सोडलें होतें त्यांनीं वकिली सोडली होती, व ज्यांना वकिली सोडावयाची नव्हती अगर शक्य नव्हतें, ते सर्व गनिमी काव्यानें मराठ्यांचा

आदर्श चालवीत होतें. घरीं अशील 'सल्ला' घेत होते, कोर्टात 'जुनीं कामें' चालूच होतीं. लेखांतून व व्याखानांतून गांधींचा कार्यक्रम अन्यवहार्य हा निनाद चालूच होता. 'गोणपाटांचासुद्धां स्वातंत्र्यासाठीं पोषाख करूं' म्हणून शंखनाद पण करण्यांत आला होता. तथापि ज्या क्षणाबद्दल मी सांगत आहे, त्या वेळेला हें सर्व अप्रस्तुत व अनवश्यक झालें होतें. 'कार्यक्रम अव्यवहार्य' शाबित झाला होता असें अनेक मानूं लागले होते. विधिमंडळांतील कामगिरीचा भाव तेजींत होता. व्यापारी—जे गांधी-युगांत नेते झाले, व ज्यांनीं कांहीं कार्यक्रम जरी अमलांत आणला नव्हता तरी त्यांची देशभक्ति बिनजोड ठरली होती. १९ व्या शतकांतील नेतृत्व विद्वत्तेवर आधारलेलें होतें. २० व्या शतकांतील पहिल्या २० वर्षांतील नेतृत्व कमाल स्वार्थत्यागावर आधारलेलें होतें. दहशतवाद चांगला कीं वाईट हें बाजूला सारलें तरी त्यांतील प्राणान्तिक धोका डोळ्यांआड टाकण्यासारखा नव्हता.पण गांधीयुगांत राजकारण जनतेंत पसरलें व नेतृत्व व्यापारी वृत्तीचें बनलें. प्रत्येक 'त्यागा'ची किंमत ठरवून व पटवून व्यक्ति वागतांना दिसूं लागल्या. स्वदेशी व्रतानें व्यापारी-वर्गाचें फावलें; गिऱ्हाईक नागवलें. पोषाखानें पराक्रम मापण्यांत येऊं लागला. टकली फिरावितां आली कीं राजकारण चालविण्याची पात्रता आली. चरख्याचें शास्त्र गीताशास्त्रालाहि मागें टाकूं लागलें! बावळट पोषाख व कष्टी मुद्रा हीं कार्यकर्त्यांचीं लक्षणें ठरलीं. अभ्यास अडगळ ठरला. आधुनिकता प्रगति न ठरतां स्वातंत्र्याच्या मार्गातील धोंड वाटूं लागली. गरजा कमी करणें हें अर्थशास्त्र नामवंत झालें. या वातावरणांत खरी तळमळ व प्रामाणिक बुद्धि निर्वासित झाली.

वकिलाची सनद मीं कोणत्या मुहूर्तावर घेतली कोण जाणे, घेतांच कलकत्त्याच्या कॉंग्रेस अधिवेशनानें १९२० ऑगस्टांत असहकार जाहीर केला. १९२० डिसेंबरमध्यें नागपूर अधिवेशनांत कॉंग्रेस गांधमिय झाली. ५–६ महिन्यांपूर्वी सुरू झालेली वकिली बाळसें धरीना. मन द्विधा झालें. सोडल्याचें जाहीर झालें; पण ज्यांच्या वचनावर भरंवसा ठेवून सोडल्याचें कबूल केलें ते वचनापलीकडे जाईनात. परिणाम सोडल्याचें जाहीर झालें,—पण सोडली नाहीं. तथापि ती नाममात्रच होती, व त्यांतहि सार्वजनिक खटलेच पुष्कळ होते. चळवळींत भाग घेतल्यानें वकिलीचें पापक्षालन झाल्यासारखें दिसलें. ३ वर्षांच्या अनुभवानें नवेंजुनें नेतृत्व यांची ओळख

झाली. जुने कुवत ओळखून वागत नव्हते, नवे कुवतीबाहेर वागत होते. एक उत्साह म्हणजे हुल्लड समजे, तर दुसरें विवेक म्हणजे कार्यरतता मानी. कार्यापेक्षां नेतृत्वासाठीं धडपड होती. कांहीं थोडे नवीन असहकारितेच्या चळवळींतून क्रान्ति निर्माण होईल म्हणून त्यांत पडले होते. त्यांची तळमळ त्यांना स्वस्थ बसूं देत नव्हती. साधनांची महति त्यांना वाटत होती. पण साध्याचा त्याग साधनासाठीं करण्यास त्यांची तयारी नव्हती. कोतवाली घोडा म्हणून घ्यावा व माकणीचें तट्टू निघावें,– असा त्यांना अनुभव आला. 'एका वर्षांत स्वराज्य' ही घोषणा बुद्धीला न पटलेले पण भावनेनें भारलेले अनेक होते, व ते तरुण होत. जीवनाचा आंखलेला कार्यक्रम त्यांनीं बाजूस सारून ते चळवळींत सामील झाले होते, व तिच्या यशासाठीं विश्व-प्रयत्न करण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. जुन्यांनीं पुढारीपणा स्वीकारून चळवळीला पोखरून टाकली. असहकारिता म्हणजे 'असें हो काय करतां' अशी तिची टवाळी करून कित्येकांनीं विघ्नसंतोषी वृत्ति प्रदर्शित केली. चळवळींत शिरून कित्येकांनीं तिला कामधेनु करून जें पाहिजे होतें तें साधलें. १९२४ सालांत जुन्यांना जिंकलें असें वाटलें. नव्यापैकीं जे तरुण नव्हते ते उदासीन झाले होते. 'संभवामि युगे युगे' याप्रमाणें भक्ताच्या कीर्ती-साठीं गांधीजी पुन्हा चळवळ करतील व पुन्हा आपला भाव वाढेल, वसंत येईल त्या वेळीं काक व कोकीळ यांची परीक्षा होईल, या श्रद्धेनें अगर धोरणानें ते स्तब्ध होते. जीवनांतील पूर्वीच्या मुक्कामास बहुतेक सर्व आले होते. दररोजच्या आश्रमीय प्रार्थनेनें कित्येक स्थितप्रज्ञ झाले होते व जयापजयाबद्दल बेफिकीर होते,–निदान तसें दिसत होतें. मी जुना नव्हतों, वृद्ध नव्हतों, आश्रमीय नव्हतों. आपला पराजय झाला, निदान यश मिळालें नाहीं या जाणीवेनें मन खट्टू होतें. आपलें काम आपण केलें हें समाधान मनाला नव्हतें असें नाहीं, पण मन तेवढ्या समाधानानें समाधानी नव्हतें. लग्नाची अक्षत वांटावी व लग्नच मोडावें – अशी स्थिति होती. वकीली सोडल्याचें जाहीर होऊन – थोडी का होईना–चालू होती. यशरूपी शिवधनुष्य उचललें, पण मोडतां आलें नाहीं ही इतिहासाची साक्ष होती. यश व अपयश नेत्याचें–हें खरें असलें तरी सैनिकाचें मन म्हणून कांहीं असतेंच कीं नाहीं? साम्राज्यसत्ता भंग पावली नाहीं, उलट त्याखालील कोर्टांत आतां पूर्णपणें जाणें येऊन उभें राहिलें. बोलल्याप्रमाणें झालें नाहीं, याची

लाज त्या वेळीं नेतृत्वाच्या बालवर्गात असल्यानें वाटत होती. घडलें तर आपल्यामुळें, व बिघडलें तर अनुयायांमुळें,–या नीतीचा साक्षात्कार त्या वेळीं झाला नव्हता ! तात्पर्य, बार्डोलीनंतर अपराधी मनानें वकिलीच्या व्यवसायांत पाऊल पुढें पुढें टाकीत होतों. ज्ञानांत भर पडली नाहीं, बुद्धीला बाजूला सारून भावनेनें कार्य करून यश भेटलें नाहीं, तळमळीची थट्टा झाली. तथापि अनुभव जमेला बराच वाढला. व्यवसायांत जें कांहीं करतां येईल तेवढेंच अल्पमपि बहु मानीत होतों. चळवळीनें व्यापारी वर्गाची चैन झाली हें तर उघड. पण चळवळींत भाग घेतल्यानें वकिलीचा व्यवसाय वाढला, मिळकत नसली तरी मान वाढला असें जर कोणी म्हणाला – तर माझ्या बाबतींत तें खरें होतें. चळवळीनें प्रसिद्धि दिली, अनेकांशीं संबंध घडवून आणले, गुणांना अगर अवगुणांना म्हणा,– वाव मिळाला, आणि अशाच एका खटल्याच्या निमित्तानें साधु वाणी माझे अशील झाले होते,– व सुरुवातीला दिलेले शब्द त्यांच्या मुखांतून निघाले होते.

टाटाच्या धरणाखालीं मुळशी पेट्यांतील शंभरांवर गांवें बुडणार होतीं. हजारों शेतकरी निर्वासित होणार होते. देशाच्या दृष्टीनें धरणाच्या योजनेनें औद्योगीकरणाला मदत होणार होती. योजनेचा प्रश्न आर्थिक दृष्ट्या सोडविण्याचा खरा मार्ग टाकून त्याला राजकीय स्वरूप अनेकांनीं आणलें. १४ योजना आहेत. त्या टाटा करणार आहे, व त्या झाल्या म्हणजे महाराष्ट्र, मावळे व मराठे संपतील, देशोधडीला लागतील. भांडवलवाल्यांच्या हितार्थ हें बलिदान होत आहे. तात्पर्य, महाराष्ट्रांत हा प्रश्न कमाल महत्त्व पावला. योग्य मोबदला व अन्यत्र वसाहतीच्या सोयी केल्या म्हणजे संपलें. देशाच्या हितार्थ हें आहे अशा दृष्टीच्या अनेकांबरोबर मी होतों. तथापि १९२२ सालचें महाराष्ट्रीय राजकारण कांहीं विलक्षण होतें. गांधींचें तुरुंगांत जाणें, असहकारितेचें स्थगित होणें, याचा परिणाम नव्या नेतृत्वावर प्रक्षोभक असा झाला. आपण कांहीं तरी चळवळ न केल्यास जुने लोक लोकमतावर आपली मांड पुनः बसवतील, व आपण पुनः स्मृतिशेष होऊं असें त्यांना वाटूं लागलें. त्याच सुमारास मुळशीचा प्रश्न आला. 'जान कां जमीन' असें त्यांचें पृथक्करण झालें. मुळशी पेटा सभांचें व चळवळींचें रणमैदान झालें. धरण झालें तरी तें उडवून देऊं – येथपर्यंत घोषणा गेल्या. सत्याग्रह झाला. जुन्यांतील चुकार गुरफटले गेले. पुन्हा आपण मागें नाहीं, हें दाखविण्यासाठीं

सत्याग्रहाच्या चळवळींत अगर दलदलींत त्यांचे पाय फसले. नव्यांतलि कांहींना सत्याग्रह हा दवा आपलें नेतृत्व बाळसें धरील म्हणून घ्यावासा वाटला. कांहीं बापट व देव यांच्यासारखे तळमळीनें त्यांत पडले. विद्यमान दुःख व भावी सुख, व्यक्तीची गैरसोय व समाजाची निकड यांत विवेकानें करावयाचा समन्वय त्यांच्या हृदयांना पटेना. आपली तळमळ शुद्ध म्हणून आपलें मागणें न्याय्य अशी त्यांची प्रामाणिक समजूत होती; व याची किंमत अमाप देहदंड सोसून त्यांनीं दिली. अन्य, प्रायश्चित्त घ्यावें त्याप्रमाणें सत्याग्रह करून पुनीत झाले. कांहीं दंडावर, कांहीं थोड्या शिक्षेवर सुटले. पण प्रायश्चित्ताचा मंत्र संपतांच चळवळीकडे त्यांनीं पाठ केली. मावळयांच्या हितार्थ निघालेली चळवळ राजकीय मानापमानाची ठरली. मावळयांचें हित बुद्धिबळांतील प्यादें ठरलें. सत्याग्रही मावळयांचे खटले चालविणें, त्यांच्या जमिनीचे पैसे सावकारांनीं घेऊं नये म्हणून खटपट करणें, सरकार व सत्याग्रही यांच्या संघर्षांत सत्याग्रहींवर होणारा आघात जनतेपुढें प्रचारित करणें, हीं कामें दोन्ही गटांच्या सांगण्यावरून मी करीत होतों. शेतकऱ्यांचे व्यवहार गहाणाचे खरे, पण दस्तऐवज खरेदी स्वरूपाचा, असा प्रघात महाराष्ट्रांतील इतर भागांप्रमाणें तेथेंहि होता. सावकार,— यांत वाणी विशेष, व मराठे— ब्राह्मण थोडे, सुरुवातीला सत्याग्रहाच्या बाजूनें होते. 'धरणाचा पहिला धोंडा माझ्या डोक्यावर पडेल' म्हणणारे सावकार प्रथम फुटले व सोन्याचा धोंडा घेऊन बसले. मावळे तुरुंगांत गेले. इकडे सावकारांनीं खरेदीच्या दस्तावरून मोबदल्याच्या रकमा घेण्यास सुरुवात केली. अखंड फळी फुटली, तथापि शेंकडों शेतकऱ्यांतर्फे अर्ज करून रकमा अडकवण्यांत आल्या. वाद झाले. व्यवहार गहाणाचे ठरले. शेतकऱ्यांना मोबदला मिळाला. कांहीं शेतकरी जे सत्याग्रहांत नव्हते, व ज्यांना कंपनीचे व सरकारचे अधिकारी वळवूं शकले,—त्यांनीं रकमा घेतल्या. आवळसचा साधु वाणी सत्याग्रहांत होता, तुरुंगांतहि कांहीं आठवडे होता; व जेव्हां बाहेर आला तेव्हां त्याला आढळून आलें कीं, त्याच्याकडे असलेली— निदान त्याच्या नांवावर असलेली मालकी जमीन तुकनाक महार वहिवाटीत होता, व जी बुडणार होती ती तुकनाकची ठरली,— व तिचा मोबदला तुकनाकनें घेतला. सत्याग्रहांतील ओळखीनें साधु वाणी मजकडे आला, व त्यानें रकमेबद्दल फिर्याद दाखल केली;— त्यांत मी वकील होतों.

तसा साधु वाणी पापभीरु होता. अन्यांसारखा नव्हता. प्रामाणिकपणें सत्याग्रहांत सामील झाला होता. आशा असेपर्यंत सैनिक व्यक्तिदृष्टीनें पहात नाहीं, पण पराजयाची जाणीव होतांच जो तो सैनिक स्वतःच्या संरक्षणाची अभिलाषा धरतो. या चळवळींत हेंच झालें. बाहेरचे पुढारी कीर्ति पदरांत पाडून पसार झाले. तळमळणारे सहानुभूतीशिवाय अधिक कांहीं करूं शंकले नाहींत. शंकररावांनीं फटके खाल्ले, पण मावळ्यांच्या जमिनी राहिल्या नाहींत. पराजयांत प्रत्येक जण दुसऱ्याला दोष देतो, तसेंच झालें. सावकार शेतकऱ्यांना शिव्या देत, शेतकरी सावकारांना, व दोघेहि पुढाऱ्यांना,—याप्रमाणेंच झालें. जो तो आपल्याला मोबदला कसा मिळेल, कसा अधिक मिळेल याचीच विवंचना करूं लागला. जान कोणी घेईना, जमीन कोणाची राहीना; मोबदला कोणाला मिळेल याचा भरंवसा वाटेना. निःस्वार्थ चळवळीनें कमाल स्वार्थ उत्पन्न केला ! पैशाला माती समजा म्हणणारे मातीच्या कणाकणाचा पैसा मागूं लागले. कोर्टबाजी असहकारितेनें खतम् व्हायची होती, ती दुपटीनें वाढली. वकिलांचें फावलें, त्यांत मीहि आलोंच. इतकेंच काय, माझ्या घराला कित्येकांनीं 'मुळशीमहाल' नांव दिलें ! निदान अजूनहि त्या भागांतील लोक प्रेमानें मजकडे येतात व उतरतात. कृतज्ञतेला हें नामाभिधान मान्य आहे. अनीतीनें एक कणहि मिळविला नाहीं ही अंतःकरणाची ग्वाही आहे. तात्पर्य, सर्व कज्जांतून मी शेतकऱ्यांच्या बाजूनें होतों, व साधु वाण्याची बाजू योग्य अशी माझी प्राथमिक कल्पना असल्यानें व तो सत्याग्रही असल्यानें त्याचा दावा दाखल केला होता. ज्या दिवसाची हकीकत मी सांगत आहें तो दिवस सुनावणीचा होता. कोर्ट विश्रामबागवाड्यांत होतें. त्या दिवशीं सकाळीं जेव्हां नामवंत वकिलाप्रमाणें सर्व कागद वाचले, त्याच वेळीं मनोदेवता सांगूं लागली कीं यांत साधु वाणी याचा पक्ष सत्पक्ष नाहीं. त्याला सांगितलें, कीं दावा आपल्यासारखा झालाच पाहिजे ! कारण अशीलास जयाची खात्री देणें ही व्यवसायाची महान् नीति आहे अशी माझी समजूत पुण्याच्या अनुभवानें झाली होती.

खटला उभा राहिला. कोर्टाला वादीची बाजू संक्षेपानें सांगितली. वादीच्या आजानें प्रतिवादीच्या पूर्वजांपासून जमीन रु. ४०० रोख देऊन—कारण तसा उल्लेख दस्तांत होता—विकत घेतली होती. सरकारी कागदपत्र त्याप्रमाणेंच होते. जमिनीची मोबदल्याची रक्कम रु. २००० (दोन

हजार) प्रतिवादीनें घेतली आहे. ती रक्कम, त्यावरील आजतागायतचें व्याज व दाव्याचा खर्च याप्रमाणें मिळण्याचा हुकूम व्हावा. तुकनाकनें वकील केला नव्हता. मी म्हणालों, "तुला वकील करायचा असेल तर कर, तारीख पुढें पडेल." साधु वाणी माझ्या बोलण्यानें चपापला. सामान्य अनुभवानें तो मला मोजत होता. प्रतिवादीचा वकील नाहीं हें पाहून हुकूमनामा करून घेणें अगर दावा चालविण्याची निकड करणें ही व्यवसायांतील एक सामान्य गोष्ट आहे. "दादा मला वकील नग, तुम्हीच माझे वकील!" साधु वाणी अर्थपूर्ण दृष्टीनें मजकडे बघूं लागला. मी म्हणालों, "कोर्टाला सांग तुला काय सांगायचें आहे तें."

फाटकी पैरण, लंगोटी, पाण्याशीं फाळणी केलेलें मुंडासें,– हा नेहमींचा तिकडील महारांचा, धनगरांचा पोषाख असे. पण रु. दोन हजार मिळाल्यानें म्हणा,–तो लहानसें गुडघ्यापर्यंतचें धोतर नेसला होता, पैरण बरी होती, महारशाही मुंडासें, पायांत वहाणा, हातांत विशिष्ट प्रकारची काठी, व खांद्यावर घोंगडी,–अशी त्याची काळी मूर्ति पाहून पंढरीचा विठोबा दामाजीपंतांच्या वेळीं असाच दिसला असेल अशी रम्य कल्पना मनाला शिवली. तो बोलूं लागला, "साहेब तीन डोईचा सावकार हय. कागद झाल्यापासून आम्ही खंडीभर सरतीला घालतों. जमीन आमचं ताब्यांत हय, आमची हय जी,– तुम्ही न्याय दावा." ४० वर्षांवर दरसाल खंडीभर भाताचा खंड घेऊन वादीनें रक्कम मागावी यांतील अन्यायाचें चित्र माझ्या डोळ्यासमोर उभें राहिलें. व्यवहार उघड गहाणाचा होता. साधु वाणी प्रामाणिकपणें खरेदीचा समजत असता तरी, ताबा व एवढा खंड या दोन गोष्टी लक्षांत घेतां न्यायी कोर्ट व्यवहार गहाणाचा ठरवील यांत शंका नव्हती. पण कोर्टांत न्याय व कार्यकर्त्यांत निरभिमान सांपडेलच असें नाहीं. "हल्लीं तूं काय करतोस, तुझी शेती आतां आहे का रे?" म्हणून कोर्टानें प्रश्न केला. याचा अर्थ मी समजलों; जर त्याची शेती नसेल तर कायद्यानें जो लेखांत व्यवहार दाखविला असेल तोच खरा मानला जाईल, व दाव्यांतील व्यवहार खरेदीचा ठरेल. मीं तुकनाकला विचारलें, "अजून जमीन बुडाली नाहीं ना?" त्यानें उत्तर दिलें, "नाहीं, व औंदाभी थोडी लावली आहे." कोर्टानें माझ्याकडे पाहिलें. मी त्याला म्हणालों, "आतां आवळस बुडणार, जमीन बुडणार, पिढयान् पिढयांचे संबंध तुटणार, पुन्हा तुम्ही भेटणार नाहीं; कमीजास्त

करून मीटव ना !" "दादा, तुमच्या शब्दाबाहेर मी नाय." कोर्टानें पण वादीस सांगितलें कीं, "तुमचे वकील सांगतात तें माना." मी तुकनाकास म्हणालों, "दस्त रु. ४०० चा आहे, तुला दोन हजार मिळाले तरी ४०० वाण्यास दे, व हा तीन ढोईचा सावकार भागव."

साधु वाणी सर्द झाला, पण हिंमत घेऊन म्हणाला, "वकीलसाहेब, आतांपर्यंत खर्च दोनशेंवर झाला, दहा हेलपाटे झाले, तुमची फी पण द्यायची आहे, मजवर तुम्ही अन्याय करतां !" मी म्हणालों, "माझी फी मागत नाहीं, खर्चाचीच रक्कम तुला मिळते आहे असें समज. हिशोबच घेतला गेला तर तुला किती द्यावे लागतील याचा विचार कर. तूं व्यापार करून मिळवशील. तुकनाक कोठें जाईल ? पिढ्यांचे संबंध गोडींत संपूं दे."

वाणी स्तब्ध राहिला. तुकनाकनें भर्रकन् कमरेला बांधलेल्या नोटा सोडल्या. रु. ४०० वाण्याला दिले. कोर्टानें कज्जा मिटला म्हणून निकालांत काढला. आम्ही तिघे जिना उतरून वाड्याच्या चौकांत आलों. तुकनाकनें वाण्याचा हात धरला व म्हणाला, "वाण्या, तेवढा कोट दे ना !"

मीं ऐकलें, पण एका क्षणांत विजेचा झटका बसावा तसें वाण्यानें सुरुवातीला दिलेलीं वाक्यें रागारागानें उच्चारून तुकनाकचा हात बाजूला सारला.

चौक कोर्टाच्या कामासाठीं आलेल्या लोकांनीं गजबजून गेला होता. बेलीफहि इकडून तिकडे हिंडत होते. उगाच कोर्टांत हेलपाटे घालणारेहि तेथें होते. एके काळीं विलासाचें विश्रामस्थान असलेली ती वास्तु होती. दरम्यानच्या काळांत विद्यादानाची भूमि म्हणून तिचा लौकिक होता. विलास–विद्या यांचा त्याग करून कज्जे–कलहाचें दुकान तेथें थाटलें गेलें होतें. तीन चौकी वाडा सात कोर्टांनीं व्यापला होता. अनंत कज्जे तेथें मिटत, तितकेच निदान बरेचसे तेथें पुनर्जन्म घेत. अनेकांच्या आशांची तेथें समाधि बने, तर अनेकांचे मनोरथ परिपूर्ण होत. आशानिराशा, सुखदुःख क्षणाक्षणाला पाहणारी ती वास्तु होती. निराकार हक्कासाठीं भांडणाऱ्या व्यक्तीपासून लक्षावधी किंमतीच्या मिळकतीसाठीं पिढ्यान् पिढ्या

भांडणारीं कुटुंबें तेथें अस्तित्व गाजवून गेलीं होतीं. पण एका जुन्या कोटासाठीं कमरेस शेंकडों रुपये असणारा, मागणी करणारा, अगर ती मागणी केली म्हणून संतापून बोलणारी व्यक्ति त्या वास्तूनें खास पाहिली नसेल. आवाजाच्या मोठेपणामुळें व शरीराच्या हावभावांमुळें क्षणांत बरेच लोक आमच्या भोंवतीं जमा झाले. एक पुण्यकृत्य केलें, एका कज्जांत उभय पक्षकारांना न्याय मिळवून दिला, कलहाचा निर्वंश केला, एक सामाजिक सेवेचें सत्कृत्य केलें, या अहंकारी भावनेनें कोर्ट सोडतांना माझें मन प्रफुल्ल झालें होतें, आणि क्षणांत पुन्हा कलह जन्माला आला. कोटाची मागणी ती काय, व वाणी संतापतो काय, या घटनेचें आकलन होईना.

मीं दोघांकडे पाहिलें. वाणी लाल झाला होता. दानाऐवजीं शासन व सूड त्याच्या नजरेंतून पेट घेत आहे असें वाटलें. महार मागणी करीत होता, पण याचक–वृत्ति त्याच्या डोळ्यांत दिसत नव्हती. या घटनेंतून आणखी काय निघणार याचा कयास लागेना. मी म्हणालों, “ तुकनाक, चल घरीं. मी माझा कोट तुला देतों.” माझे शब्द त्यानें ऐकले, पण त्याची दृष्टि वाण्यावर खिळली होती, त्याचें लक्ष वाण्याच्या मळकट कोटावर केंद्रित झालें होतें. वाण्याला कोट दे, असें सांगण्याची मला बुद्धि होईना. मी तुकनाकचा हात धरला व विश्रामबाग वाड्यासमोरील रस्त्यावर आलों. वाणीहि बरोबर आला, पण तेथून तो मंडईकडे वळला. एकवार त्यानें आम्हांकडे पाहिलें व तोंड फिरवून तो चालूं लागला. काय विचार माझ्याबद्दल त्याच्या मनांत आले हें बालाजी जाणे ! आज या गोष्टीला पाव शतक झालें; पुन्हा तो मला भेटला नाहीं, त्याबद्दलची मला बातमी नाहीं.

घरापर्यंत तुकनाक आला. मी अंगांतील कोट काढून त्याला देऊं लागलों. फीचा त्याग केलाच होता. ५–१० रुपयांच्या कोटाची भूयसी देऊन पूर्ण पुण्य तरी कां न घेऊं ? तुकनाक कोट घेईना. मला कळेना कीं, वाण्याच्या मळक्या कोटांत काय रहस्य होतें ? महार गहाण फेडणार नाहींत, व पिढ्यान् पिढ्या देणेकरी राहतील ह्या अभिमानावर विजय मिळाला, व त्याची निशाणी म्हणून तर महार कोट मागत नव्हता ना ? पददलितानें प्रस्थापित प्रतिष्ठेची कोट घेऊन पताकाच खालीं केली असा तर भाव त्याला आपल्या रहाळांत उत्पन्न करावयाचा नव्हता ना ? तीन डोईच्या सावकाराला चारशें रुपये

दिले व त्यानें फक्त कोट दिला, ही क्रूर विसंगति का त्याला दाखवावयाची होती ? त्याच्या मागणींत केवळ स्मृतीचा भाव होता, का गर्वाची तीव्रता होती ? उच्च वर्गातील कोट म्हणजे सामाजिक अधिकारांचें वस्त्र अशी तर त्याची समजूत नसेल ना ? वर्गीय भावनेची जाणीव होती म्हणून का तो असा वागत होता ? त्याची कोटाची मागणी व वाण्याचा नकार यांत वस्तूंच्या मूल्याचा खास संबंध नव्हता. वाण्यानें दिला असता तरी ४–५ रुपयांपलीकडे त्याचें दान झालें नसतें. ४–५ रुपयांसाठीं महार क्षणभर कां होईना, लक्ष्मी प्रसन्न झाली असतां मागणी करण्याइतका अभिमानशून्य नव्हता ! वाण्यानें खास आपल्या आयुष्यांत जुनीं वस्त्रें अनेक वेळां दान दिलीं असलीं पाहिजेत. ग्रहण नसतांहि मागणी होती म्हणून ती दानाची खास नव्हती. दान खास नव्हतें. मग – मग काय देणें होतें ? तर कोण कुणाचें देणें होतें ? अनेक कल्पना मनांत आल्या, पण घटनेचा बोध होईना. वाणी देईना; मी देत असतां तुकनाक घेईना. मी म्हणालों, "तुकनाक, तुला कोट हवा ना ? – हा घे."

"वकीलसाहेब, तुमचा नग." "मग वाण्याच्या कोटांत काय एवढें आहे ?" महारानें विलक्षण दृष्टीनें मजकडे बघितलें; "तुम्हांस नाहीं ठावयाचें" असें म्हणून जाहीर करून तो माझ्या घराबाहेर पडला. तोहि पुन्हा दिसला नाहीं व त्याची बातमीहि आजतागायत मला नाहीं.

वाणी आणि महार दोघेहि गेले. माझा कोट कांहीं काळानें जीर्ण–शीर्ण झाला; पण वाण्याच्या कोटाचें कोडें अद्याप न सुटलेलें असेंच राहिलें आहे. आणि जेव्हां जेव्हां जुना कोट टाकून नवा घालतों, तेव्हां तेव्हां या घटनेची पुन्हा स्मृति होते, व पुन्हा बुद्धीला हें कोडें अगम्य ठरतें. मानवी मन सर्वस्वी कोणीं जाणलें आहे का ?



# ८ : काट्यानें विडी ओढली!

---

"काट्यानें ओढलीन् शेवटीं विडी" असे रागारागानें उच्चारलेले शब्द – व त्यानंतर फाइफाइ श्रीमुखांत बसल्या. त्यांचा आवाज भोंवतालच्या श्रोत्यांना व प्रेक्षकांना ऐकूं आला असला पाहिजे. गोळीबार केल्यानंतर सैनिक ज्याप्रमाणें लक्ष्य छेदलें गेलें आहे किंवा नाहीं हें पाहतो, मारणारी व्यक्ति त्याचप्रमाणें भूमीवर पडलेल्या जीवाकडे पहात होती. त्या व्यक्तीच्या दृष्टींत सैनिकाचा कठोरपणा नसून मातृहृदयाचें वात्सल्य दिसत होतें. दिलेल्या शिक्षेंत शिक्षणाचाच आशय अधिक होता. सैनिक गोळी नीट लागल्यानंतर आनंदित होतो, व किंचित् अहंभाव, किंचित् अभिमान त्याच्या चेहऱ्यावर नैसर्गिकरीत्या दिसून येतो. येथें आनंदाऐवजीं खेद, अभिमानाऐवजीं अनिवार्यता, व अहंकाराऐवजीं अगतिकत्व स्पष्ट होत होतें. किती तरी वेळ मारणारी व्यक्ति भूमिगत झालेल्या व्यक्तीकडे बघत होती. भोंवतालचे प्रेक्षक स्तब्ध होते; आणि या घटनेचें पर्यवसान कसें होणार यामुळें सचिंत झालेले दिसत होते. कारण भूमिगत झालेला जीव कासावीस झालेला व किंचित् डोळे पांढरे केलेला असा दिसत होता—

—आणि ही घटना जवळजवळ अर्ध्या शतकापूर्वीची असेल. १९०२ सालच्या सुमारास पुण्यांत प्लेग असल्याकारणानें आम्हीं सर्व नजीक आमच्या आजोळीं म्हणजे दौंडजवळ भीमेच्या कांठीं असलेल्या अष्टविनायकांपैकीं सिद्धटेक येथें गेलों होतों. तो काळ असा होता कीं, पुण्यामध्यें सालोसाल गणपति उत्सव पुरा होतो न होतो तोंच प्लेग सुरू होई, व साधारणपणें संक्रान्तीच्या आसपासपर्यंत तो चाले; हा क्रम कित्येक वर्षें चालू असे. व आम्हां मुलांना प्लेगचें आगमन म्हणजे आनंदाची पर्वणीच वाटे. प्लेग सुरू होतांच आम्हीं सिद्धटेकास जात असूं व प्लेग संपल्यानंतर पुण्यास परत येत असूं. सिद्धटेकास घालवावयास मिळालेले तीन चार महिने म्हणजे सर्व दृष्टींनीं व सर्व क्षेत्रांत उनाडपणा करण्याची संधि, असा त्याचा अर्थ व अनुभव होता. नदींत पोहावें – निदान डुंबावें, चिंचा–बोरें खावींत, मारा-

माऱ्या कराव्यात, शेतांतून हिंडावें, घोड्यावर बसावें— तात्पर्य, गुलामींत-मुद्धां आम्हांला तें स्वराज्य लाभलें होतें !

सिद्धटेक हें एक रमणीय खेडें आहे. गांव अर्धा डोंगरावर व अर्धा डोंगरपायथ्याशीं वसलेला असून लहानसाच पण टुमदार आहे. सर्व जातींचीं मिळून शंभर कुटुंबें असतील, व बहुतेकांना गणपति संस्थानांतून असामी असे. बदामी फत्ते करून आल्यानंतर हरिपंत तात्या फडके यांनीं बांधलेली प्रचंड वेस व त्यावर बांधलेला नगारखाना हें एक सिद्धटेकचें वैभव होतें. ब्राह्ममुहूर्तावर सुरू होणारें संगीत प्रत्येक प्रहराला चाले, व मध्यरात्रींचा डंका काळांतील एक दिवस इतिहासजमा झाले हें प्राणिमात्राला बजावीत असे. गणपतीचें मंदिर व सभामंडप, आणि त्या ठिकाणीं होणारे उत्सव, कथा–कीर्तनें, आरत्या व भजनें यांनीं त्या गांवची धार्मिक आबाडी दरोबस्त राखली जात होती. नदीवरील विस्तीर्ण व पैलूदार घाट म्हणजे एक नयन-मनोहर दृश्य होतें. त्या ठिकाणीं भीमा नदीहि आधुनिक साहित्याप्रमाणें विशालव्यापी पण अल्पअर्थी अशी, विस्तीर्ण पात्र पण नाममात्र प्रवाहानें वर्षांतील बहुतेक काळ वहात असे. नदीवरील आम्हां मुलांच्या लीला कांहीं व्यक्तींना तरी गोकुळींच्या कृष्णाची आठवण करून देत असल्या पाहिजेत. आमचें आजोळ हें त्या गांवांतच नव्हे तर त्याजवळील प्रदेशांत नामवंत ज्योतिषी घराणें समजलें जात असे. सकाळपासून संध्याकाळपर्यंत मामांच्या ओसरीवर आसपासच्या खेड्यांतील दररोज दहावीस तरी स्त्रीपुरुष येत, व रोजची प्राप्ति निदान दोन चार आणे, दहापांच खारका, दोनचार खोबऱ्याच्या वाट्या इतकी होती,–असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं. नांगराला मुहूर्त सांगण्यापासून मुलाचें नांव ठेवण्यापर्यंत नानाविध प्रश्न विचारले जात. गणपतीच्या दूर्वा, चुलींतील राख, कागदाचे तुकडे, कोंबलेले ताईत इत्यादि वस्तूंची नित्य घडामोड होई. भाविकपणें प्रश्न विचारले जात व तितक्याच भाविकपणें उपाययोजना सांगितली जाई. उभयपक्षीं श्रद्धा असल्यामुळें श्रद्धेनें जें होतें तें होई. ज्यांचें सांगितल्याप्रमाणें होई ते कृतज्ञतेनें सांगण्यास येत. ज्यांचें होत नसे तें आपलें दैवच खोटें मानून हिंदु संस्कृतींतील सौजन्य वागणुकींत आणीत. आमचे मामा या कारणानें गांवांतील एक श्रेष्ठ व्यक्ति समजले जात. तसें पाहिलें तर गांवांत सर्वांत जास्त जमीन त्यांची होती. कांहीं नक्त नेमणूक मोकासा अंमल

म्हणून त्यांना मिळे. तथापि पांचसातशें एकर जमिनींत पिकणाऱ्या पिका-पेक्षां पंचांगांतून निर्माण होणाऱ्या दैवी पिकाकडे त्यांचें लक्ष अधिक होतें. आमच्या मुक्कामांत त्यांच्याकडे येणाऱ्या खारीक–खोबऱ्याचे आम्ही त्यांचे भाचे वारस होत होतों. आणि त्या काळीं त्यांना मुलगाहि नव्हता. खारीक–खोबऱ्याएवढीच गर्दी दररोज ओसरीवरतीं आमच्या कृत्यांमुळें जमे. सकाळपासून संध्याकाळपर्यंत करीत असलेल्या उनाडक्यांमुळें असा एकहि दिवस जात नसे,–कीं त्या वेळीं कांहीं ना कांहीं तक्रारी घेऊन गांवांतील लोक आमच्या मामांकडे व आजीकडे आले नाहींत. मुलांना झोड, मुलींची चेष्टा कर, पाण्यांत मुटके टाकून पाणी भरावयास आलेल्या स्त्रियांस भिजव, शेतांत जाऊन ताटें तोड,–एक ना अनेक तक्रारींचे विषय असत. तथापि आम्ही – म्हणजे आम्ही तिघे भाऊ मातृहीन असल्यामुळें, व आमची आई गांवांत सर्वांना गोड स्वभावानें प्रिय असल्यामुळें आमच्या विरुद्ध केलेल्या तक्रारींत आम्हांला शिक्षा व्हावी असा क्वचितच उद्देश असे. तथापि शिक्षा न होत गेल्यामुळें उनाडगिरीचें स्वरूप अधिकाधिक त्रासदायक होई हें सांगण्याचें कारण नाहीं. आणि एकदां तर आमचे मामा संतापून म्हणाले कीं, “मामी–” ते आपल्या आईला मामी म्हणत—“या कार्ट्यांच्या पुढं मी आतां जीव देऊं का?” वाक्य संपतांच आमच्यापैकीं मधल्या बंधूनें स्वयंपाकघरांत जाऊन विळी आणली व ती मामांपुढें ठेवली! भाच्याची ही तत्परता पाहून व योजक बुद्धि पाहून मातापुत्रांना खास आनंदच झाला असला पाहिजे! कारण क्षणार्धांत रागाचें पर्यवसान हास्यामध्यें होऊन भाच्यांना मामानें प्रसन्न होऊन अधिकच खारका व खोबरें दिलें. तात्पर्य, शहरांतून आलेलों म्हणून एक मान्यता, बुवासाहेबांचे भाचे म्हणून दुसरी मान्यता, व ‘आईविना’ मुलें– तिसरी. या परिस्थितींत अस्मादिकांचें जीवित जें करूं ती पूर्व असें होतें; आणि त्यांतल्या त्यांत अस्मादिक सर्वांत धाकटे, म्हणून आजोळमधील सर्व व्यक्तींचें अधिक प्रेम अस्मादिकांवर होतें. गांवची होळी व्हावी म्हणून मागील दार उघडून होळीच्या होळकरांना वर्षाच्या बेगमीच्या गौऱ्या दान देण्याचें पुण्यकार्य एकदां अस्मादिकांनीं साधलें; आणि जेव्हां मामा संतापून मारण्यास धांवले, त्या वेळीं “मी म्हातारी गौऱ्या पुन्हा लावीन, पण खबरदार त्यांना मारशील तर.” अशी आजीची ढाल तात्काळ पुढें झाली. हे व असले

अनेक विजय व पराक्रम आमच्या खातीं जमा होत होते. आणि म्हटल्या-प्रमाणें पराक्रमाला मर्यादा नसल्यानें व शिक्षेची भीति नसल्यानें नव्या नव्या क्षेत्रांत नवे नवे प्रयोग करण्याचीं थोर पुरुषांचीं पावलें सिद्धटेकच्या जीवनाच्या पाळण्यांत दिसून येत होतीं.

मामा खारीक खोबरें देत व दररोज खालीं वाण्याच्या दुकानांत जाऊन दोन अगर तीन पैशांच्या विड्या व काडेपेटी आणण्यास सांगत. एक वेळ घरच्या गणपतीचें अथर्वशीर्षाचें आवरण चुकेल, एक वेळ सिद्धिविनायकाला नैवेद्य नेण्याचें विस्मरण पडेल, पण दररोज जुडगें व काड्यांची पेटी आणणें कधींहि चुकणार नाहीं,—अगर चुकलें नाहीं असाच शेरा सत्यकथनी इतिहास-कार म्हणून माझ्या मामांच्या जीवनावर द्यावा लागेल. दररोज हें विड्या आणून देण्याचें कार्य माझ्याकडे असल्यानें साहजिकच माझी बुद्धि चिकित्सेची भावना प्रसवली. नित्य टपाल आणणारा नेणारा पोस्टमनसुद्धां एखादे वेळेला त्याच्या ताब्यांत असलेलीं पत्रें, निदान वर्तमानपत्रें, निदान खास अंक फोडून वाचतो, अगर इकडून तिकडे फायली नेणारा कारकून मध्येंच एखादी फाइल वाचतो. त्याचप्रमाणें माझ्या मनाची ओढ आकार घेत होती. या विड्यांत काय आहे, आणि मामा कां ओढतात, ओढली म्हणजे काय होतें, इत्यादि प्रश्न मनाला सतावूं लागले. आणि त्यांत मधून मधून जेव्हां आजी म्हणे, 'वासुदेव, हें विड्या ओढणें चांगलें नाहीं बरें. निदान मुलांच्यासमोर तरी ओढूं नकोस !' या तिच्या बोलण्यानें मनांतील प्रयोग करण्याची बुद्धि अधिकच वाढली. आणि कांहीं तरी करावें याचा विचार सुरू झाला. केल्याशिवाय होत नाहीं याची जाणीव झाली; तथापि ज्यांत धोका आहे असे प्रयोग प्रथम इतरांकडून करवावे ही पुढाऱ्याची जातिवंत बुद्धि याहि वेळीं थोड्या प्रमाणांत कां होईना — माझ्यामध्यें होती. बरोबरच्या वाण्याचा मुलगा सोन्याबापू, लिंगायताचा मल्लू, परदेशांचा रामसिंग, या सर्वांशीं मीं विचारविनिमय केला. विड्या मिळविणें हें काम अवघड नव्हतें, पण सोयीस्कर जागा मिळविणें राजकीय भूमिगतापेक्षांहि आम्हांला अवघड वाटलें. पहिला प्रयोग आम्हीं माळावर केला; आणि अर्धा तास खटपट करून काढी पेटवावी, पण विडीपर्यंत जाईपर्यंत ती विझावी असें होई. शंभर योजना तयार कराव्यात, पण शेवटीं पैसे मिळूं नयेत, असें जसें होतें तसेंच थोडेंसें झालें. घांटावरील विष्णूच्या देवळांत प्रयोग करण्याचें ठरवून शिव

आणि विष्णु एक स्वरूपाचे आहेत असेंच ठरविण्याचा जणूं आम्हीं घाट घातला. शंकर म्हणजे धूम्रपानाची देवता अशी आमची कल्पना. संकेता-प्रमाणें आम्हीं त्या देवळांत शिरलों, पण तें विष्णूचें देऊळ शंकराचें देऊळ झालें होतें,– म्हणजे पडिक व उपेक्षित झालें होतें. मोठ्या कष्टानें आम्ही तिघेचौघे आंत शिरलों, आणि सैनिकांनीं पोझिशन्स घ्याव्या त्याप्रमाणें हातांत काडेपेटी, तोंडांत विडी,—याप्रमाणें बंदोबस्त करून काड्या ओढतांच देवळांतील गांधीलमाशा सतावल्या गेल्या, आणि क्षणार्धांत सर्व दारूगोळा टाकून आम्ही देवळाबाहेर पळालों ! युद्धनीति ही अशीच असते. आपण जिवंत राहूं तर राष्ट्र आहे,—म्हणून राष्ट्रासाठीं जिवंत हें राहिलेंच पाहिजे. तोंड सलामत तर विड्या पचास—असा मनाशीं विचार करून विड्या व काड्यांच्या पेट्या श्रीविष्णूला समर्पण करून आम्ही परतलों. अशा रीतीनें प्रयत्न फसल्यानें माझे जोडीदार या कृत्यापासून परावृत्त झाले. नीच लोक विघ्नाच्या भयामुळें प्रारंभ करीत नाहींत. विघ्न आल्यानें प्रारंभ केलेलें कार्य मध्यम जन टाकून देतात. तथापि जे उत्तम जन आहेत ते हातीं घेतलेलें कार्य विघ्नांना न जुमानतां तडीस नेतात. फसलेल्या प्रयत्नामुळें मी जास्तीच इरेला पेटलों. एक वेळ दोघां वडील बंधूंना या पराक्रमी कृत्यांत सामील करून घ्यावें असेंहि वाटलें; तथापि विचार आला कीं भाग घेण्याऐवजीं चहाडी केली तर? शेवटीं एकट्यानेंच हें करावयाचें ठरविलें, व पराक्रमाचें यश अगर अपयश एकट्यानेंच घ्यावयाचें असा निश्चय झाला.

मोठ्या युक्तीनें व आतां सराईत झालेल्या हातानें मामांच्या फडताळांतून पंचांग व लीलावती यांच्या आश्रयास राहिलेल्या पांचपंचवीस विड्यांना हस्तगत केलें. काड्याची पेटी मिळविणें ही एक मामुली गोष्ट होती, अर्थात् ती सहज केली. तथापि स्थळ आणि काळ यांचा निश्चय होईना. उघड्यावर करावें तर विडी पेटणार नाहीं, घरांत बंदिस्त जागा नाहीं. वेळेच्याहि अशाच अडचणी आल्या. शेवटीं मामांच्या घराला—जें घर टेकडीवर आहे, तेथून मळ्याकडे जाण्याचा जिना आहे ती जागा निश्चित केली. तसेंच साधारणतः अकरा साडेअकराची वेळ,– म्हणजे मामा नदीवर स्नानास गेले असतील, आजी व मामी स्वयंपाकघरांत गुंतलेल्या असतील—अशी वेळ काढून D क्षण ठरविला. प्रत्येक गोष्टीची योजना करावयाची, या विद्यमान संवयीचें बीज

त्या वेळेपासून होतें. सदऱ्याच्या आंत विड्या ठेवून व मुठींत काड्यांची पेटी घेऊन, ओसरीवर मामा नाहींत असें पाहून, आडव्या खोलींत दोघे बंधु कांहीं तरी खेळत आहेत हें हेरून, आणि स्वयंपाकघरांत आजी व मामी गुंतल्या आहेत याची दखल घेऊन मोठ्या सावधगिरीनें अस्मादिकांनीं जिन्याच्या दारापर्यंत मजल गांठली. पायऱ्यांवर दृष्टिक्षेप केला. मागें वळून पाहिलें. कोणीहि चिटपांखरूं नाहीं याची खात्री केली, आणि आयुष्यांतील हा महान् प्रयोग करण्याचें ठरविलें. तथापि आसपास कोणी नाहीं याचमुळें मुळांतलें संशयी मन किंचित् भित्रें झालें, व त्याचें प्रतिबिंब काडी ओढणाऱ्या हाताच्या कांपण्यांत झालें. वारा नसतां तीन काड्या विझल्या, व गांधीलमाशा नसतांना मनाला व शरीराला कांहीं तरी चावूं लागलें असा भास झाला. काडी पेटावी पण विडी पेटूं नये, म्हणजे प्रेयसी समोर असून मागणी घालणारें धैर्य लुप्त व्हावें, शेवटीं सनातनी मनानें सिद्धिविनायकाचें स्मरण करून चौथी काडी ओढली, व विडी पेटविली ! क्षणभर पेटल्याचा आनंद झाला, आणि जोरानें आंत झुरका मारला,– तोंच ठसका बसला व अर्धवट भोंवळ, अर्धवट कावराबावरा होऊन मोठ्यानें किंचाळून जिन्याच्या पायरीवर पडलों; आणि अर्धवट जागृतावस्थेंत सुरुवातीस उद्गारलेले आजीचे शब्द व हाताचा मार यानें किंचित् सावध झालों ! भोंवतालीं दोन्ही तिन्ही माम्या, तिरस्कारानें व टिंगलीच्या वृत्तीनें पाहणारे दोघे बंधु , चार पांच अन्य नात्यांतील पोरें पोरी—हा प्रसंग पाहून मेल्याहून मेला झालों. केलेल्या पराक्रमाचें कौतुक तर तेथून गायबच झालें होतें. तिरस्कार, उपहास यांनीं वातावरण भरून गेलें होतें. आजी प्रथम तीक्ष्ण नजरेनें बघत होती, क्षणार्धांत अंतस्थ वात्सल्यानें दृष्टींतील तीव्रता सार्द्र झाली. श्रीमुखांत भडकवणारे हात आतां फुलांचें सुकुमारत्व घेऊन माझ्या तोंडावर फिरूं लागले. क्षणांत म्हातारी विजेप्रमाणें कडाडली, “ मेल्यांनो, बघतां काय, पाणी घेऊन या.” :क्षणांत पाणी आलें. म्हातारीनें मांडीवर घेऊन डोळ्यावर पाणी वगैरे लावलें. तथापि डोळ्यांत ओलच नसल्याकारणानें पश्चात्तापाचें पीक म्हातारीच्या दृष्टीस पडलें नाहीं. इतका बंदोबस्त करून आपण सांपडलों गेलों याचा राग मनांत उसळत होता. मामा करतात, तेंच मीं केलें यांत चूक असणार नाहीं असा आत्मविश्वास होता. तथापि आजीनें जवळ घेतल्यानंतर, ‘ पुन्हा असें करूं नकोस, तूं फार मोठा होणार आहेस असें मामंजी म्हणत असत. वासुदेवाला

हजार वेळां सांगितलें, विडी ओढणें चांगलें नाहीं.' इत्यादि कांहीं रागाच्या, कांहीं उपदेशाच्या, कांहीं आदर्शाच्या, कांहीं आशेच्या शब्दांनीं मजवर परिणाम होऊन मी पुन्हा असें करणार नाहीं असें आजीला सांगितलें.

—आणि गेल्या पन्नास वर्षांत एक दोन प्रसंग सोडून दिले तर आजीला दिलेलें वचन मीं पाळलें आहे. कॉंग्रेस पक्षाचा प्रतोद असतांना मतें मिळवण्याच्या हेतूनें सिगारेटजनित धूम्रमार्ग त्वरित फल देतो असें समजून एकदोन प्रयोग केले, पण धूम्राची माया आंतील मुखरूपी ब्रह्माला कधींच लागूं दिली नाहीं. आजहि पन्नास वर्षांच्या विविध अनुभवांत धूम्रपान न केल्यानें जीवन अपूर्ण अगर असफल राहिलें असें वाटत नाहीं. आणि ही घटना आज सुचण्याचें कारण – आजच पार्लमेंटमध्यें विचारलेल्या प्रश्नाला उत्तर देतांना सांगितलें होतें, हिंदुस्थानांत दरसाल पंधरा हजार कोटि विड्या खपतात ! येवढा धूर व येवढा अल्प प्रकाश क्वचितच अनुभवाला आला असेल !



## ९ : 'पत्रिकेमधीं वाहनयोग सांगतो'

" हें पहा, तुम्हीं हें घोडें व टांगा घराबाहेर काढल्याशिवाय मी येथून हालणार नाहीं व अन्नग्रहण पण करणार नाहीं ! "

आधींच घरीं उशीरां आलों होतों. येण्यापूर्वी जवळजवळ दोन तास मनमोकळेपणानें चर्चा करून, म्हणजे वस्तुतः भांडणें होऊन, कॉंग्रेसच्या सभेचा शेवट धीरगंभीरपणें पाहून आलों होतों. कोणीं कोणाचें ऐकलें तर ती खरी लोकशाही नाहीं, ती बौद्धिक गुलामगिरी आहे, असा आमच्या महाराष्ट्रांतील संकेत आहे. मतभेद दाखविले नाहींत तर आमचें वैशिष्ट्य नाहींसें होतें, ही आमची प्रामाणिक भावना आहे. खाजगी व गुप्त सभेंतील आपलें म्हणणें अगर भाषण प्रथम बातमीदारांना सांगणें ही कार्यकर्त्यांची सर्वमान्य नीति झाली आहे. महाराष्ट्रांतील कुठलीहि विचारविनिमयासाठीं जमलेली सभा, मग ता म. प्रां. कॉं. क. पासून शे. का. फे. पर्यंत कोणत्याहि पक्षाची असो,– त्यांत सूत्रता, सुसंबद्धता, विषयप्रस्तुतता असलीच पाहिजे असें कोणी आवश्यक अगर इष्टहि समजत नाहीं. कोपरखळ्या व मर्माघात याशिवाय भाषण क्वचित् ! तथापि सभेंतील भांडणांना मनमोकळेपणाची चर्चा हें नांव देण्यांत आम्ही व्यवहारज्ञताच दाखवितों. सभेंत कांहीं तरी बोललें नाहीं, अगर कामकाजी ( Point of order ) मुद्दा उपस्थित केला नाहीं, अगर तत्सम कांहीं तरी करून आपली उपस्थिति जाणविली नाहीं तर अस्मितेचा भंग होता, व जगाला वळण लावण्याची संधि गमाविली असें प्रामाणिकपणें आम्हांला वाटतें.–निदान मला तरी वाटतें. तात्पर्य, रसभंगाशिवाय सभा व ताबडतोबी गरजांशिवाय संस्था महाराष्ट्रांत दुर्मिळ असें म्हटलें तर अतिशयोक्ति खास होणार नाहीं.

शहर कॉंग्रेस कमिटीच्या अशाच एका सभेंतून त्रासून मी घरीं आलों होतों. डोक्यांत सभेंत झालेल्या गोष्टींचे विचार चालू होते. जीवनाकडे निष्काम वृत्तीनें, अगर निरपेक्ष वृत्तीनें पाहण्याइतकीं गीतेचीं पारायणें मीं केलीं नव्हतीं, अगर कामधेनुस्वरूप चरखा पण मीं चालविला नव्हता. अनुयायी

सुर्वेट देह टाकला होता, पण नेतृत्वाच्या फुलपांखराचा देह अद्याप आला नव्हता. यामुळें पूर्णतया निगरगट्ट झालों नव्हतों. वाग्बाणांच्या जखमा मनाला जाणवत होत्या. उडाला तर पक्षी, बुडाला तर दगड, आणि तरला तर बेडूक – असें निश्चित व निर्णायक भविष्य करण्याचें महान् तत्त्व अद्याप अवगत झालें नव्हतें. चुकलें तर कमीपणा व खंत वाटे. बरोबर आलें तर इतरांबरोबर श्रेय घ्यावें, हा गंड होता. चुकलें तर दोष अनुयायांचा, व बरोबर आलें तर सर्व श्रेय एकट्याचें, ही आधुनिक नेतृत्वाची श्रद्धा अद्याप जागृत झाली नव्हती. थोडासा मार खाऊन – म्हणजे शाब्दिक मार खाऊन पराभवाच्या हद्दीपर्यंत मी सभेंत पोहोंचलों होतों. तहकुबीच्या मोर्चाचा आश्रय घेऊन मी घरीं आलों होतों. रात्रींचे १० वाजून गेले होते. ‘कुठवर वाट पाहूं ? कांटा दहावर आला’ असें कदाचित् गुणगुणत म्हणणारी व्यक्ति दारांत उभी होती. अथांग मनांत कांहीं कां असेना, मुखावर चिरपरिचित मोहक व मादक हास्य विलसत होतें. त्याचा परिणाम नकळत होऊन संत्रस्त विचाराचीं अभ्रें दूर होत होतीं, व मन उपस्थित घटना पाहण्याकडे कल घेत होतें.

“महाराज केव्हांपासून बसले आहेत !” माझ्या कानावर शब्द आले.

“मी काय करूं ? आमच्या सभा संपतील तेव्हां तर येणार ना !” मीं उत्तर दिलें, व लागलींच चौकांतील भिंतीला लागून असलेल्या दगडी ओट्यावर बसलेल्या व्यक्तीजवळ गेलों.

वयानें साठी उलटलेली, रुबाबानें सरकारी थाटाची, हळू पण ठासून बोलण्यानें करारी वृत्तीची, मध्यम उंचीची ही व्यक्ति महाराष्ट्रांतील एका नामांकित घराण्यांत जन्माला आलेली होती. पुणें जिल्ह्यांतील ३–४ गांवांचे नानामहाराज इनामदार होते. इनामदार या नांवाला साजेल असाच त्यांचा जीवनक्रम होता. देणें व दातृत्व यांनीं त्यांना नागविलें होतें, भूषविलें होतें. मोरयानें कृपा केली म्हणजे सर्व होतें असा त्यांचा संकल्प होता. वडिलांनीं ठेवलेल्या धनाचा कण त्यांनीं भाऊबंदाला दिला नाहीं; त्यासाठीं चार कोर्टें ते भांडले; पण मणांनीं इतरांना देण्यांत त्यांना क्षिति अशी वाटली नाहीं. कोर्टाच्या कामासंबंधांत त्यांचा – माझा परिचय झाला होता. कालान्तरानें परिचय दृढ होत जाऊन ‘महाराज’– कारण मी

त्यांना महाराज म्हणत असें,–घरचे एक वडील मनुष्य असे झाले होते. पुण्यांत ते दुसरीकडे उतरत, व अलीकडे तर त्यांनीं बिऱ्हाड केलें होतें, तरी दररोज सकाळीं आमच्याकडे येत. चहाबरोबर त्यांच्याशीं गप्पा मारण्यांत जुन्या इतिहासाशीं व खानदानी सभ्यतेशीं मी बोलत आहें असें वाटे. जुन्या परंपरेंत व जुन्या अभिमानांत विकास पावलेलें त्यांचें व्यक्तिमत्त्व मजसारख्या पुरोगाम्यालासुद्धां आदरणीय वाटे. त्यांचे व्यवहारी आडाखे, माणसांची त्यांची पारख, प्रसंगांतील मर्म ओळखण्याची हातोटी, वाक्चातुर्य – सर्व कांहीं माझ्या मनावर परिणाम करणारें होतें. जुन्या परंपरेंतील दोष त्यांच्यांत नव्हते असें नाहीं. नर्मदेंतील पावित्र्याबरोबर नर्मदेंतील गोटेहि येतात. तथापि एक पहावयाचें, एक उपेक्षावयाचें, व श्रेष्ठ तेंच घ्यावयाचें – या हंसवृत्तीनेंच मनुष्याची उन्नति होते. चांगलेंच घ्यावें व चांगलेंच द्यावें – पैकीं फारच थोडे दोन्ही करतात, असा जगाचा अनुभव आहे. अनेक मित्रांनीं त्यांच्याविरुद्ध मजला सांगितलें होतें, अनेकांनीं गुपितें म्हणून अनेकांबरोबर मलाहि कथिलीं होतीं. तथापि माझा त्यांच्याबद्दलचा आदर क्षरभरहि कमी झाला नाहीं; त्यांचें मजबद्दलचें प्रेम व आपुलकीहि वाढतच होती. आणि या आपुलकीनेंच प्रेरित अगर प्रक्षोभित होऊन म्हणा, सुरुवातीला लिहिलेले शब्द त्यांच्या तोंडांतून निघाले होते, "काय वाटेल तें करा, आणि हें घोडें व टांगा बाहेर काढा!" महाराज जवळ जातांच पुन्हा निश्चयानें म्हणाले.

त्यांच्या आवाजांतील कळकळ, शब्दांतील आपुलकी, अभिनयांतील निश्चय – या सर्वांचा परिणाम न होणें कठीण होतें.

"देवानें आज संकटच टाळलें म्हणायचें!" दर्शनी हल्ल्याला बाजूनें मदत मिळाली. तथापि एवढ्यानेंच रणांगणांतून पळ काढणारा मी कांहीं आधुनिक सेनापति नव्हतों. पराभव झाला तरी मोठी किंमत वसूल केली, व नैतिक विजय झाला,– या सर्वोदयी तत्त्वज्ञानाचा थोडासा तरी उदय माझ्या विचारसृष्टींत झाला होता. पण त्याबरोबर हीहि गोष्ट खरी कीं, मनाला थोडेंसें खिंडार पडलें व त्याचा परिणाम म्हणजे थोडी शंका, थोडें कुतूहल मनांत सुरू झालें. बोलणाऱ्याच्या वाणीनें अधिकाराचें कवच घेतलें असतें तर खात्रीनें स्वाभिमान जागा झाला असता, हट्ट पेटला असता, स्वमत

सत्यमंत ठरलें असतें. एकाच्या वाणींतील गोडी व एकीच्या दृष्टींतील प्रेम यापुढें मन मऊ झालें, व मी म्हणालों, " मी तसेंहि करीन ! पण मला सांगा तर खरें काय झालें तें ! "

" काय सांगूं, तुमच्या या खंड्यानें चार माणसांचा बळी घेण्याचा प्रसंग आणला होता. मोरयाची कृपा म्हणूनच तें टळलें ! "

मी अधिकच गोंधळलों. तथापि एक बाजू ऐकून घेऊन ताबडतोब न्याय व निकाल करण्याची कला – कधींच न्यायाधीश नसल्यानें मला साध्य झाली नव्हती. कज्जाला दुसरी बाजू असणार या भावनेनें मी वागत असल्यामुळें साहजिकच ' खंड्या 'विरुद्धचे आरोप जसेचे तसे स्वीकारण्यास मी तयार नव्हतों. " महाराज, तुम्ही म्हणतां तरी काय ? सर्व हकीकत तर सांगाल कीं नाहीं ? " मी म्हणालों.

" तें कांहीं नाहीं, महाराज म्हणतात त्याप्रमाणें आत्तांच्या आतां करून टाका ! " गृहमंत्र्याचा हुकूम बाहेर पडला. न मानणें पतिधर्माविरुद्ध होतें ! मानणें अद्यापि न्यायाला धरून वाटत नव्हतें ! मोठाच पेंचप्रसंग निर्माण झाला होता. महाभारतांत नाहीं असें कांहीं जगांत नाहीं, म्हणून क्षणांत महाभारतांतील सर्व घटना डोळ्यापुढें आणल्या,– पण मार्गदर्शन मिळेना. रामचरित्र डोळ्यापुढें आणलें तर स्त्रीचें म्हणणें मानण्यानें भयानक प्रसंगच ओढवतो याची जाणीव तात्काळ झाली. विपरीत व विनाशकालीं पुरुषांची बुद्धि मलिन होते, या सिद्धान्ताच्या जाणीवेनें चिंता जागृत झाली. प्राणिमात्रांना न्याय द्यावा ही शिकवण पूर्व व पश्चिम दोन्हीकडील तत्त्वज्ञानांनीं दिलेली. तथापि मी तत्त्वज्ञानी नसल्यानें ती आचरणांत आणावी हें कर्तव्य वाटत होतें !

खंड्याला घराबाहेर काढावयाचें म्हणजे जीवनांतील एका महान् श्रद्धेला धक्का बसणार होता. तथापि विचार करण्याला वेळ नव्हता. पळून जाऊन टळणार नव्हतें, दृष्टीआड करून अदृश्य होईल अशी ती घटना नव्हती. पंचांनीं दोषी असा अभिप्राय दिल्यानंतर न्यायाधिशानें तो मान्य केल्यानंतर अगदीं निर्ढावलेला वकील त्याहि प्रसंगीं कांहीं तरी काढून अशिलाचें वित्त जरी नसलें तरी त्याचें जीवित वांचविण्याचा प्रयत्न करीत असतो; त्याप्रमाणें वागण्याची बुद्धि व्यवसायवृत्तीमुळें झाली. " ठीक आहे. तथापि मला

हकीकत सांगण्यास तर कांहीं हरकत नाहीं ना?" थोड्या लाघवी आवाजांत मी म्हणालों.

"आज दुपारीं किनई हरीनें टांगा जोडला व ताईला बसवून बुधवार चौकाकडे तो जात होता. नातूंच्या घराजवळ म्युनिसिपालिटीचा रोलर काम करीत होता. त्याला बिचकून घोडा उधळला व भरधांव वेगानें समोरच्या आडव्या रस्त्यावरील प्रेमाच्या दुकानांत जाऊन थडकला. बरें तर बरें, खांबा-मुळें अडला. नाहीं तर प्रेमा व त्याचा बन्सी आज खलास झाले असते. आपल्या लेकीची पण तीच अवस्था झाली असती. कांहीं नाहीं, महाराज म्हणतात तेंच खरें." मला उत्तर मिळालें. कमिटीच्या रोलरला तिचे सभासद बुजतात हें ऐकलें होतें, पण माझा घोडा बुजेल हें शक्य वाटेना! तथापि घटना मुळांत खरी होती असें वाटूं लागलें. तरी पण बुजण्याचीं कांहीं आनुषंगिक कारणें पण असतील असें मनानें घेतलें. मी म्हणालों, "हरी काय म्हणतो?"

"तो चोमडा काय म्हणणार? तुमच्यापुढें कोणीहि तुमच्यासारखें बोलेल. त्याची नोकरी जाईल, तो कसा कबूल होईल?"

"माझ्यासमोर माझ्यासारखें न बोलणारे पण गोड अपवाद आहेत."

"हो हो, आहेतच!" ठसक्यांत उत्तर मिळालें. मायावी अस्त्र वाया गेलें याची खात्री झाली. हरीची साक्ष गैरलागू म्हणून ठरली हें स्पष्ट झालें. पराभवाचा प्रदेश जवळ येऊं लागला. तथापि आशेनें कुणाला सोडलें आहे? मी म्हणालों, "आजच याचा निर्णय केला पाहिजे असें आहे का उद्यां–परवांपर्यंत विचार करून योग्य तें करतों. नाहीं का चालणार?"

"वकीलसाहेब," महाराज मला या नांवानेंच संबोधत. "माझें म्हाताऱ्याचें ऐका, तुमच्या कल्याणासाठीं मीं सांगतों आहें."

सर्वच जणांनीं माझें कल्याण करण्याचा जणूं कांहीं कटच केला होता. टांगा घोडें काढून टाकणें म्हणजे केवढी गोष्ट होती याची जाणीव त्या तरुण स्त्रीला व त्या वृद्ध गृहस्थाला नव्हती. माझ्या जीवनांत त्याचें काय स्थान होतें याची कल्पना त्यांना नव्हती. टांगाघोडें काढणें म्हणजे माझ्या मानमृगाची हत्या होती. अस्मितेचा परिहास होता. ध्येयाची धुंदी उतरणें होतें. कल्पनेला जें सहन झालें नसतें तें करावयाचें होतें. ज्याचा विचार–

सुद्धां मनांत येणें शक्य नव्हतें, त्याची क्रिया – उत्तरक्रिया करणें प्राप्त झालें होतें. भाग्यलेख स्वहस्तानें पुसावयाचा तो प्रसंग होता.

अंतःकरणाचा कब्जा क्षणांत दुःखानें घेतला. मन स्मृतिमग्न झालें. क्षणांत कित्येक वर्षांपूर्वी घडलेली घटना स्मृतीच्या कोशांतून निघून समोर उभी राहिली. 'यांची कुंडली पहा हो' ते बाबुरावांचे शब्द पुन्हा ऐकूं आले. ती कॉलेज-जीवन काढलेली दिडकी माडी, त्यांतील जळमटें, गिलावा पडलेल्या भिंती, कड्या नसलेल्या खिडक्या, लुकलुकी झालेलीं दारें – सर्व कांहीं गुण–दोषसहित वास्तु डोळ्यांसमोर उभी राहिली. त्या वेळचे विचार, त्या वेळची महत्त्वाकांक्षा, त्या वेळच्या आशाच सर्व कांहीं जागृत झाल्या. त्या माडींत मी व बाबुराव, व पलीकडील लहानशा खोलींत आणखी एक विद्यार्थी याप्रमाणें आम्ही रहात होतों. त्या वेळचे विद्यार्थी नवमतवाद जाणत नसल्यानें घरंदाज मालक त्यांना भाड्यानें राहूं देत असत. मोठा घडामोडीचा काळ होता. ना. गोखले मृत्यु पावले होते. टिळकांची स्वराज्याची मोहीम फोफावत होती. घरींदारीं, विद्यालयांत, वर्तमानपत्रांत नाना वाद मांडले जात होते. स्वराज्यासाटीं आवर्तनापासून आतंकवादी गोष्ट करण्यापर्यंत प्रयत्नांचा पल्ला पोहोंचत होता. सर्वत्र वातावरण एका विशिष्ट भावनेनें भरलें होतें. अशा स्थितींत एके रविवारीं वर उल्लेखिलेल्या माडींत आम्ही तिघे विद्यार्थी, एक दोन इतर, व एक ज्योतिषी—असे बसलों होतों. ज्योतिषी नुकताच अध्ययन संपवून 'मठां'तून बाहेर पडलेला होता. कुणीं त्याला आणला हें आठवत नाहीं; पण तो आला व त्यानें आपल्या विद्येनें म्हणा किंवा वागणुकीनें म्हणा बाबुरावांना मोह पाडला. त्यांनीं माझा हात व पत्रिका पाहण्याचा त्याला आग्रह चालविला होता. डोक्याला तांबडा व त्यावर पांढरे ठिपके असलेला सोलापुरी फेटा होता. तोंडावर देवीचे वण, अंगांत शॉर्ट कोट, व वर उपरणें, – साधारणपणें मध्यम आकाराची ही व्यक्ति चेहऱ्यावरून तरी साधारण तलाठी अगर व्ह. फा. अशी कोणी तरी असावी असें वाटत होतें. ज्योतिषावर विश्वास ठेवणारा मी त्याहि वेळीं नव्हतों. पण कोणीं कांहीं सांगितलें तर टिंगल न करतां ऐकण्याची सभ्यता त्याहि वेळीं होती. हजर असलेल्या व्यक्तींचे हात व कुंडल्या त्यानें पाहून संपविल्या होत्या. हें काम चालू असतां मी तेथें होतों. तरी लक्ष हातांतील पुस्तकांत होतें. बाबुरावांच्या मतें मी कोणी तरी मोठा

होणार आहे असें घेतलें होतें; व त्याचें कारण,—वादविवादांत मी तावातावानें बोलें, वाईट अक्षर काढीं, पोषाखांत बावळट दिसें, घाईघाईनें जेवें व चालें;—सामान्यतः हीं सर्व मोठेपणाचीं लक्षणें आहेत असें त्यांचें मत होतें. लक्षणें असूनसुद्धां मोठेपण नसतें हें त्यांनीं अद्याप अनुभविलें नव्हतें. मोराच्या आकृति व अभिनयावरून त्याचा आवाज मधुर असला पाहिजे,—असाच थोडासा हा प्रकार होता. तथापि त्यांची ही भावना जेव्हां ते व्यक्त करीत, तेव्हां कुठें तरी मनाला गुदगुदल्या होत हें मात्र खरें! ज्योतिष्यांनीं माझी कुंडली पहावी याला माझी संमति मिळाली याचें कारण तरी हेंच.

कानडी आवाजांत 'प्रथम आम्ही हात पाहतों' म्हणून माझा हात त्या ज्योतिष्यानें हातांत घेतला. एक एक रेषा पाही, संस्कृत श्लोक म्हणे, द्रव्यरेषा, भाग्यरेषा,—राम जाणे—किती नांवें त्यानें घेतलीं! नंतर शंख, चक्र, माळ इत्यादि गोष्टींची चर्चा करूं लागला. डोक्यांतील चक्र हातांत आलेलें समजून बरें वाटलें. शंख मुठींत आहे या जाणीवेनें जोर चढला. खिशांत नसलें तरी हस्तरेषेंत द्रव्य आहे, संपत्ति आहे, हा शोध बाजारांतून पतीवर वस्तु आणण्यास खास उपयोगी होता. कीर्तिरेषा उत्तम असल्याचें त्यानें सांगितलें. थोडी छाती फुगली. त्या वेळच्या कल्पनेप्रमाणें मी स्वतःला हजारों लोकांच्या सभेंत पगडी घातलेला, उपरणें घेतलेला, मान्यवर पुढारी भाषण करीत आहे,—असा पाहतों आहें असा भास झाला. तात्पर्य, लक्ष्मीधरानें दागिन्यांचीं पेटी उघडी करून मोहमयी वातावरण उत्पन्न केलें, तसेंच थोडेंसें झालें. व्यापाऱ्यानें एका बस्त्यांतील वाण दाखवून कुतूहल उत्पन्न केल्यानंतर दुसरा बस्ता सोडावा, त्याप्रमाणें त्या तरुण ज्योतिष्यानें माझी कुंडली पाहण्यास सुरुवात केली. आमच्या बाबुरावांना ज्योतिषाचा नाद होता; व कुणाला ठाऊक,—कुठून तरी—कदाचित् माझ्या मामाकडून त्यांनीं माझी कुंडली किंवा तत्सम कांहीं तरी मिळविलें होतें. नाना तऱ्हेच्या बेरजा व गुणाकार–भागाकार कागदावर तो करीत होता. आंकडे मांडी, पंचांग पाही,—पंचांगांचें बाडच त्याच्याजवळ होतें. जणूं कांहीं अतीत, विद्यमान व भविष्य पंचांगांच्या मिषानें त्यानें आपल्या कब्जांत ठेवले आहेत असें वाटत होतें. हा काळपुरुष जणूं कांहीं प्रत्यक्ष दिसत आहे इतक्या खात्रीनें गोष्टी सांगत होता. केलेल्या, न केलेल्या, झालेल्या, न

झालेल्या गोष्टींची साक्ष तो देत आहे, व आम्ही सर्व आश्चर्यवत् त्याच्याकडे पहात आहों – असा तो प्रसंग होता. शनि, मंगळ, बुध, गुरु इत्यादि ग्रहांनीं जीवनाशीं कसा मोर्चा बांधला आहे, शुक्र कसा बलवान् आहे, पापग्रह कसे बलवान् अगर बलहीन आहेत यांचें पुराण तो सारखा सांगत होता. स्थानपरत्वें विचार करून शत्रु–मित्र यांच्या फौजफाट्यांची त्यानें कल्पना दिली. एकंदरींत हरभऱ्याच्या झाडावर क्षणांत मीं माचण बांधलें, व भविष्यांतील शत्रूंवर कल्पनेनें नेम पण धरला. मोठेपणाचें लक्षण म्हणून 'या पत्रिकेमध्यें मोठा वाहनयोग सांगतो—' त्याची अर्थमधुर पण श्रुतिकर्कश कर्नाटकी वाणी बोलता झाला. सुखाच्या संवेदना दिलाच्या दिलरुब्यावर गुणगुणूं लागल्या. सायकलीपासून मोटरींपर्यंत नाना वाहनें मनोरथांच्या वेगानें कल्पनापथावर धांवूं लागलीं ! 'अरेरे–'मूल सांपडलें वाटतें गाडीखालीं' असा कोणी तरी ओरडल्याचा भास झाला, व मी प्रत्यक्ष सृष्टींत आलों. समोंवारची मंडळी व त्या वास्तूचें स्वरूप स्पष्ट झालें, आणि आहे व व्हायचें यांतील अंतर व भेद सहज मनाला चाटून गेला.

थोड्याच वेळांत सर्व मंडळी गेली. ज्योतिष्याची संभावना होऊन तोहि ग्रह मार्गी झाला. कैक वर्षें लोटलीं. लेखाचा चरित्रनायक वकिलीच्या धंद्याच्या प्रवेशद्वाराशीं उभा असलेला प्रसंग आठवला. धंद्यांत आतां राम राहिला नाहीं. 'ते पूर्वींचे दिवस' गेले म्हणून सर्व सांगत होते. आमच्या कुळांत मीच पहिला वकील – म्हणून वडील मंडळींना थोडा अभिमान वाटत होता. वडील व चुलत्यांनीं श्रीमंतींत जन्म घेऊन जवळ जवळ गुप्त दारिद्र्यांत बालपण काढून सरासरी म्हातारपणापर्यंत सांवरून कुळाला निष्कर्जी केलें होतें. मालकीच्या वाड्यांतून भाड्याच्या घरापर्यंत आलेली अवस्था कायम होती. सरदारींतील गाड्याघोडीं कधींच नाहींशीं झालीं होतीं. सायकलपर्यंत मजल आली होती. धंद्याच्या सुरुवातीस वडील चुलते हेच एक मागील वैभव व विद्यमान विवंचना सांगणारे शिल्लक राहिले होते. 'मी आपल्या वास्तूंत जन्मलों, तेव्हां स्वतःच्या वास्तूंत मरावें,––व एक दिवस तरी घरच्या गाडींतून देवाला जाऊन यावें ही माझी इच्छा तूं पुरव !' म्हाताऱ्या डोळ्यांत पाणी आणून पहिल्या दिवशीं कोर्टांत जाण्यापूर्वी आशीर्वाद देतांना शब्द काढले होते. तें सर्व दृश्य पुन्हा सजीव व साकार झालें. कांहीं काळ लोटला. "हें पहा, कांहीं कर,–पण एवढी गरज भागव.

मी फुकट मागत नाहीं, उसनें मागत नाहीं, माझा टांगा–घोडा दाराशीं उभा आहे तो तूं घे. माझ्यावरील प्रसंग बिकट आहे; हें काम माझ्यासाठीं तूं केलेंच पाहिजे." बोलणारी व्यक्ति आर्जवून पण निश्चयानें बोलत होती. आवाजांतील कळकळ, माझ्यावरील विश्वास तिच्या वागण्यांत व अभिनयांत स्पष्ट दिसत होता. टांगा–घोडा जीवनांत प्रवेश होण्याचें हें दृश्य व तो जीवनांत निर्गत होण्याचें दृश्य,—मौलिक दृष्टया हें असें सुसंबद्ध होतें !

संक्रान्तीची ती रात्र होती. तिळगुळाची किमया जुन्या मैत्रींना दृढ करून उपस्थित वैरांना प्रेमाचें सोनें करण्यासाठींच हिंदु संस्कृतींत आणली असली पाहिजे. पैसे मागण्यास आलेली व्यक्ति मित्र होती. श्रीमान् कुलांत जन्म घेऊन आपल्या वागण्यानें श्रीमंतीला तिनें दूर सारलें होतें. शिक्षणांत जमेना म्हणून शेतींत ती शिरली होती. पण नांगराऐवजीं टेनिसची बॅट घेऊन शेताऐवजीं क्लबांत बसून तिचा व्यवहार चालत असे. शेतींत सावकार शिरले. दाण्याऐवजीं कर्जरोखे पिकले. अशाच एका अडचणींतून तरून जाण्यासाठीं ही स्वारी फार दिवसांनीं जुनी मैत्री आठवून आली होती. बरोबर आणखी एक मित्र होते. माझें स्वतःचें घर त्या वेळीं झालें होतें, पण वाहन ठेवावें अशी स्थिति नव्हती. तथापि, संक्रान्तीचा दिवस, मित्र-कार्य, काकांची इच्छा, व त्याच क्षेत्रांत ज्योतिष्याची भविष्यवाणीहि आठवली,—व त्याचा परिणाम होऊन मागितलेली रक्कम त्याला देऊन टांगा–घोडा न पाहतां घेतले. जवळच एका नातलगाच्या मोकळया जागेंत रात्रीं गड्यानें त्यांची व्यवस्था केली.

सकाळीं सौ. बरोबर जाऊन ही चीज पाहिली. भयंकर उंच व्हेलर जातीचा तो घोडा, त्याच्या गळयाला भोंक, त्याभोंवतीं घोंघावणाऱ्या माशा, धावांचें तुटलेलें रबर, विस्कळित झालेला टप पाहिला. तथापि बाहेर कांहीं न दाखवितांताबडतोब टांगेवाल्याला गवताचा रतीब, नालबंदी, सर्व दुरुस्तीची आज्ञा देऊन चुलत्यांना बातमी सांगण्यास गेलों. त्यांना प्रसन्नता वाटली. टांग्यांत बसून ते देवालाहि जाऊन आले. मोठ्या प्रतिष्ठेनें टांग्यांतून हिंडूं लागलों. खंड्याचा खुराक गामाची बरोबरी करूं लागला. आतमित्र टांग्याची प्रशंसा करीत, तर कांहीं महाभाग त्या घोड्याकडे पाहून मालकाची टयाळी करीत, तेंहि ऐकलें. घोडा मुजरा आहे अशी कुजबुजहि कानावर

येत होती. तथापि सामाजिक प्रतिष्ठा व एक नाजुक मनोभावना यामुळें खर्च अगर खोडी यांना न जुमानतां हिंदुस्थान सरकारच्या कचेरीप्रमाणें 'सब ठीक'च्या लहरींत व्यवहार चालला होता. आणि अशा ह्या सुखमय स्वप्नमय सृष्टीचा अंत करण्याची योजना नानामहाराज मला आतां सुचवीत होते !

आम्ही समोरासमोर उभे होतों, व बाजूला निर्दय निश्चयानें जणूं भाग्य-देवता होती. सर्व आठवणी पुन्हा पुन्हा वन्समोअर न म्हणतां मनःचक्षू-पुढून जात होत्या. भावना व व्यवहार दोन्ही ठासून 'नाहीं' म्हणून सांगण्यास उत्तेजन देत होतीं. समोरील व्यक्ति निःस्वार्थी व बाजूची प्रेमळ—यामुळें ना म्हणणें सोपें नव्हतें. तथापि मनांत हजेरी देऊन गेलेल्या आठवणी सांगून कदाचित् महाराज मत बदलतील अशी आशा वाटून, व महा-राजांचा विश्वास ज्योतिषावर आहे ही गोष्ट माहीत असल्यानें ती आठवण अगदीं रामबाण ठरेल या आशेनें,—नव्हे खात्रीनें मीं सांगितली. "होय, तुमच्या पत्रिकेंत वाहनयोग आहे. क्षणभर मान्य, पण या खंड्याच्या पत्रिकेंत काय आहे,—माहीत आहे का तुम्हांला ?" महाराजांनीं उलट प्रश्न केला. 'घोड्याची पत्रिका' याचा बोध होईना. मी म्हणालों, "महाराज, मला बोध होत नाहीं."

"मला संध्याकाळीं बातमी कळतांच मीं खंड्याला पाहिलें." महाराज म्हणाले, "त्याचे डोळे पाहिले. रंग न्याहाळला. भोरे पाहिले, नखें पाहिलीं.—मी तुम्हांला सांगतों, हा प्राणी ज्याच्याजवळ असेल त्याचा प्राणघात केल्या-शिवाय राहणार नाहीं ! ! तुम्ही माझं ऐका—"

महाराज चांगले अश्वपरीक्षक होते हें मला माहीत होतें. "एखादी पेन्सिलसुद्धां चालवून पाहून तुम्ही घेतां, आणि हा हजार रुपयांचा बारदाना न पाहतां घेतलात;—काय म्हणावें तुम्हांला ?"

"नशिबावर हवाला ठेवून केलेल्या गोष्टी चांगल्या निघाल्या, महाराज—" मी बाजूकडील व्यक्तीकडे पाहून म्हणालों. कळी खुलली. पण पाहिजे तो कौल मिळाला नाहीं.

"या गोष्टीचा निकाल केल्याशिवाय जेवायचें नाहीं गडे—" अखेरचा बाण यशस्वी झाला. शेवटच्या शब्दानें मनाचा गड पार कोसळून

गेला. मन म्हणजे सपीठाच्या पिठाचा गोळा,—कीं ज्याला गृहिणीनें कांहींहि आकार द्यावा.

"ठीक आहे महाराज, तुम्ही सांगतां त्याप्रमाणं होईल." असें अखेरीस उत्तर दिलें. महाराज कृतकृत्य होऊन गेले. जेवतांना रुचिपूर्ण पदार्थ शून्य मनानें खाल्ले. दुसऱ्या दिवशीं खंड्याला शेजारच्या गिरणीवाल्याला 'टांग्याला चालवून बघ, पटलें तर बघूं—' म्हणून बिदा केलें. त्यानें संध्याकाळीं त्याला टांग्याला जोडून लष्करांत नेलें. घोड्याच्या गळ्याला भोंक—म्हणून इतर जनावरांना उपसर्ग पोंचेल म्हणून सार्जंटनें गोळी घालून मारून टाकलें, व मला बातमी दिली. टांगा ज्याला विकला त्यानें निम्मे पैसे दिले. बाकीचे अद्याप दिले नाहींत. खंड्या गेला. त्याच्या पत्रिकेंतील भविष्य खरें झालें नाहीं. मात्र माझ्या पत्रिकेंतील भविष्य कांहीं महिने तरी खरें करून तो गेला. आणि जेव्हां जेव्हां कोणी मालकीच्या टांग्यांतून जातांना मी पाहतों, तेव्हां तेव्हां ज्योतिष्याचे 'पत्रिकेमधीं वाहनयोग सांगतो' हे शब्द आठवतात; व आज परिस्थिति अनुकूल असून खंड्याचें जें झालें त्या भीतीनें कांहीं करावें असें वाटत नाहीं!

• • •

## १० : “माझा तुला आशीर्वाद आहे”

“वकीलसाहेब, दार उघडा – दार उघडा—” या शब्दांबरोबर पुढील दरवाजाच्या दिंडीवर कोणी तरी थाप मारीत आहे असा भास झाला. सन १९२९ सालची ही गोष्ट आहे. ऑक्टोबर महिन्याची कांहीं तरी बारा तेरा तारीख असावी ! उजाडणारा दिवस सीमोल्लंघनाचा – विजयादशमीचा होता. पहांटेची ४॥ – ५ ची वेळ होती. रस्त्यावरील खोलींत मी निजलों असून अर्धवट गुंगींत होतों. आधल्या रात्रीं १॥–१॥। वाजेपर्यंत जागा होतों. जो पराक्रम दुसऱ्या दिवशीं करावयाचा होता त्याच्या योजना व मनसुबे करण्यांत मध्यरात्र उलटून गेली होती. जें करावयाचें होतें तें कांहीं सामान्य असें नव्हतें,—पण मजसारख्या सामान्य माणसाच्या अंगावर तें येऊन पडलें होतें. होणारें युगप्रवर्तक ठरणार होतें; – पण तें करणारा क्षणिक महत्त्वाचासुद्धां नव्हता. सर्वसामान्यपणें समाजाला धरून चालणारावर समाजाची महान् व प्राचीन परंपरा मोडण्याची कामगिरी येऊन पडली होती. ज्यानें कधींहि धार्मिक बाबतींत लक्ष घातलें नव्हतें, त्यावर धार्मिक क्षेत्रांत एका दृष्टीनें लुडबुड करण्याची पाळी आली होती. सनातन प्रवृत्तीला सुधारक होणें विविध घटनांमुळें प्राप्त झालें होतें. दुसऱ्या दिवशीं पर्वतीमंदिराच्या प्रवेशासाठीं हरिजनांचा सत्याग्रह होणार होता, व कांहीं अकल्पित घटनेमुळें त्या सत्याग्रहाचें नेतृत्व मजकडे आलें होतें.

ही गोष्ट होण्यापूर्वी महाराष्ट्रांत अस्पृश्योद्धाराची चळवळ चालू होती, व मंदिरप्रवेशाचा प्रश्न हातघाईला आला होता. वास्तविक ह्या बाबतींतील माझीं मतें स्पष्ट होतीं. कांहीं महिन्यांपूर्वी महाड येथें हरिजनांनीं सत्याग्रह करून प्रतिबंधित तळ्यांतील पाण्याचें प्राशन केलें होतें. त्या सत्याग्रहाच्या कामीं त्यांच्यावर हल्ले झाले होते. ह्या घटनेमुळें पुण्यामध्येंहि व महाराष्ट्रभर खळबळ उडाली होती. पुण्यांतील एक नामांकित अध्यापक – जे अस्पृश्योद्धाराच्या कामीं लिहून व बोलून सहानुभूति दाखवीत, त्यांनीं आम्हां दोघां-तिघांना चर्चेसाठीं बोलाविलें होतें. चर्चेच्या वेळीं पुण्यांतील मंडळींनीं

याबाबत काय करावें म्हणून प्रश्न उपस्थित झाला. कोणी कांहीं – कोणी कांहीं सूचना करीत होते. मी म्हणालों, "ह्या गोष्टींत माझा सल्ला असा आहे कीं, आपण शिवाजी मंदिरांत अस्पृश्यांसह सर्व लोकांची सभा बोलावूं; व त्या ठिकाणीं अस्पृश्य पाण्याची घागर भरून आणतील, तेव्हां त्यांच्या हातून आपण पाणी पिऊं व सभा तहकूब करूं; आणि दुसऱ्या दिवशीं ती पुन्हा भरवून 'ह्या पाणी पिण्यानें आम्हांस कांहीं झालें नाहीं, आम्ही जिवंत आहोंत' असें दाखवून देऊन सभेंत त्या दृष्टीनें काम चालवूं!" यावर त्या अध्यापकांनीं सांगितलें कीं, "ही गोष्ट समाज सहन करणार नाहीं. समाजाच्या भावना दुखविल्या जातील, व समाजांतील गुण्यागोविंदाची स्थिति नष्ट होईल. आपण एक छानसा ठराव करून ज्या लोकांनीं हल्ला केला त्यांचा निषेध करूं." मी म्हणालों, "ह्यांत कांहीं अर्थ नाहीं; कांहीं करायचें असल्यास कृति करूं या." प्राध्यापकांना तें पटलें नाहीं, व बैठक तेथेंच संपली.

पण ह्या खाजगी बैठकींतील बातमी हळू हळू सर्वत्र पसरली, आणि जेव्हां मंदिरप्रवेशाचा प्रश्न बेताबेतानें घेणाऱ्या समाजसुधारकांनीं हातीं घेण्याचें ठरविलें, व जेव्हां त्यांची ही वृत्ति तडफदार समाजसुधारकांना पटेना,—त्या वेळीं अस्मादिकांना विनाकारण भाव येऊं लागला. हृदयपरिवर्तनवादी तत्काळ फल देणारी भूमि कुठें आहे, ह्या दृष्टीनें पुण्यांतील निरनिराळ्या मंदिरांकडे पाहूं लागले. ह्या त्यांच्या पाहणींत खाजगी, अर्धवट खाजगी, सार्वजनिक देवालयेंहि आलीं होतीं आणि त्यांच्याच जोडीला हरिजनांसाठीं आपण कांहीं तरी करीत आहों असें मनापासून वाटणारे, तसेंच राजकारणदृष्ट्या लोकांना तसें वाटावें असें मानणारेहि होते. तात्पर्य, ह्या मंदिरप्रवेशाबाबत नैतिक, धार्मिक, व राजकीय – ह्या सर्व दृष्टींनीं पाहणारे कार्यकर्ते व लुडबुडे ज्या घटनेसंबंधीं मी लिहीत आहें त्याच्या आधीं पुण्यामध्यें तीन चार महिने गोंधळ घालीत होते. सभा व बैठकी चालूच होत्या. विचारविनिमय व निवेदनें ह्यांची सांथ उमटली होती. खुद्द हरिजनांत सुरुवातीस ह्या बाबतींत विशेष औत्सुक्य असें दिसून येत नव्हतें. परंतु कोणत्याहि प्रश्नाला महत्त्व येऊं लागलें म्हणजे महत्त्वाकांक्षी मनें त्यांत रस घेतात, आदर्शवादी तरुण विशेष विचार न करतां उडी घेण्यास सज्ज होतात, तर कांहीं धूर्त प्रत्यक्ष कांहीं न करतां श्रेय कसें उपटतां येईल हेंहि बघतात. कांहीं व्यवहारज्ञ,—'जर

यशस्वी झालें तर मी त्यांत होतोंच, एवढें दाखविण्यापुरता भाग घेतात. अयशस्वी झाल्यास, आपण हें असें होणार असें बजावलें होतें म्हणून सांगतां यावें ह्या दृष्टीनें कोठें तरी शल्य–नीतीचा प्रयोग करून ठेवून दुतर्फी राजकारण साधतात ! वास्तविक हें सर्व शहरांत चालू असतांना मीं त्याकडे लक्षहि दिलें नव्हतें, व लक्ष द्यावें असें वाटलेंहि नाहीं. कारण त्या वेळच्या पुणेरी राजकारणाचा अनुभव मला पूर्णपणें होता. बोलण्याची सरहद्द ओलांडून कृतीच्या प्रान्तांत शिरावें हें त्या वेळीं वावडें होतें; किंबहुना, असें कोणी करील तर तो बिनडोक्याचा समजला जात असे ! म्हणून मी मनाशीं धरून चाललों होतों, कीं कांहीं वेळ आवाज निघेल, गर्जेल, चमकेल, वर्तमान पत्राच्या आकाशांत किंचित् काळ चमकून हे सर्व तारे अस्तंगत होतील. परंतु हे सर्व अंदाज एका क्षुल्लक घटनेनें खोटे ठरविले !

पुणें नगरपालिकेच्या सभेचा दिवस होता. संध्याकाळची वेळ होती. पांच दहा मिनिटें सभेला अवकाश होता. पुण्यांतील नागरिकांचें महद्भाग्य म्हणून अस्मादिक सभासद होते. त्या महान् पुरुषांच्या मालिकेंत मजबरोबर आज विशेष प्रसिद्धि पावलेले एक हरिजन सद्गृहस्थ होते. त्या वेळीं ते प्रसिद्ध असलेल्या राष्ट्रीय पक्षाचे सभासद होते. तेहि सभेला आले होते; व सभेला अवकाश असल्यामुळें बाहेरच्या व्हरांड्यांत मला पाहतांच मजजवळ आले व म्हणाले, " आज अस्पृश्योद्धार मंडळानें पर्वती मंदिराच्या ट्रस्टींना अस्पृश्यांना मंदिर खुलें करा अशी नोटीस दिली आहे. आम्हीं अस्पृश्यांनीं असें ठरविलें आहे कीं सत्याग्रह करायचा. तुम्ही आम्हांस मदत करणार, का ×× साहेबांप्रमाणें धोका देणार ! नुसती वटवट आजपर्यंत आम्हीं ऐकली. तुम्ही वरच्या वर्गांतील लोक आम्हांला बनवूं पाहतां......" आणखी असे पुष्कळ शब्द त्यानें उच्चारले,—कीं ज्यांत माझ्याशीं मतविरोध असलेल्यांची निंदा होती, नालस्ती होती. मी म्हणालों, ' तुमचें काय चाललें आहे, मला कांहीं विशेष माहीत नाहीं. मंदिर-प्रवेश तुम्हाला असावा असें माझें मत आहे. मजसमोर तुम्ही लोकांची निंदा कां करतां ? मी काय करणार एवढें विचारलेंत हें योग्य आहे." हे शब्द जरी मी शान्ततेनें उच्चारीत होतों तरी माझ्या मनांत संताप उत्पन्न झाला होता, व ज्यांच्याबद्दल त्यांनीं निंदा केली होती त्यांचे कितीहि दोष असले तरी—कोणी उठावें, कोणाचाहि अनादर करावा,—हें मला पसंत नव्हतें. माझा संताप अर्थात् मी व्यक्त

करणें शक्य नव्हतें. अंगचा व अभ्यासानें कमावलेला संयम मी राखूं शकलों, तथापि वाणींतून निघालेली भाषा चिडलेलें मन बोलत आहे असें खास दर्शवीत होती.

मी म्हणालों, 'ऐक मी काय करीन तें—' असें म्हणून उजव्या हातानें त्याचा डावा हात घट्ट धरला आणि म्हणालों, 'असा तुझा हात धरून तूं आणि मी शान्ततेनें पर्वतीच्या मंदिरांत प्रवेश करूं. ह्या कामीं विरोधकांची पहिली काठी अगर गोळी मी घेईन, व जो हात सोडील तो ××× ' असें म्हणून मीं गंभीरपणें त्याजकडे पाहिलें व सांगितलें कीं, 'दिवस निश्चित झाला म्हणजे मला सांग.' ज्या झटक्यानें मीं त्याचा हात पकडला, ज्या निश्चयानें माझे शब्द भरले होते, ज्या भाषेंत मी ते बोललों होतों, ज्या गांभीर्यानें मीं माझ्या प्रतिज्ञेच्या उच्चाराचा शेवट केला, त्या सर्व गोष्टींचा असा परिणाम झाला कीं हा आमचा हरिजन पुढारी क्षणभर स्तिमित झाला, – गांगरला, – व सभागृहांत गेला ! तथापि दुसऱ्या दिवशीं वर्तमानपत्रांत मला काय वाचावयास मिळेल ह्याची कल्पना नव्हती. त्या वेळेपासून ह्या पुढाऱ्याला प्रसिद्धि घेण्याची व देण्याची लकब साधली होती. दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून स्थानिक दैनिक पाहिलें तर त्यांत 'श्री. गाडगीळ हे पर्वती सत्याग्रहांत पुढाकार घेणार–' असा मजकूर आला होता. त्या वेळेपर्यंत अस्मादिकांचें काकासाहेब हें नामाभिधान 'घराबाहेर' पडलें नव्हतें.

वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालेला मजकूर खरा कीं खोटा हा पहावयाचा नसतो. तो श्रद्धापूर्वक खरा मानावयाचा, व त्याप्रमाणें कोणाची निंदा अगर स्तुति करावयाची हें ठरवावयाचें, असा वागणारा फार मोठा वर्ग आहे. सर्वसामान्य जन असे वागतात हें कांहींच नाहीं, पण जनमनाला व जनमताला शिक्षण देण्याचा आपला अधिकार आहे असें मानणारेसुद्धां बहुशा असेच वागत असतात ! प्रसिद्ध झालेल्या बातमींत सत्य किती, प्रचार किती, महत्त्वाचें किती, व मुलाम्याचें किती याचा विवेक करणारे अत्यल्प असतात. परंतु लोक-गलबल्याच्या नगाऱ्यापुढें ह्या टिमकीचा आवाज ऐकूंसुद्धां येत नाहीं. प्रसिद्धीनें अन्यायित झालेल्यानें खुलासा केल्यास कांहीं विशेष घडून येतें असेंहि क्वचित् ! खुलाशानें विरोधकाचें समाधान होणें

अशक्य, व मित्रासाठीं तो अनवश्यक असतो. राजकारणांत – वैद्य जसें विष विषानें मारतात तसें – असत्य असत्यानें मारावयाचें असतें. एक थाप दुसरी थाप देऊन निरर्थक ठरवावयाची असते. एक वचन दुसरें वचन देऊन स्मृतिशेष करावयाचें असतें. अगर दुसरा मार्ग म्हटला म्हणजे भवभूतीप्रमाणें 'काळ अनंत आहे, पृथ्वी विपुल आहे –' असें समजून 'सत्यमेव जयते' अशी श्रद्धा मनाशीं घेऊन, त्या जयाची आशा करीत अपकीर्ति व अपयश ह्या दोन तटांतून वाहणाऱ्या निराशामय जीवन-गंगेच्या प्रवाहांत वाहात जावें लागतें. ह्या दोन्ही गोष्टी सर्वसामान्य जनांना साधत नाहींत, म्हणून दोहोंचाहि अर्धवट स्वीकार करणारे दोन्हींतील वाईट तेवढेंच पदरीं घेत असतात. आणि माझें थोडेंसें तसेंच झालें;– अनेकजण विचारावयास आले, व अनेकांना ही बातमी खरी नाहीं असें सांगूनहि पाहिलें; पण खरें काय हें सांगण्याचें धैर्य झालें नाहीं, आणि शेवटीं सुरुवातीला सांगितल्याप्रमाणें झालेल्या घटनेच्या दारापर्यंत येऊन पोहोंचलों.

सनातनी लोकांनीं हिंदु धर्माचा नाश करणारा पुण्यांत उत्पन्न व्हावा म्हणून दुःख केलें. पत्रिका काढून असल्या 'आततायी' ह्याचा 'वध करावा' असें सुचविलें. जे अहिंसक होते, अगर ज्यांना अन्य कांहीं करणें शक्य नव्हतें, त्यांनीं विविधस्वरूप निंदेची कास धरली. कोणी म्हणाले, "वकिली बसली, तेव्हां धंदा वाढावा ह्या दृष्टीनें हा उद्योग सुरू केलेला दिसतो." कोणी 'अस्पृश्य मेंबर' यांना बगलेंत मारून कमिटीचा अध्यक्षपदाचा मुकुट चढविण्याच्या महत्त्वाकांक्षेचा आरोप केला. कांहींनीं हा धूर्त इंग्रजाच्या आहारीं जाऊन देशामध्यें दुही माजविण्याचें जयचंदी काम करीत आहे असेंहि म्हणण्यास कमी केलें नाहीं. इष्टमित्र, सगेसोयरे याचा, त्याचप्रमाणें नगरभर व प्रान्तभर अस्मादिक चर्चेचा विषय होऊन बसले. कोणाला ठाऊक पत्रिकेंत कोणता ग्रह आला – कीं ज्यायोगें मीं केलेली गोष्ट लोकचर्चेचा विषय व्हावा, व निंदकांनीं निंदा करून समाधान मानण्याची संधि साधावी. निंदकाचें घर असावें शेजारीं हें ठीक आहे; पण सर्वच शेजार तसा होऊं लागला तर कठीण होईल. आणि म्हणूनच कीं काय – ज्या देवतेनें माझ्या नशिबाची कुंडली मांडली तिनेंच माझ्या नशिबीं अकारण मैत्रीचे शुभ ग्रहहि टाकले आहेत असें दिसतें. अनपेक्षित-पणें मला उत्तेजन देणारीं व अंगांत नसलेले सद्गुण बहाल करणारीं पत्रें

येऊं लागलीं. प्रागतिक पत्रें मला युगप्रवर्तक म्हणूं लागलीं, तर कॉलेजांतील तरुण मुलें मजकडे येऊन आम्ही तुमच्याबरोबर सत्याग्रहास तयार आहोंत असें म्हणूं लागलीं. युवकसंघानें तर ठराव करून सत्याग्रहाचा कार्यक्रम कायम केला. त्या वेळचे नानू गोरे, मध्यंतरींचे नानासाहेब, व हल्लींचे भाई यांनीं ज्ञानप्रकाशांत सुंदर लेख लिहून सत्याग्रहाची नैतिक भूमिका किती उदात्त आहे ह्याचें सुंदर विवेचन केलें. एस्. एम्. हा दिवसरात्र माझा शरीर-रक्षक बनला होता. केशवराव जेधे यांनीं सल्लामसलतींत कायम हजर राहून आघाडीवर राहण्याचें कार्य पत्करलें होतें. पुण्यांतील कार्यपद्धतीप्रमाणें लागलींच एक साहाय्यक मंडळ स्थापन झालें. त्यांत नाना मतांचे लोक आले, व माझ्या स्तुतीचें निमित्त करून अनेक सन्मान्यांबाबत निंदेचा वाग्यज्ञ करून स्वतःला तोषवून घेतलें. सत्याग्रहाच्या कार्याला मीच सेनानी योग्य असें ठरवून गैरहजेरींत मला त्यांनीं अध्यक्षहि बनविलें. तात्पर्य, ह्या राउताला त्याची घोड्यावर बसण्याची इच्छा आहे कीं नाहीं ह्याचा विचारहि न करतां घोड्यापासून मंदीलापर्यंत सारखी तयारी करण्यांत आली ! ! !

जसा मी अधिक विचार करीं, तसतसें मन कृतीच्या चिखलांत अधिक रुतूं लागलें. राऊत कांहीं रडका नव्हता, किंवा मनहि कांहीं कृतिविन्मुख होतें असेंहि नाहीं. पण पूजावें एकासाठीं व प्रसाद दुसरा मिळावा,—असें होत होतें; व स्वाभिमानी मनाला तें खपत नव्हतें. तथापि मनुष्य कितीहि चांगला शिल्पकार असला, व त्यानें मनांत कशीहि योजना आणली, तरी कोणी तरी निराळाच धाता यथापूर्व कल्पनेप्रमाणें येणारें भविष्य साकार करीत असतो. सीमोल्लंघनाचा दिवस क्षणाक्षणानें जवळ येत होता, व कसें झालें कोणास ठाऊक,—कणाकणानें कृति आकार घेत होती. धमका-वणीच्या पत्रांनीं कपाट भरलें, पण मनावर त्याचा कांहीं परिणाम झाला नाहीं. उत्तेजनांनीं व अभिनंदनांनीं टेबलभर पसारा केला; पण मनांतील जागा त्यानें किंचित्मात्र व्यापली असेल. मधून मधून देवाला मी आठवतों, व कुळधर्म म्हणून प्रसंगाप्रसंगानें श्रीओंकारेश्वराचें दर्शनहि घेतों. हेंहि करीत होतों, आणि सीमोल्लंघनाच्या दिवशीं कुठल्या समिचें उल्लंघन व्हावयाचें ह्याची कल्पना अहर्निश मनाशीं करीत होतों. जिल्हाधिकाऱ्यास मंदिराच्या ट्रस्टींनीं कांहीं तरी भयंकर होणार म्हणून सांगितलें. त्या महाभागानें अस्मा-

दिकांना बोलाविलें, व मजकडून काय होणार, कसें होणार ह्याची स्थूल मानानें कल्पना करून घेतली. हत्यारी पोलिसांचा बंदोबस्त आपण ठेवणार आहों, कायद्याची प्रतिष्ठा राखणें भाग आहे, असें निश्चयानें पण सभ्य शब्दांत त्यानें सांगितलें. मींहि त्यांना बजावलें कीं, 'अहिंसा हें आमचें साधन असून सामाजिक न्याय मिळविण्याचा आमचा उद्देश आहे. ह्या कामीं जे परिणाम होतील तें भोगण्यास आम्ही तयार आहोंत. तथापि मी अस्पृश्य नाहीं; व मंदिर जर सार्वजानिक आहे, तर मला कायद्यानें कसा कोणाला प्रतिबंध करतां येईल?' त्यानें उत्तर दिलें, 'तें मला कांहीं माहीत नाहीं. मी बंदोबस्त कडक ठेवीन ह्यापलीकडे मी कांहीं जाणत नाहीं.'

दसऱ्याच्या आदल्या दिवशीं व मध्यरात्रींपर्यंत कोणी ना कोणी येत होतें. विरुद्ध पक्षाच्या तयारीच्या बातम्या देत होतें. कोणी हितोपदेश करीत होतें. कोणी ब्राह्मण 'बिघडला' म्हणून दुःख करीत होतें. रात्रीं दहाच्या सुमारास आमच्या कार्यकारिणीनें दुसऱ्या दिवसाचा प्रोग्रॅम निश्चित केला. ध्येयवादी व दिलदार युवक उत्साहानें घरीं गेले. शिपाई बाण्याचे केशवराव काय करावयाचें हें समजून घेऊन विश्रान्तीसाठीं परतले. जसा कांहींनीं 'खाली' ह्या कामापासून परावृत्त करण्याचा सल्ला दिला, तसाच इतर कांहींनीं "वैनी, आम्ही सर्व बरोबर आहोंत, कांहीं काळजी करूं नका' अशी भ्रातृत्वाला शोभेल अशी ग्वाही दिली;—आणि आतां विश्रान्ति घ्यावी म्हणून खालीं दरवाजा लावण्यास आलों, तों पुण्यांतील एक कुलवंत, विद्यावंत पण व्यसनानें कर्तृत्वहीन झालेले मध्यम वयाचे गृहस्थ एकदम दिंडींतून आंत शिरले, आणि माझा हात धरून त्यांनीं मला माडीवर नेलें. तोंडाला सोमरसाचा चिक्कार वास येत होता. डोळे सारखे तांडवनृत्य करीत होते. आम्ही दोघे खुर्चीवर बसलों, व एक तासपर्यंत सदरहू गृहस्थानें जगांत—हिंदुस्थानांत—महाराष्ट्रांत—व पुण्यनगरींत समाज-सुधारणेचे जे प्रयत्न झाले, व अनेकांना वीरोचित मरण आलें ह्याचें अस्खलित कथन केलें. त्यांचें तें ओघवतें वक्तृत्व, सखोल विवेचन, व्यापक दृष्टिकोन, व तीव्र तळमळ पाहून मी चाकित झालों; आणि जेव्हां महान् श्रेष्ठांच्या मालिकेंत इतिहासानें माझी जागा मुक्रर केली आहे असें शुभवर्तमान त्यांनीं सांगितलें त्या वेळीं मला वाटलें—मी स्वर्गापासून दोन बोटें

खालीं नसून चांगला वीतभर वरच गेलों आहें! सर्व सुखदुःखांचा विसर पाडणारी, गरीबांना सहजसाध्य व श्रीमंतांना निराशेंत खेळवणारी निद्रा नयनद्वारें लावून घेऊं लागली. ह्या गृहस्थांना बाहेर घालविणें हा एक मोठा विक्रम होऊन बसला. कांहीं तरी निमित्त करून खालीं आलों व त्यांनाहि खालीं बोलाविलें, आणि बोलत बोलत रस्त्यावर सोडून मोठ्या सफाईनें घरांत शिरून दार लावून घेतलें. एवढें करीपर्यंत काळ थांबला नव्हता, व मध्यरात्र उलटून गेली होती. माथ्यावरचा चंद्र ढळला होता. वाट पाहणारी निद्रावश झाली होती, आणि दिवसभर झालेल्या – व विशेषतः शेवटल्या घटनेचा विचार करीत करीत मी निद्रावश झालों होतों.

आणि दोन तीन तास झोंप होते न होते तोंच सुरुवातीस सांगितलेला आवाज माझ्या कानीं आला, आणि किंचित् रागानें उठून हॉलमधील दिवा लावून, जिन्यांतील दिवा लावून मी खालीं आलों; दिंडी उघडली, आणि दिंडींतून तात्या प्रवेश करतांना पाहिले. माझें मन विलक्षण भावनांनीं भरून गेलें. सकाळची ब्राह्ममुहूर्ताची ही वेळा होती. प्रहराच्या आंत कांहीं तरी विलक्षण व्हावयाचें होतें; आणि ह्या प्रसंगीं क्वचित् घरीं येणारे कां यावे ह्याचा बोध होईना. तात्या म्हणजे मूर्तिमंत वेदपुरुष होत. आमच्या आळींतील तात्या ही एकच व्यक्ति अशी होती कीं जिच्याविषयी आबालवृद्धांना आदर होता. तात्या मोठे पाठक व वैदिक होते. आचरणानें निर्दोष, स्वभावानें निःस्पृह, आपण व आपली विद्या ह्याव्यतिरिक्त कांहीं जग आहे, – अगर कांहीं रस घ्यावा असें कांहीं क्षेत्र आहे असें न मानणारे असे ते एक महान् विरक्त पुरुष होते. गृहस्थाश्रमांत ज्यांनीं संन्यासवृत्ति स्वीकारली होती असे ते एक निरिच्छ साधुपुरुष होते. मला तो प्रसंग अजून आठवतो आहे, कीं ज्या वेळीं त्यांनीं ओंकारेश्वराच्या स्मशानभूमींत आपल्या एकुलत्या एक पुत्राला अग्नि दिला, त्याहि वेळीं त्यांच्या डोळ्यांतील समाधानवृत्ति अढळ होती. मुखानें नेहमींप्रमाणें वेदाच्या ऋचा अगर अन्य पाठ म्हणणें चालूच होतें. नेहमींच्याच गतीनें ते पावलें टाकीत होते. ‘सुखदुःखे – लाभालाभौ समे कृत्वा’ असें करणारा फक्त तराजूचा कांटाच असतो. पण हें जें केवळ कल्पनासृष्टींत असतें तें तात्यांच्या रूपानें तेथें प्रथम मला दिसलें; व त्यानंतर मी सारखा त्यांना पहात होतों. रस्त्यांतून जातांना अखंड वेदपाठ मुखानें करीत नात अगर नातू ह्याला कडेवर

अगर खांद्यावर घेऊन जातांना मी त्यांना पहात असें. शरीर हें नश्वर आहे असें आमचा वेदान्त सांगतो, व आम्ही मग नित्य शोक करीत असतों. आत्मा अमर म्हणून त्याला सोडून देहाची काळजी आम्ही वाहात असतों; परंतु खरोखर गोपालनंदनानें उपनिषद्सार काढून गीतार्थ सांगितला त्याचें रहस्य ज्यांनीं जाणलें त्यांपैकीं तात्या हे होते. नित्य ब्रह्मकर्म करून जीवनयात्रा करणारे ते होते. अशा सत्पुरुषाचें दर्शन सुप्रभातीं व्हावें हें केवढें माझें भाग्य असाच विचार माझ्या मनांत आला;– आणि माझ्यावर त्यांचें तसेंच प्रेमहि होतें. त्याचें एक कारण – एवढा इंग्रजी शिकलेला असूनसुद्धां देवदर्शनाला येतो व नम्रतेनें बोलतो हें होतें. मीं तत्काळ त्यांना नमस्कार केला, व "ह्या वेळीं इकडे कोणीकडे?" असें विचारलें. तात्या म्हणाले, "तूं महारांना घेऊन पर्वतीच्या देवळांत जाणार आहेस हें खरें का?" मी म्हणालों, "होय, तात्या; खरें आहे." त्यांना किंचित् दुःख झाल्याचें दिसलें आणि म्हणाले, "तूं हें करशील असें मला वाटत नव्हतें. तुजबद्दल मला प्रेम आहे; व तूं हें असें करूं नयेस. हें आपल्या धर्माविरुद्ध आहे. कालाकालानें सर्व कांहीं होईल." तात्यांशीं तात्त्विक वाद करण्याची ही वेळ नव्हती. वादविवादानें परंपरागत आलेली श्रद्धा क्वचितच ढळते. आणि तशांत अशी श्रद्धा बाळगणारे चारित्र्यसंपन्न व विद्वान् असले तर हें काम अत्यंत दुर्घट होतें.

तात्यांशीं बोलतांना यौवनसुलभ वादविवाद अस्थानीं ठरला असता. शिवाय मीहि ह्या घटनेंत वर लिहिल्याप्रमाणें कांहीं विचार करून अगर आदर्शाच्या तळमळीनें पेट घेऊन पडलों नव्हतों. कसें बोलावें तात्यांशीं हें क्षणभर मला समजेना. त्या क्षेत्रांत वाचेच्या साह्यानें प्रवेश करणें कठीण होतें. सिद्धान्ताचा अहंकार तेथें कुचकामाचा ठरला असता; म्हणून त्यांच्यांतील वात्सल्य आळवणें व त्याला आवाहन करणें हाच एक मार्ग आहे हें अंतःकरणानें ओळखलें. मी अत्यंत नम्रतेनें म्हणालों, "तुम्ही मला पित्यासमान आहांत; तुमचं मीं ऐकूं नये, तुम्हांस अवमानावं हें माझ्या मनांतसुद्धां येणार नाहीं;– मग घडणं तर लांबच राहिलं." मीहि ह्या बाबतींत कसा वचनबद्ध झालों ह्याचा इतिहास थोडक्यांत वर लिहिलेला सांगितला आणि नम्रतेनें म्हणालों कीं, "आपलं ऐकतों, पण एकाला दिलेलं वचन मोडलं हें पाप जन्मभर माझ्या आयुष्याला कलंकित करीत

राहील. लोकनिंदेची मला पर्वा नाहीं. कोणी मला भित्रा म्हणतील, कोणी धोकेबाज म्हणतील. मला जर मी करीत आहें ह्या बाबतींत नैतिक दृष्ट्या शंका असती, तर मीं आपलं म्हणणं आप्तवाक्य समजून ताबडतोब वागलों असतों. मी आपलं ऐकलं नाहीं, व सदसद्विवेकबुद्धीनं दिलेल्या आदेशा-प्रमाणं वचनपूर्ति केली तर मला एक विलक्षण समाधान लाभणार असून जें उघड उघड पाप वाटतं त्यापासून मी बचावणार आहें. आपलं ऐकलं नाहीं असं होईल, पण हा अपराध आपण पितृवात्सल्यानं पोटांत घालाल. जें कालान्तरानं होणार आहे तें मीं कांहीं काल आधीं आणलं — अगर तसा प्रयत्न केला, एवढाच दोष माझ्यावर फार तर येईल. तेंव्हां आपणच मला आतां सांगा कीं, मी काय करूं? सुप्रभात होते आहे. आज विजया-दशमीचा शुभदिन आहे. तुम्हीच सांगा,— व मी ऐकतों—" आणि हें बोलतांना माझी वाणी सद्गदित झाली होती. भावनेनें भाषा संपूर्ण व्यापून टाकून एक मधुर वातावरण सहज निर्माण झालें. त्या स्थितप्रज्ञानें क्षणभर माझ्या मुखाकडे पाहिलें, व शान्त चित्तानें पण वात्सल्यपूर्ण भावनेनें "तर मग माझा तुला आशीर्वाद आहे!" असे अमोलिक शब्द उच्चारून चालण्यास सुरुवात केली.—आणि मुखानें पुन्हा वेदपठण सुरू झालें. मला क्षणभर आपण कोठें आहों हेंहि कळेना,—इतका आनंद झाला. तात्यां-बरोबर चालत जाऊन मीं मोठा दरवाजा उघडला व रस्त्याच्या मध्यापर्यंत त्यांना पोंचविलें. मुखानें वेदपठण करीत जाणारा हा वेदपुरुष सौजन्यमूर्ति दृष्टीआड होईपर्यंत मी रस्त्यांतच उभा होतों. तात्या लहानशा दिंडींतून आंत आले, व मोठ्या दरवाजांतून बाहेर गेले. येथपर्यंत झालेल्या घटना मनामध्यें पुन्हा पुन्हा येत होत्या, व पुन्हा पुन्हा त्या आणाव्याशाहि वाटत होत्या. आणि खरोखरच हा रोमहर्षक प्रसंग होता. उजाडणारी विजया-दशमी अशी ही मंगल वेळा — आणि सीमोल्लंघन करणाऱ्या मनाला अशा सत्पुरुषाचा आशीर्वाद, — अशा घटनेचें पुन्हा पुन्हा स्मरण कां न व्हावें!

आज ह्या गोष्टीला जवळ जवळ १९–२० वर्षें होऊनसुद्धां त्या प्रसं-गाच्या स्मृतीनें होणारा आनंद अद्यापि अवीट आहे; आणि जेंव्हां वचन-पूर्तीसाठीं अगर सदसद्विवेकबुद्धीच्या आदेशाप्रमाणें वागतांना लोकनिंदेचा गहजब होतो, व जें मनःपूत असें गीतेनें सांगितलेलें कर्म करीत असतांना गैरसमज व गैरलागू आरोप ह्यांतून मार्ग काढावा लागतो, — अशा सर्व

प्रसंगीं समाजांतील परंपरा व प्रचलित धर्म जणूं कांहीं तत्त्वांच्या रूपानें मजपुढें उभे राहून, 'तूं असं करशील असं मला वाटलं नव्हतं !' असेंच जणूं कांहीं सांगत आहेत असा भास होतो; व तसेंच मीहि त्यांना 'सदसद्विवेकबुद्धीचा आदेश मी अमलांत आणीत आहे' असें सांगत आहे; – व मला ते 'तर मग तुला माझा आशीर्वाद आहे !' असें सांगत आहेत – असा भास होत असतो. मग ह्या प्रसंगींसुद्धां मी अप्रामाणिक नाहीं अशी खात्री असते,—म्हणूनच ते आशीर्वाद देतात अशी माझी श्रद्धा आहे !



## ११ : आणखी एक मार्ग आहे!

कांहीं तरी औत्सुक्यानें घराबाहेर निघावें—व कांहीं तरी अकल्पित व्हावें—असा अनुभव अनेक वेळां येतो. अमुक एक करीन, अमुक एका ठिकाणीं जाईन, अमुक एक बोलेन, याप्रमाणें संकल्प बोलून निघावें,—परंतु कांहीं तरी अनपेक्षितच व्हावें असें होतें. प्रारंभींचें औत्सुक्य व अखेरची घटना यांत मनाला किती व कसे धक्के बसतात यांचें टांचण माणसें साधारणपणें ठेवीत नाहींत म्हणून बरें, नाहीं तर त्यांच्या स्मृतीनेंच निम्में जीवन नकोसें होईल. मनाला होणारा आनंद जेव्हां निव्वळ कल्पनेनेंच व्यापलेला नसून जर तो भौतिक पदार्थांच्या उपभोगांतून उत्पन्न झाला असेल तर तो जसा द्विगुणित असतो, तसेंच त्यानंतर झालेल्या घटनेची प्रतिक्रिया पण द्विगुणित होत असते; आणि अकल्पित व अनपेक्षित असें कांहीं घडलें म्हणजे सामान्यतः भांबावणारें मन अधिक भांबावून जातें. हे सर्व विचार सुचण्याचें कारण तसें पाहिलें तर एक अगदीं क्षुद्र घटना आहे. तसें म्हटलें तर त्या दिवशीं मी कांहीं पहिल्यांदांच नवा स्लीपर घातला नव्हता. लहानपणापासून ज्या एका क्षणाबद्दल लिहीत आहें त्या क्षणापर्यंत अनेक वेळां नवे नवे जोडे मला मिळाले होते,—अगर मीं घातले होते. काय असेल तें असो, शरीररक्षणाला आवश्यक असणाऱ्या गोष्टींत मला सर्वांत जोडा अधिक आवडतो. ह्याचा अर्थ असा नव्हे कीं तो पुणेरीच ३ चा आंकडा असणारा, अथवा रेशमी व रंगदार असाच असला पाहिजे. अगदीं लहानपणीं मीं पायांत काय घातलें असेन हें कांहीं आठवत नाहीं, तथापि समजूं लागल्यापासून कधीं बूट, कधीं शू, कधीं माळव्यांत ज्याला काण्या म्हणतात तो,– ह्याप्रमाणें पायाची सजावट केलेली आठवते. पण एक गोष्ट निश्चित कीं, ज्या दिवशीं वडील नवा जोडा घेऊन देत, अगर आपल्या नोकरीच्या गांवाहून म्हणजे निमच अगर इंदूरहून धाडीत, तो दिवस म्हणजे मला मोठ्या भाग्याचा वाटे. एका प्रसंगीं एकाच पायाचे दोन बूट आले असतांनासुद्धां अस्मादिकांनीं तसेच ते उपयोगांत आणले, व पायाला झालेली

जखम अगर कष्ट एखाद्या धीरोदात्त नायकाप्रमाणें जुमानले नाहींत. कॉलेजच्या आयुष्यांत खालावलेल्या परिस्थितींतसुद्धां नवा कोट कीं नवा जोडा असा पेंचप्रसंग उत्पन्न झाला असतां नव्या जोड्याच्या बाजूनेंच अभिप्राय पडे. अंतर्गत संरक्षणापेक्षां सरहद्दीवरील बंदोबस्त अधिक महत्त्वाचा, एवढें जाणण्याची मुत्सद्दोगिरी त्या वेळेपासून माझ्यांत होती असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं ! !

खस्ताईच्या दृष्टीनें, वहाण घेणें पसंत नसतांनासुद्धां दारिद्र्यदोषामुळें ती घेणें प्राप्त होई, व सुंदर स्लीपर घालून त्याच्या आवाजांत 'नमयती-वगर्ति धारित्री' असा अभिनिवेश करण्याची मनीषा मनांतल्या मनांत विरून जाई. तथापि जेव्हां सरस्वतीनें माझी संगत सोडून लक्ष्मीनें किंचित् धरल्यासारखें केलें, त्यावेळेपासून शक्य तों स्लीपर घेण्याकडे माझा कल असे. आणि असें अभिमानानें सांगूं शकतों कीं, मला वहाण लागली आहे, पण स्लीपर कधीं लागला नाहीं. यावरून मी स्लीपरसाठीं जन्मलों आहें — असेंच मला वाटत असे. जेव्हां मी नवा स्लीपर घेई, त्या दिवशीं वधू-परीक्षेच्या दिवसाइतकी विलक्षण स्थिति माझ्या मनाची होत असे; आणि माझ्या स्लीपरचा आकारहि गीतेंत सांगितल्याप्रमाणें अति बारीक नाहीं, अति निमुळता नाहीं, अति फताडा नाहीं. पण मध्यम 'टो' असलेला असाच स्वभावतः मी पसंत करीं. सद्गुण म्हणजे दोन टोंकांतील मध्य-बिंदु असें समजतात, आणि त्या दृष्टीनें नखशिखान्त मी सद्गुणांचा पुतळाच होतों. अगदीं बिहारी तोकडी पण नव्हे, अगर पुणेरी नालबंदाप्रमाणें बेफाट उंच पण नव्हे, अशी मध्यम उंचीची टोपी माझें शिरोभूषण असे. पायघोळ अंगरखा, व जाकीट कीं कोट याबद्दल संशय उत्पन्न करणारा कोट सोडून त्याहि बाबतींत मी मध्यबिंदु गांठीत असें. ज्या क्षणासंबंधानें लिहीत आहें, त्या काळांत नेहरू शर्ट प्रचलित होता, पण अस्मादिकांनीं आपलें महाराष्ट्रीयत्व व वैचारिक अस्मिता कायम टेवली होती. वेष असावा बावळा, पण अंतरींच्या नाना कळांचें ओझें न घेतां मी प्रतिष्ठेनें मिरवीत असें.

त्या दिवशीं अशा या बावळ्या वेषांत, पण आदल्या दिवशीं विकत घेतलेल्या श्यामलरंगी — आणि हळूच सांगतों, कां कोण जाणे, पण हाच रंग मला अधिक आवडतो — स्लीपर घालून मी बाहेर पडलों होतों.

कोठलीहि नवीन वस्तु वापरतांना मानवी मन साहाजिकच प्रसन्न असतें. त्याप्रमाणें मोठ्या औत्सुक्यपूर्ण मनानें आणि कांहीं तरी कल्पनेच्या वातावरणांत दंग होऊन मी घराबाहेर पडलों होतों. ती साधारण दुपारीं४।-४॥ ची वेळ होती. आमच्या आळीचा लौकिक वाईट रस्ता, तिरपा रस्ता, असा फार प्राचीन काळापासून चालत आला आहे; आणि या प्राचीन परंपरेंत नगरपालिका कोठल्याहि पक्षाची दासी झाली तरी बदल करूं शकत नाहीं, ही आम्हां आळीकरांना अत्यंत अभिमानाची गोष्ट वाटते. गेल्या साठ वर्षांत अनेक रस्ते नवीन झाले, कांहीं रुंदावले,—कांहीं नवे—जुने झाले, पण आमच्या आळीच्या दक्षिण प्रवेशद्वारीं असलेल्या पीरानें व उत्तर प्रवेशद्वारीं असलेल्या वीराच्या मारुतीनें एकमेकांशीं संगनमत व सहकार्य करून गल्लीच्या ह्या लौकिकाची परंपरा अखंड संरक्षित ठेवली आहे; व त्याचबरोबर हिंदु—मुस्लिम संस्कृतीचा समन्वय ह्या बाबतींत कायम ठेवला आहे. आमची ही गल्ली म्हणजे सामान्य मार्ग नव्हे, हा मृत्युलोकाकडे जाणारा अखंड व अव्याहत मार्ग आहे; आणि याच मार्गानें नामवंत—लक्ष्मीवंत असे गेले आहेत. देशभक्त व देशद्रोही, श्रीमान् व दरिद्री, संत व पापी—याच मार्गानें जाऊन जगांतील सर्वश्रेष्ठ, वा जेथें निर्विकल्पपणें समाजवाद वावरत आहे त्या स्मशानभूमीकडे गेले आहेत. ह्या गल्लींतून जाणारा—येणाराला मानवी जीवनांत मृत्यूचा शेजार अनिवार्य असतो हें जसें सहज पटून येतें, तसेंच ह्या मार्गानें जाणारे हा मार्ग अखंड चालू असतांनासुद्धां जीवनांतील क्षणभंगुरता लक्षांत न घेतां जात असतात, हेंहि तितकेंच खरें! विद्यार्थी व वृद्ध, धांदलींत पळणारे भिक्षुक, तर संथ गतीनें म्हशींना हाणीत जाणारा गवळी,—समाजांतील निरनिराळ्या क्षेत्रांतील व्यक्ति जशा अन्य कोठल्याहि मार्गावर आढळतात तशा याहि मार्गावर आढळतात. पण विशेष म्हणजे दिवसाच्या ठराविक वेळांतून ठराविक धंद्याचीं माणसें जात असतात. ज्या वेळेसंबंधीं मी लिहीत आहें ती वेळ म्हणजे नदीपलीकडील वाडी व त्या पलीकडील खेडेगांवांतील लोक बाजारहाट करून जाण्याची वेळ होती.

वर लिहिल्याप्रमाणें मी नवीन स्लीपर घालून त्याच्या निघणाऱ्या मृदु पण मर्दानी आवाजाबरोबर शरीराप्रमाणें मनाचीं पावलें विचारसृष्टींत टाकीत चाललों होतों. त्या अरुंद रस्त्याच्या मध्य भागांतून एक मराठा

युवक चालला होता. त्याचें धोतर तांबड्या मातीच्या रंगानें रंगलेलें होतें. धोतरावरून कमरेला गुंडाळलेल्या लंगोटाची दोरी त्याच्या कुडत्याबाहेर लोंबत असलेली दिसत होती. त्याच्या अंगांत त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें मलमलीचा मुंडेछाट सदरा होता. त्याच्या डोक्यावर टोपी नसून कोथरुडी मुंडासें होतें, व थोड्या अव्यवस्थित रीतीनें तें बांधलेलें होतें. त्याचें शरीर कसलेलें होतें हें सांगण्याचें कारणच नाहीं. त्याच्या पोषाखावरून तालमीचा त्याला षोक असावा हें स्पष्ट दिसत होतें. खांद्यावरतीं असलेल्या शिंक्यावरून बहुतकरून तो गवळी किंवा गवळ्याचा धंदा करणारा असावा असें वाटत होतें. अशा तऱ्हेचे नमुने पुण्यामध्यें सकाळीं मंडईत, संध्याकाळीं जुन्या बाजारांत, व पुण्यांतील हॉटेलांतून दिवसभर पहावयास मिळतात. आणि हा तरुण – आतां आठवत नाहीं समोरून येत होता का आम्ही एकाच दिशेनें जात होतों – पण एवढी गोष्ट खरी कीं तोहि कांहीं तरी आपल्या विचारतंद्रींत होता, व मीहि आपल्या विचारतंद्रींत मग्न होत्साता चाललों होतों.

आणि काय झालें कोणास ठाऊक, त्याच्या पायावर माझा पाय पडला, –आणि ताबडतोब अकल्पित स्फोट झाला ! त्यानें किंचाळी फोडली, व ताड्कन् आपल्या पायाकडे हात नेला. माझी विचारतंद्री पत्त्याच्या किल्ल्याप्रमाणें कोसळली. काय विचार करीत होतों हें कांहीं आज नक्की सांगतां येत नाहीं. तथापि ते विचार कांहीं तरी देशासंबंधीं, कदाचित् त्यांतच समाविष्ट असलेल्या महत्त्वाकांक्षी स्वार्थाबद्दलहि असूं शकतील. एक गोष्ट निश्चित कीं, आधुनिक युगाप्रमाणें सर्वव्यापी प्रेमाबद्दलचे हे विचार खास नव्हते. प्रेमाच्या विचारांत दुसऱ्याच्या पावलावर पाऊल पडलें तर, आणि नकळत पडलें तरीसुद्धां तें क्षम्य ठरलें असतें. हा कोरा करकरीत स्लीपर ह्या युवकाच्या पायावर पडावा, व त्यानें किंचाळी फोडावी ह्याचा अर्थच मला कळेना. क्षणांत मीं त्याच्याकडे पाहिलें. त्याच्या पायांतून रक्त येऊं लागलें होतें. किंचाळण्याच्या बॉंब-वर्षावानंतर इरसाल शिव्यांची फायर सुरू झाली; आणि आमचा देशी मराठा गडी शिव्या देऊं लागला म्हणजे साहित्यिक बनतो, ह्याचा अनुभव पण येऊं लागला. क्रप फॅक्टरींत तयार झालेल्या मशिनगनमधून जेवढ्या गोळ्या निघाल्या नसतील त्यापेक्षां अधिक शिव्या आणि अश्लील शब्दांचा वर्षाव त्याजकडून होत होता.

माझ्या तेजस्वी डोळ्यांना त्यानें फुटके ठरविलें. सामान्यतः नम्र असणारा मी माजोरी म्हणून मला पदवी बहाल केली गेली. वर्णाश्रमव्यवस्थेला अनुसरून माझ्या जन्मदात्रीचा उद्धार पण त्यानें केला. एखाद्यावर चहूं-बाजूंनीं जसा मारा व्हावा असेंच थोडेंसें झालें.

युद्धशास्त्रांत अकल्पितपणा हें एक मोठें तंत्र समजलें जातें; व जेवढा हल्ला अकल्पित, जेवढा शत्रु बेसावध, तेवढा जय अधिक लवकर व अधिक निश्चित. पण येथें शत्रुत्व नव्हतें. वर्णाश्रमावर विश्वासहि नव्हता. अहिंसेवर संपूर्ण विश्वास जरी नसला तरी कोणाला दुखवावें ही बुद्धि नव्हती. विनोदाच्या आहारीं जाऊन प्रसंगीं मनाला दुखविणारी शब्दरचना जरी होत असली, तरी हेतु संपूर्णपणें निरागस असतात. अशा स्थितींत असें कोणतें दुर्दैव कीं जें एकवटून या तरुणाच्या मुखांतून शब्दरूप घेऊन बाहेर पडावें! दारूगोळ्यानें लोक सैरावैरा पळतात, तर ह्या चाललेल्या सरबत्तीनें रस्त्यावरील माणसें गोळा होत होतीं. नाना प्रकारचीं व नाना तऱ्हेचीं माणसें तेथें होतीं. प्रवृत्तीनुसार घटनेचा अर्थ जो तो लावीत होता.

कांहीं क्षण तसेच गेले. कधींहि व कुठल्याहि प्रसंगांत न डगमगणारा व हंसत खेळत होणाऱ्या घटनांना तोंड देणारा स्वभाव किंचित् बावरल्यासारखा वाटूं लागला. उभ्या असलेल्या प्रसंगाला कसें तोंड द्यावें ह्याचा विचार शान्तपणें करण्याला अवकाशहि नव्हता. क्षत्रियवृत्ति उचंबळून येत होती. ब्रह्मतेज संयम दर्शवीत होतें, व्यवहारबुद्धि कांहीं देऊन कटकट मिटवून टाकण्याबद्दल नाजूकपणें सल्ला देत होती. सेवाभाव मात्र जागृत झाला नव्हता; आणि तो जर जागा झाला असता तर ताबडतोब माझे हात त्याच्या पायाशीं जुळले असते, व झालेल्या जखमेला दूर करण्यांत गुंतले असते. सदरहु तरुण झालेलें दुःख व त्याच्या वेदना यापेक्षां माझ्यावर शिव्या व आरोप करण्यांत अधिक निमग्न झालेला दिसत होता. दुःखापेक्षां दुःखाची तक्रार करण्यांतच मानवी मनाला समाधान वाटतें कीं काय न जाणे! एवढी गोष्ट खरी कीं, जें होत होतें तें फार काळ चालूं देणें इष्ट नव्हतें. कृतीचा क्षण केव्हां तरी यायलाच पाहिजे होता; आणि उशीरां केलें आणि राज्य गेलें — हें तर नको होतें. पण काय करावें हेंहि कळेना!

तथापि पर्वतापुढें वायु निस्तेज ठरतो, तद्वत् थोडेंसें झालें. किंचित् क्षणापर्यंत मीं ठेवलेली शान्तता लोकांना धैर्याच्या पर्वतासमान वाटल्यास ती त्यांची चूक असें म्हणतां येणार नाहीं. पेंचप्रसंगांतच पेंच सुटण्याचा मार्ग असतो असें म्हणतात, व कोड्यांतच कोडें सोडविण्याची रीत समाविष्ट असते असें मानलें जातें. प्रसंगांतच प्रसंगांतून पार पडण्याचा रस्ता असतो. थोडी पाहण्याची दृष्टि मात्र लागते. आणि तसेंच थोडेंसें झालें. शान्त चित्तानें नासाग्रीं दृष्टि ठेवून अगदीं गंभीर रीतीनें मी त्याला म्हणालों, " देवानें दिलेली वाणी अशी कां विटाळतोस ? मला व माझ्या जातीला शिव्या देऊन तुला झालेली जखम भरून येत असेल तर मला कांहीं बोलायचें नाहीं. तुला झालेलें दुःख माझ्या पायावर पाय देऊन बरें होत असेल तर हा माझा पाय तयार आहे." त्याच्या चेहऱ्यावरील निम्मा आवेश कमी झालेला दिसला. कुरबुरणारे व बडबडणारे प्रेक्षक कान टवकारून बघूं लागले व ऐकूं लागले. पुढें म्हणालों, " तुला कायद्याचा मार्ग मोकळा आहे, गेट दूर नाहीं; चल आपण दोघेहि तिथें जाऊं. तूं तुझी फिर्याद दे. जें कोर्ट करील तें मी मान्य करीन." अधिक शान्ततेनें उच्चारलेले हे शब्द अधिक परिणाम करते झाले. त्याचें डोकें शान्त झालेलें दिसलें. पण अंतःकरणाची खळबळ डोळ्यांतून सहज दिसून येत होती. अंतःकरणांतल्या गडबडीची बातमी अचूकपणें देणारा डोळ्याइतका अचूक बातमीदार मानवदेहांत नाहीं. प्रेक्षक स्तब्ध झाले. पायावरील हात काढून सदरहु तरुण माझ्याकडे बघूं लागला. नाग मंत्रमुग्ध व्हावा, अगर अभिसारिका उन्मनीय व्हावी, असें कांहीं तरी — कीं ज्यांत मन विचारापासून अलग होऊन भावनेकडे जावें, असें झालें; आणि आतां शेवटचा वाग्बाण—कीं जो फोडणारा नव्हता, पण जोडणारा होता, व ज्यानें अखेरचा परिणाम व्हायचा होता तो रसनेंतून निघाला. " हें पहा गड्या, हे दोन्ही मार्ग पसंत नसतील— आणि मला तरी पसंत नाहींत;– तर एक तिसरा मार्ग आहे. चूक माझी आहे; पण मीं ती मुद्दाम केलेली नाहीं. आणि म्हणून मी तुझी क्षमा मागतों. तूं मला माफ करावेंस ! पहा ! " हे शब्द मी उच्चारीत असतांना तेवढ्यांत गर्दीत नव्यानें आलेल्या एका गृहस्थानें विचारलें, " वकीलसाहेब, काय भानगड आहे ? " माझी समजूत अशी आहे कीं हे शब्द त्या तरुणानें ऐकले असावेत; व ' जाऊं द्या राव–' असें म्हणून मार्ग चालूं लागला. पण

ह्या घटनेंत माझ्या धंद्याची प्रतिष्ठा निर्णायक ठरली असें मानण्यास मी तयार नाहीं. ज्या भावनामय वातावरणांत मीं क्षणिक याचना केली तीच गोष्ट निर्णायक ठरली असें मी मानतों. आणि आयुष्यांत ह्या घटनेंतील तात्पर्य मी अनेक वेळां अनुभवलेलें आहे. कांहीं तरी विचार करून कार्य सुरू करावें, कांहीं तरी अकल्पित व्हावें, अशा सर्व प्रसंगीं ह्या सद्विचाराचा नैतिक सरंजाम अनेक संकटांतून सोडविता झाला. विकारवश होण्याच्या क्षणीं विवेकदीप मालवला असतांना मनुष्य संभ्रमांत सांपडतो, आणि सामान्यपणें विवक्षित असलेले मार्गच त्याला दिसतात. तथापि प्रचलिताच्या पलीकडे परंपरेहून दूर पण स्थायी संस्कृतीला अनुसरून असणारा असा आणखी एक ' मार्ग ' असतो,—तो मार्ग विवेकानें शोधावा लागतो.



## १२ : 'साहेब आमच्याशीं बोलला!'

मध्यवर्ति असेंब्लीचें अधिवेशन संपत आलें होतें. दिल्लीचें वातावरण सर्व दृष्टींनीं गरम होत चाललें होतें. कोणत्या वेळीं कोठून काय बातमी येईल याचा अंदाज कोणीहि सांगूं शकत नव्हता. पण अशीच एक अकल्पित घटना घडून आली. सोनेरी मानचिन्ह काढलेली व्हाइसरॉय व व्हाइसरिण यांचें At Home चें निमंत्रणपत्र सरकारी हरकाऱ्यानें आणून दिलें. असेंब्लीच्या गेल्या बारा वर्षांत काँग्रेसपक्षीयांवर आलेला हा पहिलाच प्रसंग होता. परकीय सत्तेचा प्रतिनिधि या दृष्टीनें व्हाइसरॉयला काँग्रेस पहात असल्यानें सर्व प्रसंगांवर काँग्रेसनें बहिष्कार टाकलेला होता; व ही काँग्रेसची वृत्ति जाणून आतांपर्यंत असें आमंत्रणहि देण्यांत आलें नव्हतें. आतांहि तें यावें असें कांहीं घडलेंच आहे असें नव्हतें. आणि म्हणून ती निमंत्रणपत्रिका फाडून टाकून फेकून द्यावी असा विचारहि आला. पण ज्या अर्थी आतांपर्यंत कधींहि न आलेलें निमंत्रण आलें आहे, त्या अर्थी अधिक चौकशी करून मग काय तें ठरवावें असा पोक्त विचार करून निमंत्रणपत्रिकेला योजलेली शिक्षा तहकूब केली. दुसराहि विचार त्याच वेळीं मनांत आला. आमच्या पुण्यांत आमचे एक स्नेही आहेत. त्यांच्या आजोबाला चाळीस वर्षांपूर्वी "गव्हंडर"च्या पार्टीची आलेली निमंत्रणपत्रिका फ्रेम करून त्यांनीं आपल्या घरांत ठेवली आहे; व आपले आजोबा गव्हर्नरवर फाकडें मराठी बोलून छाप मारीत असत असें श्रद्धेनें तें सांगत असतात. माझ्या मनांत असा विचार आला कीं, ज्याच्या साम्राज्यावर सूर्य मावळत नाहीं त्या सम्राटाच्या प्रतिनिधीनें मला आमंत्रण दिलें असतां तें मीं नाकारलें हा लौकिक आपल्या पुढील पिढीला कां न मिळावा? आणि आजहि कित्येक — आपणांस अमकी जागा देऊं केली असतां नाकारली असें आपल्या बडेजावीसाठीं सांगतातच कीं नाहीं! एकाच घटनेंतून विरोधी वृत्ति स्वतःचा सन्मान करून घेतच असतात. स्वीकारलेले राज्यकर्ते ठरतात, तिरस्कारलेले हुतात्मे ठरतात.—आणि यालाच आम्ही राजकारण म्हणतों.

तथापि यांतून कांहीं ‘राजकारण’ खास उत्पन्न करावयाचें नव्हतें. दुपारीं सभागृहांत माझ्याप्रमाणें अनेकांना अशाच पत्रिका आल्या होत्या. अनेक लोक जावें कीं नाहीं याबद्दल सल्ला विचारीत होते. आणि मीहि मुत्सद्द्याप्रमाणें “जाण्यास हरकत नाहीं;” “न गेल्यानें बिघडत नाहीं” असा सल्ला देत होतों. एका खवचट सभासदानें “तुम्ही काय करणार तें सांगा” असें विचारून पेचप्रसंग निर्माण केला. “अद्यापि विचार केला नाहीं; अजून दोन दिवस अवकाश आहे.” समयाचा आधार घेऊन समयज्ञता दाखविली. तथापि निर्णय घेणें आवश्यक होतें; आणि जवळ जवळ जावयाचें नाहीं असा मनानें निर्णय घेण्यापर्यंत परिस्थिति आली होती. तेवढ्यांत प्रतोदनें येऊन, “सर्वांनीं गेलें पाहिजे” असा ‘वर’चा संदेश सांगितला. मार्ग दाखविणारावर मार्गांत घडणाऱ्या पापांची जबाबदारी पडते असें जैन धर्मांत सांगितलें आहे असें म्हणतात; आणि राजकारणांत अनुयायांनीं केलेल्या दुष्कृत्यांची जबाबदारी नेत्यांच्या डोक्यावर याच कारणासाठीं मारली जाते असें राजकारण-धर्म सांगतो.

—म्हणून शेवटीं ‘निमंत्रण स्वीकारलें आहे’ असें व्हाइसरॉयसाहेबांच्या चिटणिसांना कळविलें. आतांपर्यंत चहापार्ट्या, मेजवान्या कांहीं कमी झोडल्या असें नाहीं. तथापि कांहीं विशेष घडत आहे असें वाटत होतें. निमंत्रण-पत्रिकेवर कोणत्या पोषाखांत यावें यासंबंधीं सूचना होत्या. आणि सपत्निक येणार असल्यास तसें कळवावें असेंहि सुचविलें होतें. या दोन्हीं बाबतींत मला पंचाईत करण्याचें कारण नव्हतें. ज्यांची ‘मंडळी’ तेथें होती त्यांच्या-पुढें विचार पडणें साहजिक होतें. व खऱ्या इस्लामी कायद्याला अनुसरून ज्यांचा जनानखाना एकापेक्षां अनेकांनीं विभूषिलेला होता, त्यांच्यापुढें पेंचप्रसंगच होता. कारण निमंत्रणपात्रिकेंतील पत्नीसंबंधीं उल्लेख एकवचनी होता ! कॉंग्रेसमधील कांहीं लोकांनीं कोणत्या पोषाखांत जावें म्हणून मला विचारलें. मीं त्यांना म्हटलें, “यांत काळजी वाटण्यासारखें काय आहे ! आपल्यापुढें आपल्या महान् पुढाऱ्यांचे नमुने आहेतच. ‘गांधी’ पोषाखा-पासून ‘जवाहर’ पोषाखापर्यंत ज्याला जें पटेल तें घ्यावें. फक्त कसला तरी पोषाख करा एवढी काळजी घ्या म्हणजे झालें !” वास्तविक कोठल्याहि समारंभास जातांना गबाळग्रंथी पोषाख करण्याचा मी प्रयत्न करतों. तथापि आपण या समारंभाकडे तुच्छतेनें पाहतों, व या समारंभांत विशेष कांहीं

नाहीं हें दाखविण्याचा अहंकारी भाव कोठें तरी मनांत आंतल्या आंत चळवळ करीत होता. आणि ज्या वेळीं निघण्याची वेळ झाली, तेव्हां एकदम त्या भावाच्या आहारीं जाऊन नुसता सदरा घालूनच बाहेर पडलों. खिशांत काळा गोफ बांधलेलें घड्याळ ठेवलें, व हातांत निमंत्रणपत्रिका घेऊन मी व आमचे अन्य स्नेही व्हाइसरॉयच्या निवासस्थानाकडे निघालों.

सेक्रेटरिएटच्या दोन इमारतींच्या मधून जाणाऱ्या रस्त्यावरून आमची तिरंगी निशाण असलेली मोटर जात होती. व्हाइसरॉय-भवनाच्या प्रवेश-द्वारापासून ते दरबार हॉलच्या पायऱ्यांपर्यंत सुमारें दोन फर्लांगाचा रस्ता पोलिसांच्या रांगांतून आम्हीं आक्रमिला. तसें म्हटलें तर पोलिसांच्या रांगेतून जाण्याचे प्रसंग अनेक आले होते. परन्तु त्यांत आणि यांत फरक होता. या वेळीं प्रत्येक पोलिस अभिवादन करीत होता, व आम्हांलाहि आम्ही कोणी तरी मोठे आहोंत असें वाटत होतें. दरबार-हॉलसमोरील पायऱ्यांजवळ आमची गाडी येतांच गोऱ्या सार्जंटनें सलाम करून दार उघडलें, व दोन नंबर—एक आमच्याजवळ व एक ड्रायव्हरजवळ दिला. गोऱ्या सार्जंटनें व काळ्या फौजदारानें आम्हांला यापूर्वीहि मोटरींत कोंबलें होतें व काढलें होतें, पण त्या सर्व पोलिसांच्या मोटरी होत्या; व त्या वेळीं सलामहि ठोकला नव्हता. त्या वेळीं आम्ही ‘ देशाचे दुष्मन् ’ होतों, ‘ आगलावे ’ होतों, ‘ उडाणटप्पू ’ होतों; व आज ‘ राज्यकर्ते ’ आहोंत,—असें समजून कालाचा प्रवाह ओळखून गोरा सार्जंट सलाम करीत होता.

सुमारें पन्नास पायऱ्या चढून जावें लागलें. या पायऱ्यांवरून गेल्या कित्येक वर्षांत किती तरी नरनारी राजपुरुषाचा अनुग्रह व्हावा म्हणून गेल्या असतील. व्हाइसरॉयच्या चहापार्टीचें आमंत्रण मिळावें म्हणून लोक कोण यातायात व कोण प्रयत्न करतात,— आणि तें मिळाल्यावर या पायऱ्या चढतांना खरोखर स्वर्ग-सोपान चढत आहोंत असें त्यांना वाटलें असलें पाहिजे. पांचपांच हातांच्या अंतरावर दोन्ही बाजूंस मौल्यवान् पोषाख केलेले सेवक उभे होते. पेशवाई अंगरखा, वर कलाबुती काम, डोक्यावर टिपू सुलतानी वाटोळी पगडी, कमरेला सोनेरी म्यानांत जंबिया,—असा त्यांचा थाट होता. पायऱ्या संपतांच समोर मुख्य घुमटाखालीं आकारानें प्रशस्त असा दरबार-हॉल दिसत होता. त्याच्या मध्यभागीं दोन मौल्यवान्

खुर्च्या ठेवलेल्या होत्या. सर्व हॉलभर गालिचे पसरलेले असून सर्व दृष्टींनीं नानाविध चित्रांनीं व कलाकुसरीनें सजविलेला असा दरबार हॉल जणूं कांहीं आम्हांला असेंच सांगत होता कीं, 'किसान व मजदूर राज्य येणार म्हणून रिकाम्या ठेवलेल्या दोन खुर्च्या वाट पहात आहेत.' आमच्यापैकीं एकजण म्हणाला, आपण आंत जाऊन पाहूं या. पण मी म्हणालों कीं, आपण एकदां आंत गेलों कीं बाहेर येणार नाहीं; म्हणून दरबार हॉलला उजवी घालून आम्ही पुढें चालूं लागलों. अनेक जिने चढून व अनेक उतरून या राजवाड्याचें वैभव पहात पहात शेवटीं मोगल गार्डनमध्यें आम्ही उतरलों.

जेथपर्यंत दृष्टि जात होती तेथपर्यंत—उन्हाळा सुरू झाला असूनसुद्धां सर्व भू-भाग हिरवाचार दिसत होता. दूर अंतरावरून तर हिरव्या रंगाचा गालिचाच पसरलेला आहे असें वाटत होतें. शालिमार बगीचाची ही प्रतिकृति आहे असें म्हणतात. ठिकठिकाणीं कारंजांतून पाणी उडत होतें. रेखीव वाटिका नयनमनोहर दिसत होत्या. कृत्रिम वृक्षसमूह निर्माण करून प्रेमी युग्मांना युक्त असें कुंज निर्माण केलें होतें. निरनिराळ्या आकारांच्या झाडांतून विजेचे दिवे लावून जसा प्रकाश केला होता, तशीच आडोशाच्या कुंजांतून आवश्यक इतका अंधार राहण्याची व्यवस्था करून जयदेव कवीनें केलेलें वर्णन साधण्यांत आल होतें. आम्ही जेथें प्रथम उभे राहिलों, त्या हिरवळीभोंवतीं अंतराअंतरावर शिपाई उभे होते. प्रथम मला तर तीं चित्रेंच वाटलीं; कारण यत्किंचित् हालचाल ते करीत नव्हते. त्यांपैकीं एकाजवळ जाण्याचें मीं धाष्टर्य केलें. गुडघ्यापर्यंत चामड्याचा बूट, हातांत सुमारें आठ फूट लांबीचा भाला, आणि त्याखालीं लांब पण रेखीव पद्धतीनें कापलेले केस असें त्या स्वाराचें स्वरूप होतें. त्यांतील प्रत्येक सहा फुटांपेक्षां जास्तच उंचीचा होता. मग तो जाट असो, शीख असो वा मुसलमान असो. एवढे तगडे, एवढे धिप्पाड, पण सर्कशींत ज्याप्रमाणें सिंह मॅनेजरच्या हुकुमाप्रमाणें स्तब्ध राहतो,— त्याप्रमाणें हे सर्व स्तब्ध होते. सर्व बगीचांत कोपऱ्याकोपऱ्यावर हे शरीररक्षक उभे केलेले होते.

आम्ही ज्या ठिकाणीं उभे होतों त्या ठिकाणीं निमंत्रितांची गर्दी वाढूं लागली होती. बगीचांतील निरानिराळ्या रंगी—बेरंगी पुष्पांशीं स्पर्धा

करण्याच्या हेतूनेंच कीं काय रंगीबेरंगी पोषाख करून आंग्ल स्त्रिया आल्या होत्या. एरवीं कॅनॉट सर्कलमध्यें हिंडतांना ज्यांच्या झग्यांची लांबी गुडघ्या-पर्यंत आकसत गेलेली दिसे, त्यांच्या झग्याची लांबी येथें भामिनीच्या सोग्याप्रमाणें हिरवळीवरून फरफटत होती. तथापि जेवढा अधिक कपडा या दिशेनें खर्च झालेला दिसत होता, त्याची भरपाई वक्षःस्थलावर शक्य तितका कमी कपडा ठेवून झालेली दिसत होती, व्यंजनेनें काव्य अधिक रसमय होतें म्हणतात, तितकीसुद्धां रसिकता होती कीं नाहीं याची शंकाच होती.' हें दृश्य पाहतांना कसेंसेंच वाटे, पण पहावेंसेंहि वाटे! साहजिकच आहे कीं, निसर्गाची ऊर्मि विवेक मर्यादित करील, पण नाहींशी करूं शकणार नाहीं. येणाऱ्या समाजांत कांहीं गंगाजमनी जोडपीं पण होतीं; आणि यांत धोरणी मद्रासी व धाडसी पंजाबी हेच प्रामुख्याने दिसत होते. कधींहि न येणारे लोक येथें आलेले पाहून तेथें हजर असलेल्या मिरास-दारांच्या मनांत कोणाला ठाऊक काय वाटलें असेल? तथापि आम्ही सर्व म्हणजे कॉंग्रेसवाले कुतूहलाचा विषय नक्कीच होतों. एकानें मला विचारलें, "या प्रासादाकडे पाहून तुम्हांला काय वाटतें?" मी म्हणालों, "यांत वाटायचें काय? याचें पुढें काय करायचें हाच प्रश्न आहे." एक सहकारी म्हणाला, "येथें दवाखाना करण्याचें ठरलेंच आहे." दुसरा म्हणाला, "येथें अजबखाना चांगला होईल." मी सभोंवार पाहून "झालाच आहे कीं!" असें म्हणालों,—आणि सर्वत्र हास्यध्वनि उसळला.

एवढ्यांत बँडचा मधुर ध्वनि सुरू झाला, आणि राजप्रासादाच्या उत्तर बाजूनें व्हाइसरॉय व त्यांच्या पत्नी लष्करी अधिकाऱ्यासमवेत बगीचांत प्रवेश करत्या झाल्या.

—आणि आतां समारंभाला सुरुवात झाली. बगीचांतील मधल्या चौकांत सर्वत्र टेबलें मांडलेलीं होतीं, व तिकडे आम्हांस जावयाचें होतें. व्हाइसरॉयच्या सेक्रेटरीनें अदबीनें मान लववून आम्हां सर्वांना तिकडे येण्याविषयीं विनंति केली. जाण्याचा रस्ता सरळ पण अरुंद असा होता. सुमारें वीस हात लांब, तीन हात रुंद, दुतर्फा लष्करी शिपाई व अधिकारी यांनीं रेखांकित केलेला असा हा मार्ग होता. प्रथम दोन दोन—किंवा जेलच्या भाषेंत 'जोडी जोडी' असे आम्ही उभे होतों, व निम्म्या रस्त्यावर

एकएक असे होत गेलों, आणि मला पंढरपूरच्या बारीची आठवण झाली. फरक इतकाच कीं, येथें स्त्री आणि पुरुष यांची एकच बारी होती. या दिव्याच्या शेवटीं विठोबा–रखुमाईऐवजीं व्हाइसरॉय व व्हाइसरिन यांचें दर्शन व्हावयाचें होतें.

क्षणाक्षणानें तो प्रसंग जवळ येत होता, आणि आतां व्हाइसरॉयपासून तीन हातांच्या अंतरावर मी आलों. बाजूचा गृहस्थ मागें झाला. डाव्या हाताच्या गोऱ्या लष्करी अधिकाऱ्यानें "Please take up your presentation card" असें सांगितलें. मी माझ्या पांढऱ्या टोपीकडे बोट दाखवून म्हणालों, "Will not this do? It has often made me His Majesty's guest." तरुण असल्यानें यांतील विनोद त्याला कळला नाहीं. पण त्याच्या पुढील वृद्ध गोऱ्या अधिकाऱ्यानें "Your card will enable us to know you." असें म्हटलें, आणि कार्डासाठीं हात पुढें केला. मीं त्यांच्या हातावर तें दिलें. त्यानें पुढील अधिकाऱ्याच्या हातांत दिलें व माझें नांव मोठ्यानें उच्चारलें. मीं पुढें झालों. त्या ठिकाणीं व्हाइसरॉय व शेजारीं त्यांच्या पत्नी उभ्या होत्या. व्हाइसरॉयनें हस्तान्दोलन केलें, व्हाइसरिननेंहि हस्तान्दोलन केलें. "कसें काय आहे?" असें दोघांनींहि इंग्रजींत विचारलें. आणि हिंदींत उत्तर देण्याचें ठरवून आलों असतां आयत्या वेळीं इंग्रजींत उत्तर देऊन मी पुढें निघून गेलों. संवयीनें स्वाभिमानावर मात केली.

आतां सर्वत्र दृश्य बदललेलें दिसत होतें. निरनिराळ्या टेबलांवर ठेवलेल्या खाद्यपेयांकडे महंमद गझनवीनें ज्याप्रमाणें हिंदुस्थानवर हल्ला केला त्या हिरीरीनें व त्या वेगानें स्त्री–पुरुष जात–येत होते; व भराभर पेले भरले जात होते, रिकामे होत होते. कांहीं टेबलांजवळ मदिरा व मदिराक्षी यांचा संगम झालेला दिसत होता. आम्ही सर्व मात्र शुद्ध व सात्त्विक पेयाच्या बाजूचे होतों हें सांगण्याचें कारण नाहीं. तथापि तेंहि मीं घेतलें नाहीं. त्या भव्य मैदानाच्या मध्यें उभा राहून मी निरीक्षण करीत होतों. हस्तान्दोलन करतांना ज्या लकबीनें व लालित्यानें ललना वांकत तें पुन्हा पुन्हा पहावें असें दृश्य होतें. संध्याकाळची ती वेळ होती. पश्चिम आकाशांत सूर्य झपाट्यानें अस्ताला जात होता. त्याचीं मावळणारीं किरणें मावळत्या

राजसत्तेच्या प्रतिनिधीचें अखेर–अखेरचें दर्शन घेत आहेत असें कवि–मनाला वाटत होतें.

भोंवतालीं दोन दोन पांच पांचच्या समूहानें देशांतील व जगांतील घडामोडींविषयीं चर्चा होत होती. चर्चा करतांना कोणी विषयापेक्षां व्यक्तीकडे अधिक लक्ष देत असले तरी तें क्षम्य ठरेल असेंच तें वातावरण होतें. एवढी गोष्ट खरी कीं, चार माणसें एकत्र आलीं असतां वधू–धनांच्या गोष्टी चार्चिल्या जातात तसें मात्र येथें नव्हतें. आलेल्या समुदायांत हंगामी सरकारांतील प्रधानहि होते. आणि या प्रधान-मंडळांत विधुर व ब्रह्मचारी ह्यांना फाजील प्रतिनिधित्व मिळालें असल्यामुळें कोणालाहि असें वाटेल कीं, हें रुक्ष प्रधानमंडळ आहे. पण तसें मानण्याचें कारण नाहीं. माझ्या-पासून फार थोड्या अंतरावर दिसण्यांत ओबडधोबड, संभाषणांत मुद्देसूद, व वाणींत मधुर अशा राजाजींनीं आपल्याभोंवतीं स्त्रियांचा गराडाच घालून घेतला होता; आणि उडणाऱ्या हास्य-फवाऱ्यांवरून मंडूकोपनिषदांतील तत्त्वज्ञान अगर शान्तिपर्वांतील नारीधर्म ते खास सांगत नव्हते हें उघड होतें! "खेडूत" वल्लभभाई तिरक्या दृष्टीनें कोण कोण काय करीत आहे हें पहात विनोदी कोट्या करीत होते. "उद्योगधंद्याचें वाटोळें करणारा हा 'लीगी' अर्थमंत्री आपल्या बेगमेबरोबर अनेक हिंदु स्त्री–पुरुषांशीं गप्पा मारतांना दिसत होता.

एवढ्यांत व्हाइसरॉयचा ए. डी. सी. मी उभा होतों त्या ठिकाणीं आला व म्हणाला, "आपण गाडगीळ का?"

मीं म्हटलें, "होय."

"आपणाशीं एच्. ई. (H. E.) बोलूं इच्छितात."

मीं विचारलें, "माझ्याशीं? आणि कशासाठीं?"

त्यानें सांगितलें, "तें माहीत नाहीं. मी थोड्या वेळांत तुम्हांला बोलवायला येतों." मी विचार करूं लागलों. माझ्याशीं ते काय बोलणार, व कां बोलणार? आणि बोलणार जर आहेत, तर आपण तरी काय बोललें पाहिजे? हा अगदीं नवीन प्रसंग होता. मराठे लढाईंत बाकबगार असतात, मैदानांत शेर असतात; पण मजलस त्यांना जमणार नाहीं, असें एका पुणेकर इतिहासज्ञाचें वाक्य डोळ्यांपुढें आलें. त्याचबरोबर माउंटबॅटन हा

घातुक मोहिनी असलेला गृहस्थ (dangerously charming) आहे असें वर्णन वाचल्याचें आठवलें. क्षणमात्र असाहि विचार आला कीं, आपण या समारंभाला आलोंच नसतों तर बरें झालें नसतें का? विचाराची साधन-सामुग्रीसुद्धां व्यवस्थित असावी लागते. शब्दरचना आगाऊ योजली असतां अधिक चांगलें असतें; प्रसंग आगाऊ कळला असतां मनुष्य तयारींत असतो, असा कांहीं विचार मी करीत आहें तोंच ए. डी. सी. आला व त्यानें मला तिकडे नेलें. त्याच मैदानावर एका बाजूस व्हाइसरॉय उभे होते. त्यांच्या-समोर मी व अर्ध्या मिनिटानें बंगालचे माजी मुख्य मंत्री नसिमुद्दीन असे दोघे आलों,—व आतां आम्ही तिघेच होतों हें सांगण्याचें कारण नाहीं. एवढेंच सांगतां येईल कीं, माउंटबॅटनचें केलेलें वर्णन यथार्थ होतें !

ही मुलाखत संपतांच मी पुन्हा मंडळींत आलों. कांहीं बातमीदारहि त्यांत होते. त्यांनीं माझ्याजवळून बातमी काढण्याचा प्रयत्न केला. पण मी 'पुढारी' नसल्यामुळें माझ्याकडून ती मिळाली नाहीं. राजकारणांत "बातमीदारांपासून सावध रहा" हा दंडक मी जास्तींत जास्त पाळीत असतों; त्यामुळें कोणाला कांहीं सांगितलें तरी पडताळून पाहण्याचें साधन लाभत नाहीं, व बातमीदारांना कांहींच न सांगितल्यानें मुत्सद्देगिरीचा लौकिक फुकट पदरीं पडतो.

आणि आजहि वाचक मला विचारतील तर मी एवढेंच सांगूं इच्छितों–व तेंहि गंभीरपणें—तशीच महत्त्वाची चर्चा झाली! व त्याच महत्त्वासाठीं न सांगितलेली बरी. घरीं परत आल्यानंतर कांहीं पुणेरी पाहुणे होते, — त्यांनीं खोदून खोदून विचारलें. त्यांनाहि असेंच सांगितलें व म्हणालों, " आजपर्यंत मोठमोठे रावसाहेब व रावबहादुर पार्टीच्या गप्पा मारीत होते. मोठमोठे पुढारीहि आपण व्हाइसरॉयशीं बोललों असें सांगत असत. त्यांना व इतरांनाहि आतां मी सांगू शकेन कीं,–" म्हटलं, साहेब माझ्याशींहि बोलला!"

• • •

## १३ : ईद का चांद!

पगार समितीच्या अहवालावर सही करून आम्हीं आठ जणांनीं त्या दिवशीं आपलें नांव अजरामर केलें होतें. निदान तसा प्रयत्न तरी खास केला होता. गेल्या शंभर वर्षांच्या कारकीर्दींत सरकारी नोकरांचें वेतन काय असावें यासंबंधीं शास्त्रोक्त असा विचार यापूर्वी कधींच झाला नव्हता. आणि गेले दहा महिने अहोरात्र हें काम करून कंटाळून गेलों होतों. शेंकडों निवेदनें,—याशिवाय या कालांत दुसरीकडे लक्ष देण्यास सवड नव्हती. 'बढती बहाली', 'वेतनकाट', 'वेतनवृद्धि', 'सीनियॉरिटी', 'निवड', 'लायकी', 'वशिला', इत्यादि शब्दांनीं भंडावून सोडलें होतें. झोपेंतसुद्धां कोणाचें स्केल किती ठरवावें असा वाद सुरू झाला होता. फार पत्ते खेळणारा झोपेंत तत्संबंधीं बरळतो, तसेंच थोडेंसें झालें होतें. पण आज मी अगदीं खूष होतों. कारण या सगळ्या किचकट व कंटाळवाण्या कामांतून मी मोकळा झालों होतों. यासंबंधींचीं सर्व कागदपत्रें पोत्यांत बांधून नजरेला न पडतील इतका त्यांचा बंदोबस्त करून टाकला होता. ही एक मण सात शेरांची रद्दी जर विकली, तर एका सबंध उन्हाळ्याचें कोल्ड्रिंक बाहेर पडेल यांत शंका नाहीं. आणि तसें म्हणाल तर आमच्यापैकीं एका "कष्टाळू" सभासदानें दिल्ली सोडण्यापूर्वी हें सर्व ज्ञानभांडार रद्दी म्हणून विकून टाकण्याचें श्रेयहि संपादन केलें होतें. मी मात्र एक मण सात शेरांचें ओझें पुण्याला नेण्याचें ठरविलें होतें. तथापि माझ्या मनावरील ओझें दूर होऊन, शेवटला पेपर संपल्यावर विद्यार्थ्याला जसें वाटतें,—तसेंच मला वाटत होतें. आतां दररोज साडेदहा वाजल्यापासून सेक्रेटरियटमध्यें जावयास नको हा विचार मनांत येऊन माझें मन उल्हसित झालें होतें. आणि आज सहल करण्याचें ठरवून बाहेर पडण्याचा निश्चय केला होता.

जेव्हां जेव्हां करमेनासें होतें, जेव्हां जेव्हां मन अति दुःखित होतें, व जेव्हां जेव्हां मन आनंदित होतें,—या व असल्या सर्व प्रसंगीं दुःख दूर करणारा, आनंद द्विगुणित करणारा माझा साथी म्हणजे चहाचा पेला होय. यामुळें

पहाडी नोकराला मृदु भाषेंत चहा करण्यास सांगून मी बाहेर जाण्यास तयार झालों. पण बाहेर पाहिलें तों त्याच वेळीं आकाशांत ढग जमूं लागले होते! वास्तविक हा मोसम पावसाचा नव्हता. तथापि दिल्लीच्या वातावरणांत राजकीय व अन्य कोणत्या वेळीं काय होईल याचा भरंवसा राहिला नव्हता. –आणि कोणता पुढारी काय 'पोझिशन' घेईल हें तर ब्रह्मदेवहि सांगूं शकला नसता. तसें म्हटलें तर चालू संवत्सर 'विलंबीनाम'. आणि गेल्या वर्षभर कोठली गोष्ट वेळेवर झाली? आतां तरी कोणती गोष्ट वेळेवर होत आहे? आतांपर्यंतचे सर्व आडाखे व सर्व प्रथा उलट्या सुलट्या झाल्याचें दिसून आलेंच कीं नाहीं? हिंदुस्थानचे खंड पाडा म्हणणारा अखंडत्वाच्या अश्वावर आरूढ झालेला श्याम फाळणीच्या दिग्विजयासाठीं बाहेर पडलाच ना? मला असें वाटतें, पुढील संवत्सर "विकारीनाम" आहे; आणि जणूं काय मनुष्याच्या मनाचें प्रतिबिंबच आकाशांत उमटलेलें होतें. गडगडण्यासहि सुरुवात झाली होती. वाराहि वाहूं लागला होता. तात्पर्य, फिरायला न जाण्यासाठीं सर्व कारणें पुढें उभीं होतीं. मीं फिरायला जाण्याचा निश्चयच केला होता; आणि त्याप्रमाणें 'घराबाहेर' पाऊल टाकलें!

लक्ष्मण नको नको म्हणत होता. पण आमच्या "लक्ष्मणा"नें म्हणजे केशवरावांनीं (जेध्यांनीं) येण्याचें कबूल केलें, व आम्ही चालूं लागलों. आज आम्ही कांहीं नाहीं तरी तासभर हिंडण्याचा निश्चय केला होता. मधून मधून जरी विजा चमकत होत्या, व आमचे सन्मित्र परत जाण्याचा सल्ला देत होते, तरी 'न निश्चितार्थात् विरमन्ति धीराः' या न्यायानें मीं पुढेंच चाललों होतों. बिचाऱ्या केशवरावांना केवळ मैत्रीखातर मजबरोबर यावें लागत होतें. थोड्याच वेळांत आम्हीं इंडिया कॉफी हाउसजवळ आलों. मार्गांत देवालय लागलें असतां ज्याप्रमाणें भक्त निदान वंदन केल्याशिवाय पुढें जात नाहीं, त्याचप्रमाणें मीहि सुंदर उपाहारगृह रस्त्यांत असतांना तें टाळून जाण्याची 'अविवेकता' दाखवीत नाहीं. इंडिया कॉफी हाउस म्हणजे दिल्लींतील मुसलमानांची मक्का व हिंदूंची काशी आहे. या कॉफी हाउसमध्यें लढाईच्या काळांत दररोज संध्याकाळीं जवळ जवळ आन्तरराष्ट्रीय संमेलनच भरत असे. दिल्लीस या नाहीं त्या निमित्तानें आलेले सैनिक व अधिकारी, राजदूत व साहित्यिक, व्यापारी व उद्योगपति,

विक्रेते व बातमीदार — हे सर्व सायंकाळीं हटकून येथे सांपडायचेच. युद्धोत्तर कालांतील गर्दी निःसंशय कमी झाली असली तरी अन्य प्रकारचा लौकिक अद्याप कायम आहे. दिवसभर हेलपाटे घालून कोठेंच कांहीं बातमी न मिळाल्यास बातमीदारांना संध्याकाळच्या वेळीं या ठिकाणीं बसून तयार बातमी मिळूं शकते. न घडलेल्या गोष्टी, न झालेल्या नेमणुका, न दिलेल्या मुलाखती, या सर्वांचें उत्पत्तिस्थान हें कॉफी-गृह आहे. सर्व सामाजिक लफडीं चित्ताकर्षक भाषेंत येथें कुजबुजलीं जातात. दिल्लींतील समाजांतील उत्कृष्ट भाग ( Cream of the society ) या ठिकाणीं तुम्हांला क्रीम — कॉफी घेतांना आढळेल. प्रेमी जनांचें संकेतस्थान म्हणून, राजदूतांचें गुप्त बातम्या मिळविण्याचें स्थान म्हणून या गृहाची प्रसिद्धि आहे. ज्याचा जसा दृष्टिकोन तसें दृश्य त्याला येथें दिसतें. आणि गेल्या दीड वर्षांत अनेक वेळां येथील एखाद्या टेबलाजवळ बसून समाजाचें अंतरंग पाहण्याचे अनेक प्रसंग मीं अनुभविले आहेत. हंगामी सरकार येण्यापूर्वी पुढाऱ्यांची निंदा मीं तेथेंच ऐकली. तात्पर्य, ज्यानें दिल्लीला जाऊन या कॉफी हाउसमध्यें आपली संध्याकाळ घालविली नाहीं अशा माणसाचें जीवन वृथागत असेंच मी म्हणेन.

एवंगुणविशिष्ट कॉफीगृहांत आम्ही येऊन दाखल झालों. जें गर्जेल तें पडणार नाहीं, या भरंवशानें प्रवेश केला असतांना गरजलेलें फार जोरानें पडूं लागलें होतें. आम्ही आंत गेलों व थंड कॉफी घेतली. वास्तविक आम्हा खेडवळांचा अनुभव कॉफी म्हणजे गरम पेय. तथापि दिल्लीस कॉफी म्हणजे थंड असा अनुभव आला होता. आणि आजच्या या विचित्र युगाला साजेसें तें होतें. कारण ज्याच्यामागें कोणी नाहीं तो पुढारी, व जो श्रद्धेनें जीव पणाला लावतो तो ढोंगी, असा हा आजचा काल आहे. आम्ही कॉफी पीत होतों, आणि आंत कॉफीगृहांत — बाहेर ज्याप्रमाणें सरी येत होत्या त्याप्रमाणें स्त्री—पुरुषांच्या लाटा प्रवेश करीत होत्या. बाहेर वीज कडाडत होती, वाऱ्यानें धुमाकूळ घातला होता, पाऊस तर हातापुढें काय आहे हें दिसूं देत नव्हता. आम्ही अधिक काळ तेथें बसलों असतों तरी व्यवस्थापकानें जा असें सांगितलें नसतें. आणखी दोन—चार कॉफीचे पेले मागितले असते तर व्यवस्थापकाला जा म्हणण्याची छातीच झाली

नसती. पण सर्वांना सामाजिक न्याय मिळावा या दृष्टीनें आम्ही दोघे उठलों. पण खरें सांगावयाचें म्हणजे—शेजारीं उभ्या असलेल्या आणि गर्दीत उभ्या असलेल्या स्त्रियांना जागा करून देण्याचें मनांत आलें होतें. स्त्रीदाक्षिण्यानें संरक्षण व सोय यांवर आपला प्रभाव टाकला होता. दार उघडून आम्ही कॉफी-गृहाच्या बाहेर आलों तों व्हरांड्यांतील वस्तूंची दाणादाण झालेली दिसत होती. पाऊस सारखा आंत येत होता, तथापि पुढें जरी आम्ही जाऊं शकलों नाहीं, तरी मागें वळण्यास आमचें मराठी मन तयार होईना;– आणि अगदीं याच क्षणीं आमचा मराठ्यांचा स्वाभाविक गनिमी कावा मनांत आला, व आम्ही दोघे बाजूला असलेल्या जिन्याच्या पायऱ्यांवर उभे राहिलों.

तथापि तेथपर्यंतहि पावसानें आमचा पाठलाग केला. दोनतीन पायऱ्या आणखी वर चढलों व उभे राहिलों. क्षणामागें क्षण जाऊं लागले. पावसाचा कमी होण्याचा रंग दिसेना. आम्ही आमच्या पायावर जरी उभे होतों, व पंढरीचा विठ्ठल जरी आमचें राष्ट्रदैवत असलें, तरी युगेंच्या युगें त्या पायरीवर राहण्यास आम्ही तयार नव्हतों. यामुळें भूमिजनांप्रमाणें (Sons of the Soil) कचऱ्यानें आच्छादित असलेल्या जिन्याच्या पायऱ्यांवर कामगार रुबाबांत आम्हीं बैठक मारली! दोन तीन मिनिटांत जिन्याच्या वरील बाजूनें सुंदर बंगाली पोषाख केलेला एक सद्गृहस्थ वरून आला व म्हणाला, "आपण वर येऊन बसा कीं." वर "शारदाउकील" कलामंदिर होतें हें मला माहीत होतें. त्याच्या भाषणांत विनम्रता होती. आवाजांत अगत्य होतें. तथापि कलामंदिरांत आम्ही जाणें काव्यांत काफिरानें जाण्याप्रमाणें मला वाटत होतें; म्हणून मी त्याला म्हणालों, "We are loafers and representatives of loafers in the Constitutent Assembly. We are better of here. आम्हीं भुक्कड आहोंत, आणि भुक्कडांचें घटना समितींतील प्रतिनिधि आहोंत. आम्ही येथेंच बरे आहोंत." माझ्या साथीदाराला काय वाटलें मला सांगतां येत नाहीं, पण बंगाली सद्गृहस्थ मात्र अधिक अदबीनें व अजीजीनें आग्रह करूं लागला. आणि जेव्हां तो वारंवार आग्रह करूं लागला, तेव्हां आमच्यांतील अभिजात संस्कृति जागृत झाली, व त्याच्या मागोमाग जिना चढून क्षणभरांत आम्हीं त्या कलामंदिरांत प्रवेश केला.

विजा चमकत होत्या, पण या मंदिरांत त्या दिसत नव्हत्या. मेघ गडगडत होते, पण तेथें त्यांचा नाद ऐकूं येत नव्हता. वर्षाधारा चालू होत्या, पण येथें त्यांना प्रवेश नव्हता. किंबहुना बाह्य सृष्टीनें आपलें सर्व उग्र स्वरूप कलामंदिराच्या बाहेर ठेवलें होतें. दृष्टीसमोर सर्वत्र चित्रें दिसत होतीं, व त्या चित्रांतील कलेनें प्रसन्न होऊन– क्षणभर सृष्टींतील सर्व मंगल तेथेंच उपस्थित झालें आहे असेंच भासत होतें. शान्तता जगांतील बखेड्यांना कंटाळून या कलामंदिराच्या आश्रयाला आली होती असें वाटत होतें. समाधानानें हें आपलें खास क्षेत्र निवडलें आहे असें दिसलें. एक पाऊल पुढें गेलों, तों थोड्या उंच अशा मंचकावर खांबाला हात लावून एक युवक उभा होता. प्रथम तर मला तो निर्जीव चित्राप्रमाणें भासला; पण किंचित् पुढें गेल्यावर तें चित्र नसून क्षणक्षणाला चंद्रकलेप्रमाणें वृद्धिंगत होणाऱ्या नवतारुण्याचा आदर्शच आहे असें पटलें. त्याची ती भुरभुर उडणारी शिखा फिरंग्याच्या सर्वव्यापक व सर्वभक्षक संस्कृतीवर मात करून राहिलेल्या हिंदुत्वाची विजयपताका होती. बालवयाची मर्यादा ओलांडून तारुण्याच्या प्रथमावस्थेंत प्रवेश करणारा हा युवक चित्रासाठीं मॉडेल म्हणून आणण्यांत आला होता असें समजलें. त्याच्यापासून थोड्या अंतरावर तीन चित्रकार त्याचें तें जिवंत व भावयुक्त जीवन निर्जीव कागदावर चित्रित करण्यांत गुंतले होते. कंबरेला नेसलेलें वस्त्र गुडघ्यापर्यंतच असल्यानें हिंदुस्थानचें दारिद्र्य त्यांतून टाहो फोडीत होतें. ज्या रुबाबांत हा युवक उभा होता तो पाहिल्याबरोबर, भवभूतीनें उत्तररामचरितांत लव आणि कुश यांचें जें वर्णन केलें आहे त्याची आठवण झाली. पायाखालीं असलेल्या पंचाला ज्या लीलेनें व सहजतेनेंहि पायाखालीं ठेवलें होतें, त्यावरून त्याचा आत्मविश्वास प्रतीत होत होता. पायाखालीं अतीत घालून, हातानें विद्यमान धरून, दृष्टि भविष्याकडे लावून, व तिन्ही गोष्टींत प्रमाणबद्धता साधून उभ्या राहिलेल्या ह्या युवकाच्या स्वरूपांत नवभारतांतील विजिगीषा सदेह येथें उभी आहे असें वाटत होतें. शरीराच्या सुदृढतेमुळें निःसंशय तो किसान मजदूर राज्याचा भावी प्रतिनिधि आहे असेंच मला वाटलें. कॉलेजयुवक तो खास नव्हता. कारण त्यांची निशाणी– छातीचा कोनाडा तेथें अभावानें तळपत होता. त्याची खांबाची पकड प्रयत्नाची कांस त्यानें घेतली आहे हें दर्शवीत होती. त्याच्या दृष्टींत महत्त्वाकांक्षा नाचत होती. किंचित् कललेल्या हनुवटी-

वरून कृतनिश्चयानें जीवनांत ठाण मांडलें आहे असें दिसत होतें. मानेचा कल यत्किंचित्सुद्धां मागें नव्हता. याचा अर्थ जुने वाद, निर्मूल्य तत्त्वें, गत निराशा याला त्यानें मागें टाकलें होतें. त्याचें क्षेत्र भविष्य होतें. मी विचार करूं लागलों कीं याचें चित्रण करणाऱ्याच्या मनांत काय कल्पना असतील ? तिघांहि चित्रकारांनीं अर्थात् कागदावर बाह्यतः (Objectively) सारखेंच काढलें असेल. पण चित्राला चैतन्य देणारी प्रत्येकाची भावना कशी असेल ? हा सर्जनवाद विधायक कर्तृत्वाचा आदर्श, आपल्या हस्तस्पर्शानें निरुपयोगी वस्तूंना उपयुक्तता देणारा, कर्तृत्ववान् कामगार, निव्वळ भावनामय जीवनांत आनंद मानणारा, समाजांत राहून समाजापासून दूर असणारा – असा कोण यानें कल्पिला असेल हें जाणण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाली. क्षणाक्षणाला तिन्ही चित्रकार त्याच्याकडे पहात व आपल्या फलकावर ठेवलेल्या कागदावर कांहीं ना कांहीं चित्रित करीत. असें चालूच होतें. आणि खरोखरच क्षणाक्षणाला नवता उत्पन्न करणारें रमणीयतेचें तें यथार्थ स्वरूप होतें. किती वेळ मलासुद्धां त्याच्याकडे पहावेंसें वाटे. आणि क्षणभर आपणहि कागद पेन्सिल घेऊन हें क्षणिक दृश्य युगासाठीं चित्रित करावें अशी महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली. तथापि स्वतःच्या कर्तृत्वाची रास्त जाणीव मी नेहमीं बाळगत असल्यानें हा विचार बाजूला सारला; पण त्याकडे पुनः पुनः पाहून त्या दृश्यांतून जेवढा आनंद लुटतां येईल तेवढा – अंगजात मराठी हावरेपणानें मीं लुटला.

तितक्यांत सहजच माझी दृष्टि उजव्या बाजूला गेली, – आणि एकदम स्थित्यंतर व्हावें तसें झालें ! तें चित्र होतें. आणि खरोखर तें चित्रच होतें. मी अधिक जवळ गेलों; तथापि अति निकट गेलों नाहीं. अतिपरिचयानें ज्याप्रमाणें अवज्ञा होते, तद्वत् अतिसान्निध्यानें कलेंतील आनंद नाहींसा होतो; म्हणून इतक्या अंतरावरून मी तें पाहूं लागलों कीं, चित्राचें यथार्थत्व लक्षांत यावें, व त्यांतील आनंद जास्तींत जास्त मिळावा. ज्याप्रमाणें जीवनांत विवेकरेषा ही ध्येय व प्रत्यक्ष यांचा सांधा जोडते, तद्वत् मीं केलें. कलामर्मज्ञ मी नाहीं, किंवा – अशा तऱ्हेच्या कलामंदिरांत प्रवेश करण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग होता. ज्या मानसिक परिस्थितींत मीं तेथें प्रवेश केला त्यामुळें म्हणा,– माझ्या रसिकतेला वाव मिळाला होता असें म्हटलें तरी चालेल. चित्रामध्यें अत्यंत वृद्ध मुसलमान गृहस्थ चित्रित

केला होता. पाठींत वांकलेला असल्यानें वयाचें मोठें ओझें त्याच्या डोक्यावर होतें हें उघड होतें. कमरेच्या वस्त्राशिवाय व डोक्यावरील फाटक्या फेट्याशिवाय अन्य वस्त्र त्याच्या अंगावर नव्हतें. त्याची ती शुभ्र दाढी 'कृतान्तकटकामलध्वज जरा'प्रमाणें भासत होती. शेजारीं दोन तीन मोडकीं भांडीं पडलेलीं दिसत होतीं. जरा पलीकडे थडगें चित्रित केलें होतें. वृद्ध गृहस्थाच्या शेजारीं सुमारें सात आठ वर्षांची बालिका त्याच्या कानाजवळ जाऊन बोलत होती असें दाखविलें होतें; आणि दूर आकाशांत चंद्रकला ढगांतून बाहेर आलेली दिसत होती. किंचित् उल्हासाची छटा वृद्धाच्या चेहऱ्यावर विराजमान झाली होती. वांकून जमिनीकडे पाहणारे त्याचे डोळे मान वर केल्यानें कांहीं तरी दिसेल या आशेनें प्रेरित झालेले दिसत होते. खालीं वांकून काय शोधत होता तो ? आणि आतां मान किंचित् वर करून काय शोधणार होता ? संस्कृत सुभाषितकारानें म्हटल्याप्रमाणें निसटलेलीं तारुण्यमौक्तिकें तो शोधत होता का ? आणि तीं त्याला कशीं मिळणार ? गेलेले क्षण आजपर्यंत कोणाला मिळाले आहेत ? पण तो खरोखरच शोधत होता का ? मी अधिक चिकित्सेनें त्याकडे पाहूं लागलों, तों मला आढळून आलें कीं, तो अंध होता. त्याला डोळे होते, पण दृष्टि नव्हती. उघड उघड त्याला दीर्घ आयुष्य लाभलेलें दिसत होतें. या दीर्घ अनुभवानें मिळालेली प्रज्ञेची दृष्टि त्याला होती का ? आणि शेजारचें थडगें हेंच दाखवीत नव्हतें का ? उर्वरित आयुष्य तो कशासाठीं व्यतीत करीत होता ? जगण्यासाठीं कांहीं आहे असेंच त्याला वाटत असेल का ? आणि आपल्या नातीनें कानांत सांगितल्यानंतर ज्या उत्सुकतेनें त्यानें आकाशाकडे मान वळवली होती हें तरी कशाचें द्योतक होतें ? पृथ्वीवरील स्मशानवत् असलेल्या परिस्थितींत आकाशांतील उगवती चंद्रकला पाहण्यानें—अर्थात् मनानेंच तो पहात होता—त्याच्या जीवनांत काय स्थित्यंतर झालें असेल ? पृथ्वीवरील सर्व सृष्टि ही त्याच्या कर्तृत्वाची अगर त्याच्या कुकर्तृत्वाची साक्ष होती. पण आकाशांतील चंद्रकोर ही त्याची संपत्ति कशी ?

आणि हे व असे विचार माझ्या मनांत चालू असतांच देशांतील राजकीय बातमी असणारें संध्याकाळचें वृत्तपत्र कलामंदिरांत फेकलेलें पाहिलें. तो वृद्ध मुसलमान, तें थडगें, त्याची दृष्टिहीनता, ती चंद्रकोर—या सर्वांनीं माझ्यासमोर राजकीय चित्र उभें केलें. जेथें विवेकाची दृष्टि खलास झाली

आहे, संपत्ति नाममात्र आहे, व सर्व मानवी महत्त्वाकांक्षा कब्रस्थ झाल्या आहेत, प्रयत्नाला वार्धक्य आलें आहे,—पण आकाशांत चंद्रकला उगवत आहे, आणि तीहि कला आहे,-खरोखरच हिंदी मुसलमानांना ह्या चित्राचा असा अर्थ आहे,-हें असलें विकल पाकिस्तान मिळणार आहे असें सांगितलें तर काय वाटेल? येणार येणार म्हणून अपेक्षिलेलें हें असें अनपेक्षितच निघणार का? आणि एका उर्दू कवीनें म्हटल्याप्रमाणें प्रयत्नांचा शेवट "न साकी है, न जाम है, न मैफ़िल है" असाच होणार का? आणि जर तो तसाच होणार असेल तर ही कोणाची करामत? पण हे विचार क्षणमात्र होते; कारण अंवतींभोंवतीं सर्व उत्कट वातावरण असल्यानें असले विचार तेथें पायच धरीनात. या 'ईदच्या चांद'कडे व पलीकडील युवकाकडे आळीपाळीनें पहात कांहीं क्षण तसाच उभा राहिलों. स्वप्न आणि सत्य यांच्या दरम्यान जणूं कांहीं मी उभा होतों. आणि कला म्हणजे या दोन्हींचा समन्वय नव्हे का? हे थोडे क्षण अतीव पण निरपेक्ष आनंदाचे असेच होते. जवळ जवळ त्या वातावरणाशीं मी तन्मय झालों होतों. जें पाहिलें तें वर्णनातीत होतें. तथापि बंगाली सज्जनानें मजपुढें शेरे-बुक हजर केलें, आणि मोठा पेंचप्रसंग निर्माण केला. प्रसंगानें ज्ञान येतें म्हणतात. मी-"पार्थिव वस्तूंतून उत्कट व उदात्त भाव मानवी मनांत निर्माण करणें म्हणजे कला,-आणि ती येथें आहे." असें लिहिलें, आणि हें वाक्य लिहिल्यानंतर क्रौंच-मिथुनाचा वध पाहिल्यावर वाल्मीकि-मुखांतून जसें आद्य काव्य प्रसवलें, तद्वत् हा प्रसंग मला वाटला!! आणि या अहंकारी आनंदांत मी व आमचे मित्र खालीं आलों. बाहेर चमकत होतें, पण गडगडत नव्हतें. वारा होता, पण मंजुळ; आणि पाऊसहि नाममात्र राहिला होता. पुन्हा आम्ही या सृष्टींत आलों होतों. मी आमच्या मित्रांना म्हणालों, "पहा, आपण फिरायला निघालों म्हणून हा आनंद आपल्याला मिळाला."

आमच्या मित्रानें उत्तर दिलें, "-आणि भिजण्याचें दुःखहि."

—हाय रसिकता!!

• • •

इतिहास म्हणजे सर्वच गोष्टी मोठ्या व महत्त्वाच्या असतात असें नाहीं. अगर सर्व मोठ्या व महत्त्वाच्या गोष्टी तशाच महत्त्वाच्या परिस्थितींत उत्पन्न होतात असेंहि नाहीं. क्षुल्लक गोष्टींतून सुरुवात होऊन तिचा व्याप व विस्तार वाढत जातो. पुष्कळ वेळां अपेक्षित घडतें, तर पुष्कळ वेळां अनपेक्षित व अकल्पित पण घडतें. व्यवहारांतील प्रत्येक गोष्ट आगाऊ ठरवून होत नाहीं. अगदीं पट्टीचा वक्तासुद्धां ठरवून बोलत नाहीं. नदीच्या पात्राप्रमाणें अडखळत, प्रसंगीं अडचणी ओलांडून अगर वळसा घालून मनुष्य वागतो. बोलतो. सर्व जगांत पदोपदीं येणारा हा अनुभव आगगाडीच्या स्टेशनाप्रमाणें आगाऊ माहीत नसतो. नदी आपलें पात्र बनवीत जाते, शोधीत जाते. तिच्या प्रवाहाची गति व खोली तिच्या प्रवासांतील लहान मोठ्या अडचणी व अडथळे यांनीं सिद्ध केली जाते. आणि मानवी जीवनांतील अनुभवहि असाच आहे. लहान–मोठ्या घटना मानवी मनाला आकार देत असतात. अनुभव हें केवळ वैयक्तिक तंत्र आहे. अनुभव ज्याचा त्यानेंच घ्यावा लागतो. दुसऱ्यानें कितीहि सांगितलें तरी ज्याची चूक तोच करीत असतो, व म्हणून त्याला आलेला अनुभव अगदीं १०० टक्के 'स्वदेशी' असतो, एवढेंच नव्हे तर संपूर्ण खादीप्रमाणें 'हातथी कांतेलो – हातथी भुनेलो' असाच असतो. अंगावरचे कपडे शिंपी बेततो व शिवतो; पण मनाची बाराबंदी ही ज्याची त्याची स्वकष्टार्जित संपत्ति असते. त्याचीच ती कला असते; त्यांतील कसब त्याचेंच असल्यामुळें साहजिक अहंकार उत्पन्न करीत असतें. कोळी ज्याप्रमाणें जाळें निर्माण करतो, अगदीं त्याचप्रमाणें मनुष्य आपल्या मानसिक सृष्टींत स्वतःच्या समजुतीप्रमाणें प्रत्येक गोष्ट प्रमाणबद्ध करीत आहे असें समजतो. आपला वैयक्तिक अहंभाव अनेक वेळां सामाजिक समजून त्याला व्यापकता आणण्याचा प्रयत्न करतो. अनुभवानें त्याच्या मनाला दिलेला आकार विरुद्ध अनुभवानें तिरडीपर्यंत त्याच्या जीवनाला संकल्पित करीत असतो, सिद्ध करीत असतो. त्याच्या जीवनांतील अनेक

सिद्धान्ताचीं प्राथमिक प्रमेयें जर त्यानें तपासलीं तर तीं संकुचित असलेलीं त्याला आढळून येतील. पण किंचित् अनुभव, बराच आत्मविश्वास, व प्रसरणशील अहंकार – या तिन्हींच्या जोरावर तो वागत असतो. आधुनिक सेनानी सैन्य, आरमार व विमानें या तिन्ही शक्तींचें संकलन करून यशाच्या किनाऱ्यावर उतरतो. आणि जर कुठें तरी संकलनांत चुकलें तर सर्वनाशाशीं त्याला मुकाबला करावा लागतो. आणि अगदीं ज्या अनुभवाच्या जोरावर आत्मविश्वासाची मांड थाटून अहंकार कर्तृत्वाची झेंप घेत असतो, तोच जर खोटा ठरला, फसवा ठरला, तर त्या व्यक्तीला धरणीकंपाचा धक्का बसल्या-प्रमाणें वाटल्यास नवल नाहीं.

आणि असल्या दिव्यांतून जाण्याचा नुकताच आलेला अनुभव मी अगदीं विश्रब्ध मनानें सांगत आहें.

१९१४ सालीं बडोदा कॉलेजमध्यें असतांना वडील माळव्यांत असल्यामुळें मला सुटींत तिकडे जाण्याचा प्रसंग येई. कॉलेजमध्यें जे दाक्षिणी विद्यार्थी होते त्यांत अनेक कारणांमुळें मी 'प्रसिद्ध' होतों. आणि अगदीं खरें कारण सांगावयाचें म्हणजे क्षुल्लक गोष्टीवरून मारामारीला तयार असणारा मी एकटाच 'महापुरुष' होतों. गुजराती विद्यार्थी – मला वाटे मला भीत. त्यांतील कांहीं मित्रवत् वागत. कांहीं माझ्या 'वक्तृवा'चें (?) कौतुक करीत. कांहीं आपलीं वैयक्तिक दुःखें सर्व विद्यार्थ्यांचीं आहेत असें भासवून दक्षिणी मंडळींच्या सार्वजनिक हितबुद्धीला गोंजारीत. जी दाक्षिणी मंडळी स्थानिक होती ती क्वचितच बनत; पण असल्या संकटांत पटकन् उडी टाकण्यांत अगदीं बाजी देशपांड्याप्रमाणें मी तयार असें. बाजीचें धड लढत होतें, पण माझें मात्र डोकें ठिकाणावर असून तें नसल्याप्रमाणें मी वागतों अशी टीका मराठी मंडळींत होई. मला व्यवहार कळत नाहीं, हा आरोप तेव्हांपासूनचा आहे, व तेव्हांपासून मी तो नाकारीत असें. आणि तें नाकारण्याचें कारणहि तसेंच जबरदस्त होतें. गुजराती म्हणजे व्यवहारांत दक्ष, व्यापारांत हुशार, कोणालाहि हार न जाणारा हा त्याचा लौकिक साबरमतीच्या पाण्याइतका प्राचीन आहे. गुजराथला कोणींहि जिंकावें,– व गुजराथ्यानें कोणालाहि बनवावें, हा सिद्धान्त मानला जातो. सत्ता देऊन अगर दिल्यासारखी करून संपत्ति हस्तगत करावी हा सौदा त्यांना कधींच महाग पडला नाहीं.

व्यापारांत अगर व्यवहारांत त्यांनीं कोणालाहि मात करूं दिली नाहीं, देत नाहींत, असें मानलें जातें. पण मीं मात्र मनांत ३३ वर्षें निराळ्या विश्वासानें माझ्या जीवनाला थोडा कां होईना आकार दिला होता. मानसिक पिंड घडण्यांत त्या विश्वासाचा एक मोठा भाग होता. प्रेरणा आणि प्रसन्नता या दोन शक्ति मनुष्याच्या जीवनांतील आक्रमक व संरक्षक क्रिया करणाऱ्या समजल्या जातात. क्षुल्लक गोष्टींतून प्रेरणा होते, व मनुष्याचें मन चालूं लागतें; आणि मनानें गतिप्रवणता दाखविली कीं प्रयत्नांचें पाऊल पुढें पुढें सरकत जातें. मिळालेलें अगर मानलेलें यश मनाला प्रसन्नता देतें, झालेली प्रगति पक्की करतें, तिला स्थायी जीवनांत कायम करतें. कॉलेजमधील वसतिगृहांत आलेल्या अनुभवानें मनाला शिलेदारी वळण दिलें होतें. पण व्यवहारांतसुद्धां आपण पक्के आहोंत हा अनुभव अगर तज्जन्य अहंकार अद्याप आला नव्हता; व पुष्कळ वेळां मन मागें वळून बघे, तेव्हां आपणास कुणीं बनविलें नाहीं ना अशी शंका येई. पण गोध्र्याला घडलेली घटना झाल्यानंतर हत्याराच्या तीक्ष्णतेबद्दल शिकार मारल्यानंतर जसा शिकाऱ्याच्या मनांत विश्वास उत्पन्न होतो,—तसेंच माझें झालें. शंका दूर झाली. विश्वास तेथें प्रातिष्ठित झाला.

आणि गोध्र्याला घडलें तें असें.—सुट्टीनिमित्त बडोद्याहून नीमचला जाण्यासाठीं रेल्वेनें जात होतों. गोध्रा जंक्शनला गाडी उभी होती. वास्तविक १९१४ चा तो काल होता. आणि आतांएवढा चहाबाज मी तेव्हां नव्हतों. अल्लामियांचा अनुयायी दिवसांतून पांच वेळां नमाज पढतो; पण मी मात्र पोटाची चहापूजा त्याहून अधिक वेळां करून 'अन्न हें ब्रह्म आहे' याचा पुरावा नित्य देत असतों; व हिंदु संस्कृति श्रेष्ठ आहे होंहि त्याबरोबर शाबीत करीत असतों !! पण त्या वेळच्या देशभक्तीच्या कल्पनेप्रमाणें १०० टक्के जरी मी देशभक्त नव्हतों, तरी बराच नंबर वर येण्याइतकी पात्रता माझ्या अंगांत खास होती. मधून मधून लोकाग्रहास्तव चहा घेई. तात्पर्य, चहा त्या वेळीं वावडा नव्हता. आणि जेव्हां प्लॅटफॉर्मावर चहाविक्यानें 'मसालेदार, टेस्टदार चहा' म्हणून जवळ येऊन घोषणा केली, त्या वेळीं उत्पन्न झालेलें प्रलोभन बाजूला सारणें कठीण झालें. त्याचा पोषाख तिरस्करणीय होता, पण देत असलेलें पेय अनुपमेय होय. गवई जसा आरोह व अवरोह करून तान वर–खालीं करीत असतो, व

स्वराच्या गतीबरोबर सुसंगति ठेवण्यासाठीं हात व मान खालींवर करीत असतो, तसेंच त्या चहाविक्यानें 'पवाल्यां'त चहा ओततांना किटली बरखालीं केली, व मानहि खालींवर करून 'भरलेला प्याला' त्यानें मजपुढें केला. मला पाहिजे असें मीं म्हटलें नव्हतें. तथापि 'विक्रीचीं सूत्रें' पाठ न करतां उपजतच तीं त्याला समजत होतीं असें दिसलें. कारण डोळ्यांतील उत्सुकता पाहून ओंठावरील लालसा लक्षांत घेऊन हें गिऱ्हाईक पटेल असेंच त्याला वाटत असल्यामुळें त्यानें प्याला पुढें केला,–आणि मीं तो घेतला. क्षणभर त्या प्याल्याकडे पाहिलें, त्यांतील दिव्य रसायनाचा थोडा स्वाद घेतला. त्यांत जावा सुमात्रा बेटांत उत्पन्न होणारे सर्व मसाल्याचे पदार्थ होते. गोडींत त्यानें बासुंदीला मारलें होतें. सुंठीच्या वासानें वैद्याला दूर सारलें होतें. तो एक प्याला 'उत्साहवर्धक' होता, पण 'उन्मादकारक' नव्हता. 'उन्हाळ्यांत थंड करणारा व हिंवाळ्यांत गरम करणारा' म्हणून त्याचें वर्णन स्टेशनवरील जाहिरातींत लिहिलेलें खरें वाटण्याजोगें होतें.

मीं खिशांत त्याला पैसे देण्यासाठीं हात घातला; हा खिसा शोध,–तो खिसा शोध,– अगदीं लक्ष्मीधरासारखी स्थिति झाली! तलवार सांपडेना, व जी सांपडली ती गंजलेली. तद्वत् शेवटीं सदऱ्याच्या खिशांत पाकीट सांपडलें, व त्यांतून जें नाणें निघालें तें अधेली. पण एवढ्यांत माझ्यांतील व चहाविक्यांतील अंतर वाढूं लागलें. काल कधींच कोणासाठीं थांबत नाहीं; पण गाडीसुद्धां थांबेना! वास्तविक मानवी जीवनासाठीं केलेली ही सोय होती. तिच्या न थांबण्यानें केवढा इतिहास निर्माण होणार होता हें तिला कसें माहीत असणार!! मीं चहाविक्याला सात आणे दे असें म्हणून अधेली दिली. त्यानेंहि खिसे शोधण्याचें कार्य केलें. गाडीबरोबर तो सात पावलें चालला;—पण सात आणे त्यानें पुढें केले नाहींत! त्याच्या–माझ्यामधील अंतर वाढूं लागलें. माल कधींच उतावीळ नसतो, व गिऱ्हाईकहि सुरुवातीला उतावीळ नव्हतें. पण आतां सात आणे दूरावत चाललेले पाहून मी ओरडून ओरडून पैसे मागूं लागलों,–तर तो ओरडून ओरडून 'पवालो नाखो' म्हणून सांगूं लागला. धांवत्या गाडीबरोबर तो आतां चालेनासा झाला. मोठा पेंचप्रसंग मजपुढें उभा राहिला. अर्धा चहा पिऊन झाला होता, व आठपट किंमत हातांतून निसटली होती. चहासुद्धां 'पवालो' फेकून द्यावा असा शिष्ट विचार मनांत आला.

पण लागलींच ज्या अर्थी शक्य असतां ७ आणे चहाविक्या देत नाहीं, दिले नाहींत, त्या अर्थी तो मला बनवूं पहात आहे अशी शंका मनाला चाटून गेली. झालें, पवालो बाहेर टाकण्याचा विचार बदलला. चहाविक्याच्या धमक्या व शिव्याहि अस्पष्ट ऐकूं येत होत्या. गाडी जोरांत येत होती म्हणून बरें, नाहीं तर मीं उतरून त्याला मराठी कायदा 'दावला' असता!

मिनटा दोन मिनटांत ही सर्व नाट्यमय घटना संपली, कार्य ( Action ) संपलें, विचार ( Reflection ) सुरू झाला. प्रेरणेनें प्रसन्नतेला जागा करून दिली. आतां बाकावर एखाद्या विजयी वीराप्रमाणें रुबाबांत बसून पुढे असलेल्या चहाच्या पेल्याकडे बघूं लागलों. अर्धा चहा व आठपट किंमत घेऊन मला सोळा आणे बनविणाऱ्या गुजराथी चहा-विक्याला आज मीं नेस्तनाबूद केलें होतें. राहिलेला चहा अधिक व खरोखरच 'टेस्टदार', 'मसालेदार' लागत होता. जिव्हेप्रमाणें मनालाहि तो गोड लागत होता. शिकाऱ्यापुढें गोळी खाऊन खतम् झालेला वाघ पडावा, व त्याकडे ज्या दृष्टीनें शिकारी पाहतो त्या दृष्टीनें मी पेल्याकडे पहात होतों. पेला आतां विजयाची पताका झाला. माझ्या व्यवहारचातुर्याचा पुरावा ठरला. आठ आणे अगर त्याहिपेक्षां अधिक किंमतीचा पवालो हस्तगत करून किमान-पक्षीं चहा तरी मीं फुकटांत मारला होता. आणि हें आर्थिक विवरण जसजसें मनांत घोळूं लागलें तसतसें आपणच काढलेले चित्र चित्रकार जसा पुनः पुनः पाहतो, अगर आपलाच लेख लेखक जसा पुन्हा पुन्हा वाचतो, तद्वत् मिळविलेलें यश व गाजविलेला पराक्रम पुन्हा पुन्हा मनापुढें आणून स्वतःला सुखवीत होतों, व सूक्ष्मपणें अहंकाराला उत्पन्न करीत होतों. शक्तींत आणि युक्तींत मी आतां सव्यसाची झालों असा विश्वास मनांत रुजूं लागला, आणि प्रवासाचा शेवट होण्यापूर्वी या क्षुल्लक घटनेमुळें आयुष्यांतील इतिहासाला एक विवक्षित वळण लावण्याचें कार्य केलें.

आणि ही घटना झाल्यापासून आपल्या व्यवहारदक्षतेबद्दलचा विश्वास गेल्या ३३ वर्षांत कायम राहिला. एवढेंच नव्हे, तर तो व्यापांत व विस्तारांत रुंदावतच गेला. ३३ वर्षांत व्यापार केला नसला, अगर उद्योग-धंदा चालविला नसला, तरी दोन्ही करण्याचें मनांत आणलें तर मी अपात्र आहें असें कधींच वाटलें नाहीं. घरचा हिशेब जरी ठेवला नाहीं, तरी देशाच्या हिशेबांत आपल्याला सर्व कळतेंच असें समजून चालत होतों.

सामान्यजन हें मानीत, व विद्वान् याविरुद्ध कधींच न बोलल्यानें ही गोष्ट आतां निरपेक्षपणें सिद्ध आहे असेंच मी समजत होतों. कांहीं करण्यांत लोकांना क्वचित् अप्रबुद्धपणाचा संभव वाटला, तरी वस्तुस्थिति तशी नसून औदार्याचा तो परिणाम आहे असेंच मी सांगत असें. तात्पर्य, केलेली गोष्ट चूक झाली नसून जाणूनबुजून तो एक प्रयोग होता असें आधुनिक पुढारी-पणाला साजेल असें मी प्रतिपादीं. तात्पर्य, सर्वत्र आत्मविश्वासानें वागत होतों.

पण पक्क्या पायावर रचलेली, अर्थात् माझ्या मतें—ही इमारत आठवड्या-पूर्वीं पत्त्यांच्या किल्ल्याप्रमाणें कोलमडली ! २२ फेब्रुवारीला फडणिसानें अंदाजपत्रक सादर करून भाषण केलें. सभागृहाबाहेर अर्धवट अंधार व अर्धवट उजेड होता. बातमीदारांनीं मोठेपणा देऊन माझें 'मत' विचारलें, व रसवंतीनें 'गरीबांना मीठ मिळालें, तर श्रीमंतांना मरण' असला कौल दिला ! दुसरे दिवशीं वर्तमानपत्रांतून शेअर बाजार झंझावातानें कदलीवन उध्वस्त व्हावें तसा उध्वस्त झाला असें वाचलें ! रसवंती फळाला आली !! सर्व देशभर अंदाजपत्रकावर हाहाःकार उडवून दिला. अनेक लक्ष्मीवंत व उद्योगपति 'चलो दिल्ली' म्हणून येथें आले; आणि अशाच एका घोळक्यांत एका भांडवलवाल्या मित्राच्या घरीं मी सांपडलों होतों. करवाढी-बद्दल ते भांडत होते. मी त्यांत गैर कांहीं नाहीं असें प्रतिपादीत होतों. त्यांतील बहुतेक अहमदाबादचे भांडवलवाले होते; मुरलेले व्यापारी होते. कर चुकविणें हें त्यांना करतलमलवत् वाटत होतें; पण भांडण्याचा आव आणीत होते. मीं म्हटलें, "तुम्हांला चांगला भेटला आहे अर्थमंत्री." एकानें उत्तर दिलें, "मियाभाईला बनवायला काय वेळ लागतो ?" मी म्हणालों, "तो एकटाच नाहीं, त्याच्याशीं सामान्यपणें कॉंग्रेस सहमत आहे; व मीहि सहमत आहें. मला बनविणें एवढें सोपें नाहीं !" ३३ वर्षांत कोणीं बनविलें नाहीं या विश्वासानें मी बोलत होतों. दुसरा म्हणाला, "काकासाहेब, गुजराथी व्यापाऱ्याची तुम्हांला ओळख नाहीं. आम्ही व्यापारी कुठल्याहि परिस्थितींत ऐनजिनसी बुडत नाहीं. कितीहि उंचावरून फेकलें तरी मांजर पायांवर पडतें. तुम्ही बनाल, व्यापाऱ्यापासून सावध !" मी म्हणालों, "जा जा ! गुजराथ्यानें मला बनविण्याचा प्रयत्न केला व स्वतःच बनला !" तिसरा म्हणाला, "अशक्य !" आणि मग अभिमानानें 'पवालो'ची गोष्ट सांगितली, व उत्सुकतेनें आणि विश्वासानें जमलेल्या

मंडळीकडे बघूं लागलों. एवढ्यांत एकानें विचारलें, " १४ सालची गोष्ट का ? " मी म्हणालों, " होय. " " हा ! त्यांत काय झालें ? त्या वेळीं असल्या पवालोची किंमत सुमारें तीन आणे होती. मिस्टर, तुम्हीच ४ आण्याला फसलांत ! " एकदम विजेचा धक्का बसावा तसें झालें. तो पवालो किती तरी वर्षें स्मृतिचिन्ह म्हणून मीं ठेवला होता, तो डोळ्यापुढें आला. आणि जर तो पुढें असता तर खास फोडून टाकला असता ! ३३ वर्षांपूर्वीचा प्रसंग आठवला; आणि वाटूं लागलें, जर खरोखर 'पवालो' आठ आणे किंमतीचा अगर जास्त किंमतीचा असता, तर त्या चहाविक्यानें जीव धोक्यांत घालून गाडीवर उडी मारली असती. खरेंच, घटनेची ही बाजू कशी लक्षांत आली नाहीं म्हणून मनाला हटकलें. आणि पुन्हा त्या चहाविक्याचा चेहरा समोर दिसूं लागला, व त्याच्या ओठावरील हास्याची लकेर मला बनविल्यामुळें उत्पन्न झालेल्या प्रसन्नतेची निशाणी वाटूं लागली. माझ्या अहंकाराला अर्धांगवायूचा झटका बसला. धरणीकंप होऊन पायासकट इमारत पडावी तसें झालें. मन गिरक्या घेऊं लागलें. सेनापति भूमीवर गतप्राण होऊन पडतांच सैन्याची जशी अवस्था व्हावी, तद्वत् मनातील विचार मौलिक श्रद्धा संपतांच सैरावैरा धावूं लागले. हातांतील चहाचा कप – कौरवसैन्य पाहतांच अर्जुनाच्या हातांतील धनुष्याप्रमाणें – गळून पडण्याच्या मार्गाला लागला. काय होतें – व क्षणांत काय झालें ! भरलेलें पीक उध्वस्त झालें. ३३ वर्षांचा इतिहास स्वप्नवत् ठरला. कुणाला ठाऊक, आणखी किती किती सिद्धान्त असेच फसवे नसतील कशावरून ? गण–मात्रायुक्त श्लोक लिहावा, सुंदर म्हणून दाखवावा, व कुणीं तरी विचारावें,– 'याचा अर्थ काय ?' अगदीं असेंच झालें. कोळ्याप्रमाणें जाळें निर्माण केलें, व तें प्रमाणबद्ध मानलें; व आज सर्व रीत चुकली. त्या जाळ्यांत मीच अडकलों अमृताचा 'पवालो' विषाचा ठरला. क्षुद्र घटनेनें इतिहास निर्मिला, व निकामीहि ठरवला. आणि असले कश्मल व कचखाऊ विचार थांबेनात,– एवढ्यांत " साब, आपका टेलिफोन आया है " असें म्हणत माझा पहाडी नोकर तेथें आला, आणि लागलींच कसलेल्या वीराप्रमाणें " हां, आता है—" म्हणून मीं तेथून निसटलों !

• • •

# १५ : एक हजार वर्षांनंतर

"समजलं का ? काय चाललंय !" परिचित व प्रसन्न आवाज कानाला टेलिफोन लावतांच आला. आजच्या काळांत घरांत टेलिफोन असणें म्हणजे गजान्तलक्ष्मी असण्यासारखें आहे. युद्धकाळांत पुरवठा थोडा, मागणी फार या तत्त्वामुळें सामान्यपणें नियंत्रणें जन्माला आलीं, व सप्त चिरंजीवांनंतर हीच चिरंजीव होणार असेंहि दिसत आहे. टेलिफोन असणें म्हणजे ह्या कालांत केवढी सत्ता व संपत्ति मानली जात होती, व अजूनहि तीच स्थिति आहे. आणि जर तो टेलिफोन फुकट मिळाला असेल तर कांहीं विचारूं नका. आणि एकच कां,–पी.ए.चा एक, पी. एस्.चा एक, गुप्त एक, – कीं ज्याचा नंबर फक्त विवक्षित लोकांनाच माहीत असतो,– जसे पूर्वी पंचहजारी सरदार असत, तसेच व त्याच जातीवर आज मी पंच टेलिफोनी मंत्री आहे ! मात्र मला स्वतःलाच यांपैकीं एकाचाहि नंबर निश्चितपणें सांगतां येणार नाहीं. क्षुल्लक गोष्टी लक्षांत ठेवणें हें या उच्च पदाला शोभत नाहीं, अशी माझी ठाम समजूत आहे. तात्पर्य, यांपैकीं एका टेलिफोनवर वरील आवाज आला. त्यापूर्वी थोडा वेळ रेडिओवर जुनागडसंबंधीं अत्यंत महत्त्वाची बातमी लवकरच जाहीर करण्यांत येईल अशी घोषणा झाली. जुनागड हा एक चर्चेचा व काळजीचा विषय जनतेंत व सरकारांत ठरला होता. कांहीं दिवसांपूर्वी पुण्याच्या सभेंत 'जुनागड हें जुना गड होईल' असें वार्तिक मीं सांगितलें होतें. जुनागडमध्यें होणाऱ्या घटना मला पूर्णपणें माहीत होत्या. त्यांचीं पाउलें कशीं पडत होतीं हें मी जाणून होतों. कशी कलाटणी द्यावयाची व कशी घ्यावयाची याची पूर्ण माहिती होती. तथापि सर्वच प्रसव सुलभ होतात असें नाहीं. कांहींना विलक्षण विलंब लागतो, व प्रसंगीं शस्त्रक्रियादेखील करावी लागते. तात्पर्य, वरील आवाजांत काढलेले शब्द ऐकल्यानंतर समजलें नाहीं असें म्हणणें कठीण होतें. शिवाय जी व्यक्ति बोलत होती ती असामान्य व्यक्ति होती, व परिचित होती. मी म्हणालों, "होय !" "काय वाटतं तुम्हांला ?" मी म्हणालों, "झालं तें

ठीक झालं!" टेलिफोन बंद झाला. रात्रौ ११ वाजून गेले होते. हिंदुस्थान सरकारची चाकरी १२ तासांपेक्षां अधिक करून विश्रान्तीचा हक्क मला प्राप्त झाला होता; त्यामुळें मी बिछान्यावर पडलों, पण वरील संभाषण मला पुन्हा पुन्हा चाळवूं लागलें. कोणता विषय असेल? मंत्रिमंडळापुढील अनेक अनिर्णित प्रश्न डोळ्यांपुढें आले, व ज्या अर्थी सरदार अगदीं खुषींत विचारीत होते, त्यावरून जुनागडचेंच प्रकरण असावें असा मीं अंदाज आंखला. व या कामांत त्यांना सर्वांत अधिक साथ माझी होती हें सर्वत्र विदित होतें. जुनागडचा प्रश्न सुटला याचें मनाला समाधान झालें, व सर्व सुखदुःखाचा विसर पडणारी गोडनिद्रा मला ताब्यांत घेती झाली.

दुसऱ्या दिवशीं कॅबिनेटच्या खोलींत सरदार भेटले, व मी त्यांचें अभिनंदन केलें. कारण तो वेळपावेतों जुनागडसंबंधीं सर्व माहिती मिळून चुकली होती. ज्या तऱ्हेनें हा प्रश्न हाताळला जात होता, त्याबद्दल कांहीं मनें साशंक होतीं, कांहीं हात कांपत होते. जुनागडनें नव्या राजकारणांत प्रचंड गुंतागुंत उत्पन्न केली होती. लहान मूर्तीनें मोठी कीर्ति संपादन केली होती. जुनागड हें डावपेंचांचें एक क्षेत्र बनलें होतें. धोरणांचें तें एक प्रयोगक्षेत्र ठरत होतें. तेथें जो विजयी होईल त्याला तत्सम क्षेत्रांत यश निश्चित होतें. अपयश आल्यास मुंगी कानांत शिरून हत्ती कोलमडावा असें होणार होतें. काम नाजूक होतें. पण कणखरपणा दाखविल्याशिवाय फळ प्राप्त होणार नव्हतें. हा प्रश्न किती महत्त्वाचा होता हें कांहीं वर्षांनीं जेव्हां साद्यंत इतिहास लिहिला जाईल तेव्हां लोकांना समजेल. एक गोष्ट निश्चित कीं, जें घडलें तें घडविणारा शिल्पकार ही विलक्षण दृढनिश्चयाची व्यक्ति होती. सरदार म्हणजे थोडे शब्द व प्रचंड कृति — असा समन्वय आहे. पुढें काय होणार, कसें होणार हें सर्व ते जणूं कांहीं प्रेरणेनें जाणतात. मोठा Thesis त्यांना अवगत नाहीं. लांब लांब तर्कप्रधान, अगर भावनामय निवेदनें यांत ते रस घेत नाहींत. व्यवहार ते अचूक जाणतात. हा प्रश्न मंत्रिमंडळांत हाताळतांना त्यांचा मी एक अत्यंत नम्र साथी होतों. आणि म्हणून मीं त्यांचें अभिनंदन केलें. नंतर नेहमींच्या पद्धतीप्रमाणें डावा हात स्वतःच्या हनुवटीवर फिरवून आपल्या विशिष्ट हिंदींत त्यांनीं विचारलें, "आतां काय करायचं?" या प्रश्नावर मीं त्यांना इष्ट तें उत्तर देईन याची त्यांना खात्री असावी. सामान्यतः त्यांचें मन कोणत्या प्रश्नावर

कशी गति घेतें याचा अंदाज दीर्घ परिचयानें असल्यानें मी म्हणालों, " आपण जुनागडला गेलं पाहिजे." " होय; असा कांहीं विचार आहे—" कांहीं तासांनीं मंत्रिमंडळाची बैठक संपली. कॉंग्रेसच्या कार्यकारी मंडळांतील ( Working Committee ) जरी बरेच सभासद मंत्रिमंडळांत असले, तरी येथें लांबलचक ' बहस ' बहुशः ते करीत नाहींत. याचा अर्थ असा नव्हे कीं, कोणास येथें आपला व्यासंग अगर विद्वत्ता दाखवायला वाव नाहीं. तथापि कार्यकारी सभा ही झटपट कार्य करणारी असली पाहिजे, किंबहुना त्वरा हें तिचें चैतन्य आहे असें मानलें जातें. असें असूनसुद्धां तासतास बैठका चालतात. कारण विषय अतिशय विविध व व्यापक परिणाम करणारे असतात. बैठक संपून घरीं आलों. एका तासानें पुन्हा फोनवर सरदारांनीं विचारलें, " चलणार ना ? " अर्थात् मनांत जावयाचें होतेंच. मी म्हणालों, " होय." " संध्याकाळीं या, मग ठरवूं." दुसऱ्या दिवशीं जुनागडला विमानानें जाण्याचें ठरलें.

जुनागडला नेणारें विमान नवानगरचे राजे जामसाहेब यांचें होतें. आदल्या दिवशीं तें घेऊन हिंमतसिंग आले होते. हिंमतसिंग हे जामसाहेबांचे धाकटे बंधु असून असेंब्लीचे सभासद होते;— व सरकारच्या ' व्हिप ' ला न जुमानतां त्यांनीं अनेक वेळां १९४६ मध्यें कॉंग्रेसच्या बाजूनें मत दिलें होतें. ते कर्नल असून अनेक वर्षें जपानमध्यें होते. त्यांनीं विमानाची व्यवस्था सुंदर ठेवली होती. विमान राजघराण्याच्या खाजगी मालकीचें असल्यानें त्यांत सर्व सोयी होत्या. शिवाय प्रवासी अगदीं मोजके होते. सरदार, त्यांची कन्या, त्यांचे चिटणीस, व संजय म्हणजे ' ए. पी.'चा बातमीदार. सुप्रभातीं आम्हीं दिल्ली सोडली. आकाश निरभ्र होतें, सरदारांशीं गप्पा मारतां मारतां वेळ झपाट्यानें निघून गेला. सरदारांना देशांतील व राजकारणांत वावरणाऱ्या लहानसहान व्यक्तींची चांगलीच माहिती होती, व प्रान्तिक राजकारणांतील लहान—मोठे प्रवाह, खांच—खळगे त्यांनीं निरीक्षिले होते हें गप्पांत सहज लक्षांत आलें. एखाद्या व्यक्तीचें वर्णन एका अर्थपूर्ण विशेषणांत करणें ही एक सहज गोष्ट त्यांच्या बाबतींत दिसून येते. बोंचक बोलणें हा त्यांचा मोठा अपराध समाजसत्तावादी समजतात. तथापि त्यांत विनोदाची लकेर असल्यामुळें त्यांचें बोलणें तितकेंसें खुपतें असें नाहीं. आमच्या गप्पांत मुंबई इलाख्यांतील व्यक्ति व गट यांचा संबंध

येत होता. साहित्याशिवाय सर्व विषय हजेरी देत होते. राजकारणांतील परिवर्तनें रम्य चर्चेला जन्म देत होतीं; कांहीं महिन्यांपूर्वी जामसाहेबांचीं वक्तव्यें म्हणजे हिंदी स्वातंत्र्य नेस्तनाबूद करणारीं समजलीं जात होतीं. त्यांचे डावपेंच हिंदी हिताविरुद्ध उघड उघड दिसून येत होते. सरदार व त्यांचें विळ्या–भोपळ्याएवढें सख्य होतें. आणि या घटनेचा उल्लेख मनांत धरून मीं मुद्दाम कर्नलना विचारलें कीं, "प्रथम जामनगरला जायचें ?" त्यांनीं उत्तर दिलें, "जामसाहेबांची प्रबळ इच्छा सरदारांचें प्रथम स्वागत करण्याची आहे." मीं सरदारांकडे पाहिलें व ते म्हणाले, "अब सब बदल गया !" आणि खरोखरच सर्व बदललें होतें; कांहीं बदलत होतें; व राहिलेलें बदलणार हेंहि निश्चित होतें. भूकंपानें जेवढा धक्का बसणार नाहीं एवढा ऑगस्ट १५ ला झालेल्या रेझीना-मधील घटनेनें देशांतील राजकारणाच्या क्षेत्रांत बसला होता. भक्कम समजले जाणारे विचार कोलमडले गेले. राजकारणांतील भूमि अस्ताव्यस्त झालेली दिसून येत होती. भूत अवशेष अस्तित्व दाखवीत होता, तर भविष्य कर्तृत्वाची ओढ घेतांना गडबडींत असल्याचें वाटत होतें. विद्यमान् किंचित् स्तब्ध, किंचित् संभ्रमित, पण आशायुक्त नजरेनें क्षणाक्षणाला स्मृति मागें टाकीत प्रयत्नाच्या बाहूंत भविष्याला घेण्याच्या आतुरतेनें वाट चालत होता. कितीकांना बुद्धिमान् असूनहि परिस्थितीचें आकलन होत नव्हतें. कित्येक तर्काची कांस धरून सत्य तें अशक्य ठरविण्याच्या विवंचनेंत होते. इतिहासाचे दाखले म्हणजे भौतिक शास्त्रांतील सिद्धान्त मानून – जें झालें तें सिद्धान्तांना सोडून झालें, त्यामुळें 'पत्रिकेंत कृष्ण मेला' या चालीवर विचारांची कसरत करीत होते. राजकारणांतील तज्ज्ञ थोडें आत्मनिरीक्षण करून खरेच तज्ज्ञ आहोंत कीं काय याबद्दल शंका घेऊं लागले. सामान्य जनता श्रद्धेनें प्रकाशित होऊन नेत्यांनीं सांगितलेल्या मार्गानें जात होती.

अचल असें राजकारणांत कांहींहि नसतें, हें समजणारे थोडे. ते मात्र प्राप्ताची उपासना करून अधिक काय प्राप्त होईल याचा प्रपंच करीत होते. थोडक्यांत, सर्व बदललें होतें. कोणीं काळ ओळखला, कोणाला काळ ओळखत होता. गप्पा मारतां मारतां आमचें विमान काठेवाडांवर आलें. खालीं रेताड प्रदेश, आणि सर्वत्र निरभ्र व निळें आकाश यांचें संमेलन सौंदर्यच प्रकट करीत होतें. आणि सहज या बाह्य सृष्टीचा परिणाम होऊन

मन काव्यमय होणें अपरिहार्य होतें. 'पति गेले काठेवाडासी। गिरनार अबूच्या पहाडासी' हे लावणीचे चरण मला आठवले. कवीनें अबू व गिरनार एकत्र आणले, पण त्यांतील अंतर किती तरी मोठें होतें. मराठे वीर काठेवाड तुडवून गिरनारपर्यंत गेले असल्याशिवाय शाहिरानें हा चरण रचला नसेल हें स्पष्ट आहे. आणि हा चरण मनाशीं गुणगुणत असतांना त्यांतील शृंगार, त्यांतील वीररस, त्यांतील लज्जत, त्यांतील भावना, — जणूं कांहीं पार्थिव रूप धारण करीत आहेत असें वाटूं लागलें. पंचकल्याणी अबलख घोडा विमानाऐवजीं दिसूं लागला. सरदार खादीच्या सदऱ्या-ऐवजीं बखत्यार घातलेले, जिरेटोप डोक्यावर असलेले, हातांत भाला घेतलेले सेनापति दिसूं लागले. जिकडे तिकडे सर्वत्र हत्यारबंद सेना दिसूं लागली. बाहु फुरफुरायला लागले. उजवा डोळा लवून शकुन सूचित करूं लागला. आणि आतां 'हरहर महादेव' करून पुढें झेंप घेणार — तोंच 'पट्टा बांधा, जामनगर आलें,' असें कर्नल म्हणाले. आणि मीं काव्य व स्वप्न — दोन्हींत कांहीं फरक असेल असें वाटत नाहीं,— यांतून वास्तव-सृष्टींत आलों. दण्कन् आवाज होऊन विमान जमिनीला लागलें.

विमानतळावर सैन्याची तुकडी उभी होती. सलामी घेतल्यानंतर जाम-साहेबांच्या गाडींत बसून आम्ही त्यांच्या राजवाड्यांत गेलों. तेथें न्हाहा घेऊन मोटरींतून शहरांत गेलों. सर्वत्र जनसंमर्द उसळला होता. ठायीं ठायीं कमानी व 'हिंद विजयी होवो' वगैरे घोषणा सोनेरी अक्षरांत झळकत होत्या. जामसाहेबांची नगरी नववधूप्रमाणें नटली होती. सारखी चक्रांकित तिरंगी निशाणांची माळच माळ मुंडावळीप्रमाणें शोभा देत होती. सणाचा पोषाख करून स्त्री-पुरुष औत्सुक्यानें एकमेकांना रेटत होते. या प्रसंगानें सहजसुलभ शालीनता स्त्रियांच्या बाबतींत लुप्त होऊन तिचें धीटपणांत रूपान्तर झालेलें दिसत होतें. कारण पुरुषांना बाजूला सारून पुढच्या रांगेंत त्या अधिक दिसत होत्या. उंच, शामल पण आकर्षक, डोक्यावर जलकलश घेऊन हजारोंनीं त्या उपस्थित होत्या. राजपुरुषांचें स्वागत करण्याची ही इकडील प्रथा आहे असें कळलें. सर्वत्र माळा आणि फुलें यांचा वर्षाव होत होता. जामसाहेब सारथी होते. मागील बाजूस आम्ही होतों. हारांनीं गुदमरून जाण्याचा प्रसंग होता. किती मैल गाडी चालली तरी जनसंमर्द दोन्ही बाजूंस ललकाऱ्या मारीत होता. सुमारें दोन

तासांनीं आम्ही परत आलों. काठेवाडांत सरदारांनीं ढवळाढवळ केल्यास 'खबरदार' म्हणून सांगणारे जामसाहेब विमानतळावर सरदारांना मोठा भाऊ म्हणून आलिंगन देतात काय, स्वतः गाडी हांकून, सरदारांपुढें आपण एक सेवक आहोंत हें दाखवितात काय, दिल्लीपतीप्रमाणें व्यवस्था ठेवतात काय, – या सर्व घटनांचा बोध मी मनाशीं बांधीत होतों. सरदार आज सत्ताधीश होते. सर्व गुण कांचनाचा आश्रय घेतात, तर सर्व जनता सत्तेला मुजरा करते, हेंच खरें ! भोजन करून आम्ही विमानतळावर आलों, व नंतर राजकोटला निघालों. राजकोटला विमान पोहोंचलें. विमानतळावर मराठा पलटणीनें स्वागत केलें, व नंतर आम्ही रेसिडेन्सींत आलों.

अर्ध्या तासांत आम्हीं सभेच्या ठिकाणीं आलों. राजकोटचे ठाकूरसाहेब हजर होते. त्या ठिकाणीं जमलेला लोकसमुदाय अथांग होता. १९३९ सालीं मार्च महिन्यांत याच ठिकाणीं महात्माजींनीं उपवास केला होता, त्या वेळच्या घटना आठवल्या. तो राजा आज नव्हता. तो प्रधान राजापेक्षांहि उन्मत्त – आज इहलोकांत नव्हता. ती अनियंत्रित सत्ता कोलमडली होती. आजच्या सभेंत कांहीं घोषणा होणार म्हणून जनता उत्सुक होती. जनतेची स्वातंत्र्यलालसा पूर्वींइतकीच तीव्र होती. जबाबदार सत्ता हा जनतेला पुरुषार्थ वाटतो. ठाकूर अध्यक्षस्थानीं होते. बंडखोर, काठेवाडचा शत्रु आज बोलणार होता; जनतेचा तो पूर्वींपासून मित्र होता. राजे आज त्याची मैत्री संपादन करण्यांत गर्क होते. अध्यक्षांनीं सरदारांचें स्वागत करून जबाबदार राज्यपद्धति स्वीकारल्याचें जाहीर केलें. टाळ्यांचा कडकडाट झाला. विजेच्या प्रकाशांत प्रेक्षकांचीं मुखकमलें प्रफुल्लित झाल्याचें दिसलें. सरदारांनीं आपलें भाषण सुरू केलें. गुजरातींत ते बोलले. हिंदुस्थान सरकारची नीति काय याचा प्रपंच केला. जे आमच्यांत आले त्यांचें स्वागत केलें; जे विरोधक होते त्यांना थोडक्यांत पण समजेल अशी समज दिली. जे अनिश्चित होते त्यांना त्यांचें भविष्य कथन केलें. जनतेवरील त्यांच्या वक्तृत्वाचा प्रभाव पाहून ए. पी.चा रामचंद्र न कळत, न समजतां टाळ्या पिटीत होता. अर्थो-आधीं आवाजाशीं समरस झाला होता. आणि जेव्हां भाषणाचा गोषवारा त्याला इंग्रजींत सांगितला, तेव्हां हें भाषण किती लवकर धाडूं असें त्याला झालें. रात्रीं प्रासादतुल्य रेसिडेन्सींत आम्हीं मुक्काम केला. जेथें गव्हर्नर व व्हाइसरॉय राहिले तेथें सामान्य लोक व त्यांचे नेते राहिले होते. वास्तूलासुद्धां हा बदल

इष्टच वाटला असावा ! ! जीवनाप्रमाणें अन्य सृष्टींतसुद्धां विविधता व वैचित्र्य रुचीला आनंद देत असतें. किंबहुना वैचित्र्य हें जीवनांतील स्वारस्यच होय !

ता. १२ नोव्हेंबर १९४७ ची रात्र आम्हीं वर सांगितल्याप्रमाणें रेसिडेन्सींत काढली. संवत्सराची ती शेवटली रात्र होती. आश्विन अमावास्या ती होती. उजाडणारा दिवस नूतन संवत्सराचा आरंभ करणारा होता. आणि तसेंच पाहिलें तर एक जमाना संपला होता, व नवा सुरू होत होता. सुप्रभातीं स्नान करून आम्ही विमानतळावर आलों, व थोड्याच वेळांत जुनागडला पोहोंचणार होतों. विमानांतून वर जातांच थोड्या वेळांत गिरनार पर्वताचीं शिखरें दिसूं लागलीं. कर्नल सांगूं लागला, या पर्वतराजींत सिंहांची वस्ती आहे. मी म्हणालों, 'दिल्लीला पण सिंह आहेत.' त्यानें माझ्याकडे किंचित् आश्चर्यानें, किंचित् साशंकतेनें पाहिलें. मी पुढें म्हणालों, '–आणि त्यांपैकीं कांहीं या विमानांत आहेत !' आणि हें म्हणत असतां मी सरदारांकडे पाहिलें,–व स्वतःकडे पाहण्याचा मोह एखाद्या महान् तपस्व्याप्रमाणें आवरला. कर्नल हसला व म्हणाला, 'बरोबर आहे.' कुणी तरी म्हणालें कीं, 'सिंहाची शिकार पण निसटली !' मी म्हणालों, 'क्षणमात्र, पण पलायनानें ! तरीसुद्धां रान आतां मोकळें झालें आहे.' गिरनारला डावी घालून जुनागड शहरावरून वळसा घेत आमचें विमान जुनागडपासून सुमारें ३० मैल दूर असलेल्या किसोदें विमानतळावर उतरलें. विमानतळावरील सीन एखाद्या रणक्षेत्राप्रमाणें दिसत होता. १०–५ नागरिक तेथें होते; बाकी सर्व सैनिक. मोटरी सर्व लष्करी 'जीप' नमुन्याच्या पसरल्या होत्या. हे मराठा पलटणींतील लोक असून सैन्यांतील प्रमुख अधिकारी महाराष्ट्रीय होते. सरदार व मी एका जीपमध्यें बसलों. पुढें–मागें सैनिकांनीं भरलेल्या जीप चालू होत्या. कुठल्याहि प्रसंगाला ते तयार दिसत होते. त्यांच्या चेहऱ्यावर आनंद दिसत होता. कारण दोन दिवसांपूर्वीच जुनागडच्या राजानें शरणागति देऊन राज्य हिंदुस्थान सरकारच्या हवालीं केलें होतें. यांतील सर्व काम सैनिकांनीं शिताफीनें केलें होतें. शेंकडों अरब व पठाण सशस्त्र असून गडबड करतील अशी शंका होती. जुनागडचे पोलिस व सैन्य मुलकी अधिकाऱ्यांच्या शरणगातीला मानतील कीं नाहीं याचा भरंवसा नव्हता. म्हणून शहर ताब्यांत घेतांना

लष्करी डावपेंचांची तरतूद करून सर्व प्रसंगाला तोंड देण्याच्या तयारीनें त्यांनीं काम केलें होतें. एखाद्या माणसाला युक्तीनें इष्ट त्या ठिकाणीं आणून निःसामर्थ्य व निःसत्त्व करावा असें थोडेंसें झालें होतें; व जें राहिलें तें सैन्यानें केवळ रुबाब मारून करून घेतलें होतें.—बेहोष नव्हते; शिस्तींत होते, पण उद्धत नव्हते. जीपमध्यें बसून 'पुढें–मागें फौज अर्धी अर्धी' अशा थाटांत आम्ही स्टेशनकडे जात होतों. स्टेशनवर जाणारा रस्ता मुद्दाम दुरुस्त केलेला दिसत होता. दुतर्फा अंतराअंतरानें सैनिक सशस्त्र व सुसज्ज उभे होते. स्टेशन प्लॅटफॉर्मवर मात्र नागरिक पण शेतकरी व कांहीं अधिकारी उभे होते. चुनीदार पायजमा, वर बाराबंदीवजा सदरा, व डोक्यावर काठेवाडी पागोटें, शरीर उंच व धिप्पाड, दिसण्यांत किंचित् कठोर – असा सामान्यपणें तेथील शेतकरी होता. प्रवेशद्वारापासून खास गाडीच्या सलूनपर्यंत पायघड्या घातल्या होत्या. तेथेंहि सैनिक होते. नागरिक हारांचा वर्षाव करीत होते. 'हिंदुस्थान झिंदाबाद' म्हणून 'नारे' त्यांच्या 'सहस्र सहस्र कंठां'तून उसळून वर येत होते. मनांत या गर्दीत कोणी मुसलमान घातपाती निघाला तर, असा विचार येऊन मी अगदीं सरदारांजवळ उभा राहून सभोंवार सारखा निरीक्षण करीत होतों. आम्ही डब्यांत बसलों; एवढ्यांत कुणीं तरी 'जय सोमनाथ' म्हणून गर्जना केली. मीं त्या दिशेला पाहिलें. एक उंच, वृद्ध पण देखणा, भालीं तिलक लावलेला, गंभीर मुद्रेचा, पण कृतकृत्यता ज्याच्या चेहऱ्यावर झळकत होती असा गृहस्थ पाहिला. त्यानें पुन्हा तीच गर्जना करून वंदन केलें. त्याकडे अधिक पहावें, कांहीं विचारावें असा विचार मनांत येतो न येतो तों गाडी चालू झाली.

आम्हीं सुमारें १॥ तासाचा प्रवास जुनागडच्या अत्यंत सुपीक प्रदेशांतून केला. काळी जमीन, मधून मधून बागा, क्वचित् घनदाट झाडी, अशा प्रदेशांतून जात जात १० च्या सुमारास जुनागड स्टेशनवर पोहोंचलों. काय पहावयास मिळेल तें आगाऊ मनापुढें चित्रित करीत होतों. जेते म्हणून सरदार जात होते. जित कसे असतील, इत्यादि विचार मनांत गर्दी करीत होते. स्टेशनवर सर्वत्र शृंगार वावरत होता. दीर्घकालानें मीलन होतांना जें वातावरण असतें, तसें थोडें भासत होतें. विरहाची रात्र संपली होती. हिंदु जनता आज कृतज्ञ अंतःकरणानें, निर्भय चालीनें चालत होती. शेंकडों वर्षें

अपमानित झालेला स्वाभिमान उन्नत मान करून नवप्राप्त सन्मान डौलानें अनुभवीत होता. सर्व प्लॅटफॉर्म सजीव झाला होता. दर्शकमात्राच्या हातांत फुलें व माळा दिसत होत्या. प्रत्येक व्यक्ति हार घालण्यास आतुर होती. आम्हीं उतरून हार घेत घेत पायघड्यांवरून स्टेशनवरील मोठ्या वेटिंग रूममध्यें आलों. तेथें रांगेनें जुनागडचे माजी अधिकारी व राज्यकर्ते उभे होते. नबाबसाहेब 'न धरीं शस्त्र करीं मी' असें म्हणून संपत्ति व सारमेय (कुत्रीं) यांना घेऊन, जुनागडला 'अलेकुम्' ठोकून 'पाकगत' झाले होते. स्थावरापेक्षां जंगम संपत्ति श्रेष्ठ मानून ते वागले. त्यागापेक्षां भोगच त्यांना परवडला. तात्पर्य, फुलें वेचलीं तेथें गोवऱ्या वेचण्यास ते तयार नव्हते. तें काम त्यांनीं आपल्या वफेदार व 'दोस्त-ई-दौलत' अशा नोकरावर सोपविलेलें दिसत होतें. रांगेंत उभे असलेले कारभारी, न्यायाधीश, सेनापति, अष्टप्रधान, एक इंग्रज — बाकी सर्व मुसलमान होते. इंग्रज 'सुखदुःखे समे कृत्वा' अशा थाटांत होता. निदान त्याच्या मनांतील विचार अगर भावना चेहऱ्यावर दिसत नव्हत्या. निर्ढावलेल्या गुन्हेगाराप्रमाणें अलिप्त मनानें तो वागत होता. अन्य अधिकारी तोंडावर कृत्रिम हास्य आणून साहजिक झालेल्या दुःखाला लपवीत होते. फणा काढून जनतेला त्रस्त करणारा हा प्राणी आज मणि-विरहित, निस्तेज असा झाला होता. त्यांच्यापुढून आम्ही जात होतों. प्रत्ये-काची ओळख करून देण्यांत येत होती. केवढा तो ऐतिहासिक प्रसंग होता! फ्रान्स व जर्मनी यांच्या शरणागतीचे प्रसंग आठवले. लहानपणीं पोरस राजानें आपली तरवार शिकंदरपुढें ठेविली असें वाचलें होतें, तें डोळ्यापुढें उभें राहिलें. लढाईची वल्गना करून 'उत्तरा'चे अनुयायी झालेले हे अधिकारी पाहिल्यानंतर — केव्हां तरी इतिहास न्याय देतो, असा विश्वास दृढ झाला. अधिकाऱ्यांच्या रांगेंतून बाहेर पडल्यानंतर, त्यांचे मुजरे घेणें संपल्या-नंतर 'आर्जी हुकुमत'चे प्रमुख सामळदास गांधी व त्यांचे सहकारी यांचा परिचय करून देण्यांत आला. थोड्या आठवड्यांत अल्पारंभ करून जुनागड व्यापणाऱ्या या संघटनेचे प्रमुख सामळदास हे रुबाबदार गृहस्थ आहेत. मोठ्या धैर्यानें व चातुर्यानें ते वागले. समय त्यांनीं जाणला, कर्तव्य-भूमि ओळखली, व मुहूर्तावर प्रहार करून विजय संपादला. त्यांच्या विज-याचें मोठें कारण देशांतील घडामोडी हें असलें तरी त्यांचें कर्तृत्व कमी मानण्याचें कारण नाहीं. एकामागून एक अशा दोन संघटनेच्या प्रमुख

व्यक्तींशीं ओळख केली जात असतां दोन जमान्यांतून जात आहों असें वाटत होतें. युगपत् व्यसनोदयाभ्याम् असेंच तें होतें. एका वेळीं नष्ट व निर्माणक्रिया होत होती.

मोटरींत बसून आम्हीं शहराकडे वळलों. शहराचा मुख्य भाग कोटांत आहे. नवी वस्ती, कचेऱ्या, कॉलेज, कोटाबाहेर आहे. सर्वत्र सैनिक पसरले होते. मोठ्या राजवाड्यासारख्या दिसणाऱ्या बंगल्यांत आमची गाडी शिरली. तेथें सर्वत्र तोफा, टँक्स्, शिपाई दिसत होते. ती सेनापतीची छावणी होती. तेथें लष्करी अधिकाऱ्यांची ओळख करून देण्यांत आली. बरीच संख्या महाराष्ट्रीयांची त्यांत होती. चहापान करून आम्ही सभेच्या स्थानीं गेलों. कडेकोट सैनिकी बंदोबस्त होता. बंदुका रोखलेले सैनिक सर्वत्र दिसत होते. पण त्यांच्या वेढ्यांत सांपडलेली जनता खूष होती, आनंदांत होती. हें बाहुबंधन नव्हतें, संरक्षण होतें. जनता व सैन्य यांचें मनोमन मीलन झालें होतें. सैनिकांकडे पाहून भीतीऐवजीं अभिमान वाटत होता. आपुलकीचें वातावरण सुख व आनंद पसरवीत होतें. सरदार येतांच प्रचंड जयघोष झाला. जनतेपेक्षां सैनिक पुढें सरकण्यास अधिकच उतावीळ झाले. थोड्या मिनिटांत नागरिक व सैनिक एकमेकांत मिसळून गेले. पांढरे व खाकी रंग एकत्र आले, व विविधतेंतील मौलिक एकता भासूं लागली. स्वागत संपतांच सरदारांनीं भाषण केलें, व मुसलमानांना संपूर्ण नागरिकत्व व संरक्षण यांची ग्वाही दिली. आणि मग जुनागड हें हिंदुस्थानांत सामील होण्याबाबतचा सवाल केला,– त्यासरशीं ‘ हिंदुस्थान झिंदाबाद ’चा प्रचंड जयघोष झाला ! हजारों हात वर गेले. सार्वमत क्षणांत नोंदलें गेलें. वरतीं सहस्ररश्मि सहस्रावधि हात वर गेलेले पहात होता. भूमीवरील प्रत्येक व्यक्ति आपलें सर्व शरीर बाहुरूप कां झालें नाहीं म्हणून जणूं काय हात वरवर करीत होती. अनियंत्रित सत्तेला कंटाळलेले, जुलुमाला गांजलेले, जीवन व वित्त यांबद्दल सतत विवंचनेंत असलेले हे जीव संकटांतून मुक्त होत्साते त्यांच्या मनाची प्रफुल्लता जणूं हस्तकमलांनीं दिग्दर्शित करीत होते. फोटो-ग्राफरला इतकें मनोहारी व ऐतिहासिक दृश्य क्वचितच भेटलें असेल. वर गेलेले हात जणूं कांहीं जुन्या जमान्याला, जुन्या राज्याला स्वर्गाचा मार्ग दाखवीत होते. सामळदास उभे राहिले. प्रचंड जयनाद झाला. आपलें कार्य झालें, आपण हिंदुस्थान सरकारचे आज्ञाधारक राहूं असें आश्वासन

त्यांनीं दिलें. आपण सर्व जनतेसाठीं केलें. जात, धर्म यांचा विचार तेथें नव्हता असेंहि त्यांनीं सांगितलें. प्रेक्षकांत मुसलमान होते, त्यांनीं टाळ्या वाजवून मान्यता दर्शविली. सभा संपून आम्ही स्टेशनवर आलों. स्पेशल सुरू झाली. आम्ही सोमनाथला प्रभास-पट्टणला जाणार असें समजलें.

ता. १३ नोव्हेंबर १९४७ हा नव-संवत्सराचा पहिला दिवस होता. सकाळपासून बाहु स्फुरत होता. पण बाहूचें कार्य असें कांहींहि नव्हतें. डोळ्यांनीं पाहण्यासारखे प्रसंग पहात होतों. स्वतःला धन्य मानीत होतों. तथापि मनाला कसली तरी ओढ लागली होती. कांहीं तरी चांगलें होणार असें स्पष्ट वाटत होतें. बुद्धि आकलन करूं शकत नव्हती, विचारांच्या टप्प्यांत कांहीं अभिनव दिसत नव्हतें. भासत होतें,—पण रूप दिसत नव्हतें. अस्तित्वाची जाणीव होत होती, पण आकार दिसत नव्हता. झालेल्या घटना कसल्या तरी महान् गोष्टीची पार्श्वभूमि ठरणार असा ओझरता विचार मनाला चाटून गेला होता. सुंदर नादध्वनि निघावा, पण कोणतें संगीत पुढें येणार हें समजूं नये असें थोडेंसें झालें होतें. गाडींत सेनापतीनें कार्यक्रम सांगितला, त्यांत सोमनाथ मंदिराला भेट हा एक भाग होता. मला तेथें कळलें कीं, सोमनाथमंदिर, प्रभासपट्टण हें जुनागड हद्दींत आहे. विचारांची मालिका सुरू झाली. वेरावळला उतरलों, व लागलींच मोटरींतून प्रभासपट्टणकडे प्रवास सुरू झाला. सहा मैलांच्या या प्रवासांत आम्हीं धुळीनें भरून गेलों; पण त्याचें कांहीं वाटलें नाहीं. रस्त्याच्या बाजूनें लांब लांब पसरलेलीं कबरस्थानें दिसलीं. त्यांत माणसें उभीं राहून स्वागत करीत होतीं. जीवनमृत्यु यांचें नित्य साहचर्यच जणूं प्रस्थापित होत होतें. थोड्याच वेळांत किल्ल्याच्या पडक्या भिंती उजव्या बाजूला ठेवून आम्हीं 'त्रिवेणीं'त प्रवेश केला. ज्या भूमिभागावर गांव वसलें आहे त्याला त्रिवेणी नांव आहे. कांहीं धडक्या व अधिक पडक्या घरांच्या रांगांतून आम्ही सोमनाथमंदिरापुढें आलों. स्मशान, पडका किल्ला, पडकीं घरें, जणूं कांहीं संपूर्ण सृष्टि पुरी नष्ट झाली नव्हती म्हणून या भग्न मंदिरापुढें आम्ही आलों. अंतःकरणांत कालवाकालव झाली. अंवतींभोंवतीं शेंकडों लोक होते. हे जिवंत हिंदु व पुढें त्यांचें भग्न मंदिर—हें दृश्य शल्यापेक्षां दुःखदायक होऊं लागलें.

मध्यें मंदिर, भोंवतालीं थोडी मोकळी जागा, तिला तीन बाजूंनीं

मोडक्या भिंतीचें कंपाउंड, व पश्चिम बाजूला सुमारें २० फुटांवर अफाट पसरलेला अरबी समुद्र, अशी स्थिति पाहिली. लहानसें फाटक होतें, त्यांतून आम्हीं प्रवेश केला. समोर मंदिराचें प्रवेशद्वार होतें, पण दरवाजा अगर चौकट तेथें नव्हती. वर पाहिलें तों शिखर दिसत नव्हतें. मंदिराचे चंदनी दरवाजे महंमद गझनीनें काबूलला नेल्याचें इतिहासांत वाचलेलें आठवलें. अनंत भावना हृदयांत उसळूं लागल्या. याच जागीं हजार वर्षांपूर्वी इस्लामच्या अनुयायांनीं या मंदिराची विटंबना केली होती. बारा ज्योतिर्लिंगांपैकीं हा 'पश्चिम सागराधीश' भगवान्—अविंधांनीं मातीमोल केला होता! जीवापेक्षां धर्म श्रेष्ठ मानणारे हिंदु जीव श्रेष्ठ मानून पळत गेले. ज्याच्यासाठीं लढावें व मरावें—असा धर्म मानून आचरणारे कुठें होते? सोमनाथाचे पुजारी देवालयांतील मूर्तीचें संरक्षण करण्यासाठीं मरण्याऐवजीं द्रव्य देऊन सवदा करीत होते. 'मी मूर्ति विकणारा नाहीं, मी मूर्ति फोडणारा आहे' असें कडव्या वृत्तीनें सांगणारा महंमूद एक महान् व्यक्ति निश्चित होता. किती संपत्ति, किती सती या देशांतून नेल्या गेल्या कोणाला ठाऊक! संताप, उद्वेग, तिटकारा,—नानाविध भावना मनांत कालवूं लागल्या. सर्वशक्तिमान् प्रभु एक सामान्य माणसापुढें हतबल झाला. आपल्या तृतीय नेत्रानें जगाचा संहार करणारा तिन्ही डोळे मिटून स्वतःचा संहार पहात होता. नव्हे, हा देव नव्हे; निदान त्यांत देवत्व, कर्तृत्व मानणारे लोक जर तेथें नसतील तर तें कसलें देवत्व? परमेश्वर मनुष्यरूपानें कार्य करतो. शक्तीचा आविष्कार करणारें माध्यम जर कच्चें अगर कचखाऊ निघालें तर दोष शक्तीचा कसा? खोट्या धर्मानें चालणारी जनता ध्येयासाठीं मृत्युमोल त्याग करूं शकत नाहीं. श्रद्धा सोय जाणत नाहीं,—श्रद्धा जगते अगर मरते, तडजोड व श्रद्धा यांत समन्वय नाहीं. एक चालीनें हीं दोन्ही चालूं शकत नाहींत. मूर्ति फोडणें हा धर्म, ही श्रद्धा, मग ती विकणें हें विसंगत. ती विकूं पाहणें म्हणजे तिजवर अश्रद्धा दर्शविणें, हाच अर्थ आहे. सुंदर कलाकृतीचें तें मंदिर आज भेसूर दिसत होतें. रेखाबद्ध प्रमाणबद्ध रचना आज अस्ताव्यस्त वाटत होती. जड अंतःकरणानें आम्हीं आंत प्रवेश केला. पहिल्या गाभाऱ्यांत नुकतीच घाण काढल्याचें दिसत होतें. आतां मूर्ति दिसेल म्हणून पुढल्या गाभाऱ्यांत आलों, व तेथील दृश्य पाहतांच मन व शरीर बधिर झाल्यासारखें वाटलें. शिखर फोडून टाकल्यामुळें वर मोकळें होतें. वर निळें आकाश हेंच

छत्र होतें. मूर्तीच्या जागेंत खड्डा होता, मूर्ति नव्हती! याच जागीं त्या अविंधानें धर्मकार्य समजून मूर्तीचे तुकडे तुकडे केले असें इतिहास सांगतो. कांहीं पुजारी मूर्तीवर आडवे पडले, त्यांना त्यानें कंठस्नान घातलें असें म्हणतात. शरीरांत प्राण नाहीं, काव्यांत अर्थ नाहीं – तसें मंदिरांत मूर्ति नसल्यानें भासत होतें. मला काय वाटलें हें वर्णन करण्याला डमरू–सूत्रांतून उत्पन्न झालेली व आजतागायत अव्याहत वृद्धिंगत होत असलेली भाषा असमर्थ आहे. सर्व वैदिक संस्कृति, पूर्वजांचा पराक्रम 'कृण्वंतो विश्वमार्यम्' ही घोषणा मूर्तिभंजनाच्या वेळीं कोठें गेली होती! आमची मत्सरवृत्ति, भाऊबंदकी, धर्म व देश यापेक्षां व्यक्तिस्वार्थ व प्रतिष्ठा अधिक मानणारी आमची वृत्ति इतिहासकाळांत आमचा नाश करून अजून तरी कोठें थांबली आहे? माझा मलाच तिटकारा वाटूं लागला.

प्रसंगाला दगा देणारें धैर्य हें धैर्य नव्हे; आणि आज तरी तोंच अनुभव नाहीं का? कांहीं तरी कुठें तरी आमच्या धर्मांत, आमच्या संस्कृतींत, मनोरचनेंत दोष आहेत हें निश्चित; आणि तो घालविण्यासाठीं आम्हीं काय केलें? वैयक्तिक मत व अहंभाव समाजकार्यासाठीं आम्ही केव्हां सोडूं? सामुदायिक हितांत व प्रतिष्ठेंत आम्ही व्यक्तिशः केव्हां रस घेऊं? कोण जाणे–केव्हां हें होईल? केव्हां आम्हीं जोडणारे होऊं, केव्हां उभारणारे होऊं?–कोण जाणे आणि हें कोण करणार? आणि असे विषण्ण विचार मनाला व्यापून टाकत होते, तोंच समोरील भिंतीवर मोठ्या अक्षरांत 'महाराष्ट्र' शब्द लिहिलेला पाहिला. सदरहू भिंतीवर अनेक प्रेक्षकांनीं आपआपलीं नांवें खडूनें लिहून अगर अन्य रीतीनें खोदून अजरामर करण्याचा प्रयत्न केलेला दिसत होता. 'महाराष्ट्र' हा शब्द फार मोठ्या अक्षरांत काढला होता. त्याची जादू ज्याची मातृभाषा मराठी आहे तोच जाणूं शकतो. लोखंडाला परीस लागतांच त्याचें सुवर्ण व्हावें, तसेंच हा शब्द नयनांतून मनांत गेल्याबरोबर विषण्ण विचारांचें एकदम प्रेरणेंत रूपान्तर झालें. या शब्दांत अनंत भावना आहेत; आणि चांगला व वाईट पराक्रमाचा, पराभवाचा, अतुल स्वार्थत्यागाचा, व अवांच्छनीय लोभाचा, जीविताची तमा न बाळगणारा व जीवासाठीं लाचारी पत्करणारा, – असा सर्व इतिहास यांत सामावलेला आहे. अटकेपार हिंदवी स्वराज्य नेणाऱ्यांचा मी वंशज – हें भग्न मंदिर, हें मूर्तिहीन देवालय कसें पाहूं,– कसें साहूं? अंगावर रोमांच उभे राहिले. प्रेरणा रम्य

कल्पना प्रसवूं लागली. कांहीं मंगल जन्माला येत आहे अशी सुखाची भावना मनाला गुदगुल्या करूं लागली. मीं सरदारांकडे पाहिलें, व म्हणालों, "हें मी साहूं शकत नाहीं. निराळा विचार मनांत येत आहे." "मग चालूं दे विचार." माझ्या मनांत काय आहे याची थोडी कल्पना त्यांना आली असा विश्वास वाटूं लागला. माझ्या मनांतील विचार स्पष्ट होऊं लागले. आम्ही मंदिराबाहेर आलों व पश्चिम दिशेकडील खडक उतरून वाळवंटांत आलों. सागराला भरती येत होती. त्याला माझ्या मनांतील विचार तर नाहीं ना कळले? त्या रम्य कल्पनेचें स्वागत करण्यासाठीं तर तो येत नव्हता ना?–कीं ज्यानें,–ज्या वीर पुरुषानें या देशाला अनंत शतकांनंतर स्वातंत्र्य व एकता दिली होती! त्याचें कृतज्ञतापूर्वक पादप्रक्षालन करण्यासाठीं तर तो येत नव्हता ना? या देशांतील अनेक घटना, भाग्योदय व नाश, चढउतार – या सर्वांना पाहणारा हा साक्षीदार कांहीं तरी पाहण्यास उत्सुक झाला होता हें निश्चित.

वाळवंटांत येतांच माझ्या मनांतील कल्पना सरदारांना सांगितली. ती ऐकून त्यांना आनंद झाला. त्यांनीं खांद्यावर हात ठेवून सांगितलें, "करो." लागलींच ते व मी पाण्याजवळ जाऊन आम्हीं पादप्रक्षालन केलें, व नंतर पुन्हा चढाव चढून मंदिराजवळ आलों. आतां मंदिर पाठीशीं घालून दरवाजांत मी, सरदार व जामसाहेब उभे राहिलों, व लोकांना बोलाविलें. उजवीकडे सागर उल्हसित होत होता. पुढें व डावीकडे जनसागर उत्सुक झाला होता. पाठीमागील भग्नवास्तु निःस्तब्ध होती. मीं घोषणा केली, "हिंद सरकारनें या देवालयाचा जीर्णोद्धार करण्याचें ठरविलें आहे. आम्हीं हातांत घेतलेली सत्ता नाशासाठीं नसून निर्मितीसाठीं आहे. हेंच आमचें जीवनकार्य आहे. We have come not to destroy, but to fulfill." टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला, व एकदम स्फूर्तीनें लोकांनीं 'जय सोमनाथ!' म्हणून घोषणा केली. आम्हींहि 'जय सोमनाथ' म्हणून हुंकार दिला. निमिषार्धांत वातावरण बदलून गेलें.

होय; हजार वर्षांनीं या वास्तूंत ही घोषणा होत होती. इतिहासाचें हें ऋण हजार वर्षांनीं पुरें केलें जाणार होतें. जामसाहेबांनीं एक लाखाची देणगी तावडतोब जाहीर केली. तेथून जनसमूह 'जय सोमनाथ!' ची घोषणा करीत

अहिल्याबाईनें बांधलेल्या सोमनाथाच्या मंदिराकडे वळला. तेथें सभा नेमली होती. सभेंत सरदारजींनीं तेंच जाहीर केलें. ते म्हणाले, "आज नूतन संवत्सराचा पहिला दिवस आहे. आजच्या शुभ दिवशीं शिवालयाचा जीर्णोद्धार करण्याचें हिंदुस्थान सरकारनें जाहीर केलें आहे." पुन्हा गर्जना व रकमांचीं आश्वासनें येऊं लागलीं. सर्व प्रभासपट्टण आज जागृत झालें. ती इतिहासकालीन युद्धघोषणा हजार वर्षांनीं प्रभासपट्टणांतील वास्तूंनीं ऐकली. सभा संपली, व लागलींच आम्ही परतलों. माझ्या मनांत पुढील विचार सुरू झाले. वाटेंत किल्ल्याजवळ सरदार म्हणाले, "हा दुरुस्त कर, ही स्मशानभूमि ठेवूं नकोस; येथें बाग होऊं दे." तात्पर्य, नष्टयुग संपून निर्मितियुग सुरू झालें. सोमनाथाचा जीर्णोद्धार जाहीर झाल्याची खबर बिनतारी संदेशानें पांच मिनिटांत देशभर पसरली. वेरावळ स्टेशनवर पुजारी आले. त्यांनीं मला खास आशीर्वाद दिले. गाडीनें किसोदें स्टेशन, तेथून विमानतळ, तेथून जामनगर विमानतळावर या बातमीमुळें हजारों लोक आले. राणीसाहेबांनीं आमचें अभिनंदन केलें. दरबार गोपाळदास म्हणाले, "तुम्ही कां आलांत हें आतां कळलें." आयुष्यांत स्फूर्तीनें केलेल्या गोष्टी-बद्दल दीर्घसूचनेचा सद्‌गुण चिकटविला गेला;—असे अनेक अनुभव आले. चहा घेऊन पुन्हा विमानांत बसलों. दिल्लीकडे विमान झपाट्यानें जात होतें. येतांना काय वाटत होतें याचा विचार करीत होतों. डोळ्यापुढें हजारों हिंदु वीर 'जय सोमनाथ' ही घोषणा करीत आहेत असें वाटत होतें. प्रत्यक्ष होण्यास विलंब लागेल हें खरें, पण कल्पना हें बीज निर्माण झालें होतें. हजार वर्षांनीं इतिहासाला कलाटणी मिळत होती. क्रान्तिकारक असेंच हें होतें, आणि देशभर तीच दृष्टि होती. हिंदु धर्माचें पुनरुत्थापन म्हणून कोणीं मानलें, कोणीं कलेचा उद्धार मानला; तथापि 'जय सोमनाथ!' ही घोषणा करण्यांत सर्वांचें एकमत होतें.



## १६ : काय वर्णुं तो सोहळा आतां—

‘ हें तुझें मरण नाहीं, असें तुझें मरण नाहीं–’ कुणी तरी कानाजवळ येऊन बोललेलें मीं ऐकलें. ज्या स्थितींत हे शब्द उच्चारलेले मीं ऐकले त्या स्थितींत तसें कोणी प्रत्यक्ष बोललें असेल यावर विश्वास बसणें कठीण होतें. ती स्थिति तशीच असामान्य होती; व एकंदर परिस्थितीहि भयंकर होती. कोणी कधींहि ध्यानींमनीं आणली नसेल अशीच ती होती. सर्व ज्योतिष्यांना खोटें पाडणारी, भविष्य-वाद्यांवर मात करणारी, कविकल्पनेच्या पलीकडे जाणारी अशी ती होती. त्या प्रसंगाचें चित्र आज एक वर्षानंतर शब्दांत जोडतांनासुद्धां भयंकर वाटत आहे. असला प्रसंग वैऱ्यावरहि येऊं नये असेंच बहुतेकांना वाटेल. आकाश अगदीं स्वच्छ असावें, कोठेंहि वादळाची चाहूल नसावी, आणि पाहतां पाहतां गर्जना व्हाव्यात, ढग यावेत व वृष्टि व्हावी इतका अकल्पितपणा त्या घटनेंत होता. घटना असामान्य होती हें तर खरेंच, पण तिचा अंत सामान्यपणें झाला असता तर ती इतिहासांत, निदान साहित्यांत तरी अज्ञातच राहिली असती. सामान्य माणसें वागतात तीं सामान्य परिस्थितींत. पण असामान्यपणें असामान्य परिस्थितींत तीं कशीं वागतील ? अनपेक्षिलेलें पुढें उभें रहावें, व तें घडल्यानंतर जें अपेक्षिलेलें तें घडूं नये–अशी चित्ताकर्षक व नाट्यपूर्ण वाटणारी ती घटना होती. त्या दहावीस क्षणांत शोकपर्यवसायी नाटकाचा करुणरस व त्याबरोबरच आनंदपर्यवसायी नाटकांतील गोडपणा (पण किंचित् कडूपणा मिसळून) एकत्र आले होते. अवघ्या तीन पात्रांतील तें नाटक होतें असें म्हटलें तरी चालेल. त्याची पार्श्वभूमि कांहींहि असली तरी दिग्दर्शक–लेखकाचें तें दैव होतें यांत शंका नाहीं. आणि अशक्य व असंभाव्य घटना लीलेनें घडवून आणण्याच्या कामीं दैवाची बरोबरी कोणीच करूं शकत नाहीं. श्रेष्ठ साहित्यिक अनुभवाच्या संदर्भात कल्पनेची भरारी मारतो. दैवाला अनुभवाची आवश्यकता नसते.

दानाचे फासे माणसाला जुळवावे लागतात. आगाऊ संकल्प करावा

लागतो. दैवाला कांहींच करावें लागत नाहीं. कोठलाहि क्षण व कोठलीहि वस्तु दैवाच्या हातांत फासे होऊं शकते, व आपल्याला हवें तें दान दैव मिळवितें. 'अगदीं अरसिक' असें दैवाला कोणीच म्हणूं शकत नाही. कमलिनीचा नाश करण्यासाठीं हिमबिंदूची योजना होणें हा दैवाचा नाजूक वृत्तीचा प्रकार नाहीं काय? आणि इंदुमतीसारख्या मृदु वस्तूचें हरण करण्यासाठीं पुष्पमालेचा उपयोग काय अरसिकता दर्शविते? आणि ह्याहि घटनेंत दैवानें चातुर्य दाखविलें असेंच म्हटलें पाहिजे. संरक्षण दैवानें केलें तरच होतें, नाहीं तर मानवी प्रयत्नानें कितीहि किल्ले अगर तटबंदी बांधली तरी उपयोग होत नाहीं हें दाखविणारी ती घटना होती.

किती उत्साहानें आणि किती आनंदानें साताऱ्याहून पुण्याचा प्रवास मीं केला होता. दि. २८ एप्रिल १९५२ ला संध्याकाळीं साताऱ्च्या कन्याशाळेच्या नवीन इमारतीचें उद्‌घाटन केलें होतें. वयोवृद्ध कर्मयोगी अण्णासाहेब कर्वे व अन्य कार्यकर्ते यांच्या संगतींत त्या दिवशींची दुपार घालविली होती. साताऱ्च्या समाजांत जे श्रेष्ठ व ज्येष्ठ होते त्यांत मी तीन चार तास वावरत होतों. समाजांतील नीतिमत्ता कशी सुधारेल याबद्दलचीं माझीं आगाऊ व आग्रही मतें त्या चर्चेंत मीं प्रतिपादलीं होतीं. त्याचप्रमाणें निघण्यापूर्वीं आजारी असलेल्या भागिनीस भेटलों असतां 'ही आपली शेवटची भेट' या तिच्या शब्दांना उत्तर म्हणून मी म्हटलें, "होणाऱ्या नातवंडाची मुंज झाल्याशिवाय तूं जाणार नाहींस, अशी बंदी यमाला घालतों." जणूं कांहीं यम म्हणजे बांधकाम खात्यांतील चौथ्या श्रेणींतील कामगारच मी समजत होतों! जुन्या तऱ्हेच्या त्या माउलीला भावाबद्दल एरवींसुद्धां कौतुक वाटत होतें, व वरील वाक्यानें मी तसें कांहीं करूं शकेन अशी जरी तिची खात्री झाली नसली तरी आपला भाऊ विनोदी तरी खास आहे असें तिला नक्की वाटलें असलें पाहिजे. निघतांना जेव्हां मी नमस्कार केला तेव्हां 'शतायु हो' हा तिचा आशीर्वाद थोड्याच तासांत कसाला लागणारा होता याची जाणीव आम्हां दोघांनाहि नव्हती.

संध्याकाळीं साताला निघून तीव्र गतीच्या मोटरीनें मी पुण्याकडे परतलों. मध्यरात्रीची मेल गांठावयाची होती, व दुसऱ्या दिवशीं भरणाऱ्या हैद्राबादच्या बृहन्महाराष्ट्र परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारावयाचें होतें. आणि वेगानें चालणाऱ्या मोटरींत तितक्याच जोरानें दुसऱ्या दिवसाच्या

भाषणाचा आराखडा मनांत तयार करीत होतों. संध्याकाळचा समय, पराक्रमी सातारा जिल्ह्यांतून डोंगरांतून व डोंगरांच्या बाजूनें प्रवास चालू होता. मन कधींच स्वस्थ बसत नाहीं; आणि त्या दृष्टीनें अनेक विचार मनांत येत होते व जात होते. परंतु पुढील गोष्टीची पडछाया विचार चालू असतांना दिसली नाहीं. कांहींच सूचक असा अपशकुन झाला नाहीं. माझा असा ठाम सिद्धान्त आहे कीं, आपण जें करीत आहों तें सत्कार्य आहे, आणि म्हणून विलंब लागला तरी विफलता ही कधींच आपल्याला भेटणार नाहीं.

> गेल्या कैक वर्षांच्या विविध अनुभवांत मांजरें व माणसें आडवीं व उभीं गेलीं. पक्ष आणि पंथ तिरपे व तिरकस दिसले तरी पुढचें पाऊल कोणींच अडथळिलें नाहीं. हा अहंकार अनेक वेळां नडला असला तरी त्यानें माझी व मी त्याची अद्यापीहि साथ सोडली नाहीं. घाटांतून व सामान्य रस्त्यांतून, चढणीवरून व उतरणीवरून मोटरची गति सुरक्षित प्रवासासाठीं कमीजास्त करावी लागते. परंतु जीवनयात्रेंतील हा साथी व सारथी झालेला अहंकार,—त्यानें कधीं सुरक्षिततेकडे लक्ष दिलें नाहीं व प्रस्थापित मार्गनीति जुमानली नाहीं !

नाना विचारांचीं वलयें उडवीत व उल्हासित करीत करीत रात्रीं दहाच्या सुमारास मी पुण्याला परतलों. सुमारें दोन अडीच तास मी पुण्यास काढले. कांहीं खाजगी, कांहीं सरकारी टपाल पाहून निकालीं लावलें, व गाडी वेळेवर गांठण्यासाठीं स्टेशनवर निघालों. गाडींतून जाणारा हा प्रवासी साधा नव्हता; म्हणूनच स्टेशनवर अनुरूप अशी पोलीस-व्यवस्था पण होती. नेहमीं येणारी मद्रास मेल खडकीस कांहीं अपघात झाला म्हणून एक तास उशिरां येईल ही पहिली सलामीची वार्ता कळली. एक तास प्लॅट-फॉर्मवर काढण्याचें ठरविलें. तेथेंच खुर्च्या आणल्या गेल्या. मी व मजबरो-बरचे आणखी दोघे तिघे खुर्च्या टाकून बसलों. सुमारें तासांत गाडी आली, व रिझर्व केलेल्या पहिल्या वर्गाच्या डब्याची पाहणी ' संरक्षण 'शाखेच्या पोलिसांनीं केली. थोड्याच वेळांत माझा बिछाना, कपड्याची पेटी,सरकारी गुप्त कागदांची पेटी हें सारें सामान ठेवण्यांत आलें. एक-दोन मिनटांत मीहि आंत गेलों. मध्यरात्र उलटून गेली होती. दोन्ही दारांवरील सूचना लक्षांत घेऊन

मीं बोल्ट लावले. दोन्ही बाजूंच्या खिडक्या बंदच होत्या, म्हणून त्यांकडे बघितलें नाहीं. शिवाय बघितलें असतें तरी मी त्या उघड्याच ठेवल्या असत्या. दिवस उन्हाळ्याचे, इंग्रजी पंचांगाप्रमाणें ता. २९ एप्रिलचा दिवस सुरू झाला होता. त्या दिवसाच्या नशिबांत काय होतें तें त्या बिचाऱ्यालाहि माहीत नसावें. कोणती तरी मोठी घटना व्हावयाची असली म्हणजे सृष्टि पण अपरिचित रूप धारण करते. वारा व वावटळें उठतात. राजा मरावयाचा असल्यास आकाशांत धूमकेतु उमटतो, नाहीं तर पृथ्वीवर कुत्रीं रडतात. आकाश निरभ्र होतें, गाडीच्या गतीशिवाय आवाज ऐकूं येत नव्हता. दोनचार मिनिटांत मीं कपडे काढून खुंटीवर ठेविले. मुख्य दिवा मालविला व कोपऱ्यांतील मंद निळसर असा दिवा लावून मिनीट–दोन मिनिटें अनंत काळांत उभा झालेल्या त्या दिवसांतील घटनांचें क्षणभर सिंहावलोकन केलें. सामान्यतः निजण्यापूर्वी तास अर्धा तास कांहीं तरी उत्कृष्ट साहित्य वाचावयाचें असा माझा नियम असे व आहेहि. मध्यरात्र उलटून एक तास झाला होता. जवळजवळ दोनशें मैलांचा मोटरचा प्रवास केला होता म्हणून जणूं कांहीं थोड्याच वेळांत होणाऱ्या अशिष्टांच्या आगमनासाठीं आगाऊच अनध्याय घडत होता! तथापि मिनिटा दोन मिनिटांत हें सिंहावलोकन संपलें, व दैवानें आणलेली या जगांतील 'ती' रात्र व दैवानेंच टाळलेली शेवटची निद्रा घेण्यास तयार झालों. डोक्यावरील राजमुकुट म्हणजे मनावरील ओझें ही गोष्ट माझ्या बाबतींत खरी नव्हती. सार्वजनिक चिंता माझ्याप्रमाणें सर्वांनाच होती, म्हणून मंत्रिपदाच्या कारकीर्दींत झोंप नाहीं असें कधींच झालें नाहीं. नित्य चिंता व व्यग्रता यामुळें सहज स्थितप्रज्ञता आली होती, आणि त्यामुळें विजेचें बटन सरकल्याबरोबर जसा दिवा जातो त्याचप्रमाणें बिछान्यावर पाठ ठेवतांच निद्रावश झालों.

निद्रेंत मानवी मन स्तब्ध व स्वस्थ नसतें, तथापि पंचेंद्रियांचीं कामें तें करीत असतें असें म्हणतात. एक गोष्ट निश्चित कीं, त्या दिवशीं मनानें शरीराबाहेर व भोंवतीं काय होत आहे याची दखल घेतली नाहीं. अत्यंत सावध अशी माझी झोंप असूनहि ज्या घटना होत होत्या त्याच्या आवाजानें मी जागा झालों नाहीं. कदाचित् गाडीच्या आवाजांत तो आवाज मिसळून गेल्यानें तसें झालें असेल.

पुण्याहून निघालेली मेल दौंडला खास थांबली असेल; तथापि त्या भयंकर क्षणापर्यंत मी व निद्रा सायुज्य अवस्थेंत होतों हें खरें. डब्यांतील पंख्याचा गार वारा झोपेची पाठराखणी करीत होता. डब्यांतील वरच्या कोपऱ्यांतील मंद दिवा जणूं कांहीं होणाऱ्या घटनेची पार्श्वभूमि निर्माण करून मिस्किल साक्षीदाराप्रमाणें स्तब्ध होता. कांहीं तरी सुखमय विचार मनांत चालले असावेत. स्वप्नांतील विचारहि अनुरूप अशा शारीरिक हालचालींतच होतात म्हणूनच असेल कदाचित्, एरवीं या नाहीं त्या कुशीवर निजणारा मी उताणा झालों होतों. माझें मन काय पहात होतें हें आतां स्मरत नाहीं. त्या क्षणाचे विचार आतां आठवत नाहींत. नाहीं तर त्यांना मीं साहित्यांत खास अमर केलें असतें ! आणि अशा त्या स्थितींत ब्राह्ममुहूर्तावर, दोन्ही खांद्यांवर कांहीं तरी जड लागल्यासारखें वाटलें. क्षणांत माझी निद्रा उडाली, आणि मीं डोळे उघडले. तोंडाजवळ एक व्यक्ति कपाळ, डोळे, नाक, तोंड एवढा भाग आच्छादिलेली, व दोन्ही धष्टपुष्ट असे हात माझ्या खांद्यावर ठेवून 'पैसा किधर है ?' म्हणून बोलली. दृष्टीनें व श्रुतीनें क्षणांत प्रसंगाचें रूप मनापुढें उभें केलें. खांद्यावरील दोन्ही हातांच्या गतीनें संकटाच्या शक्तीचा अंदाज उभा केला. आणखी अर्ध्या क्षणांत थोडीशी वांकलेली व तशाच काळसर वस्त्रानें कपाळ, डोळे, नाक, तोंड झाकलेली, आणि हातांत सुरा घेतलेली व्यक्ति 'बोलो, पैसा किधर है ?' असें बोलत असलेली मीं पाहिली. मनुष्य मनुष्यापासून ओळखण्याचीं साधनें कपाळ, डोळे, नाक, ओठ, हनुवटीची रचना इ० खाणाखुणा होत. त्या काळसर वस्त्रानें नाहींशा केलेल्या दिसत होत्या. दिवा व मी यांमध्यें ते दोघे उभे असल्यानें प्रकाश असूनहि अंधकार वाटत होता. क्षण – दोन क्षण मन निर्णय करीना. अकल्पित व असामान्य काल, वस्तु, व्यक्ति – या तिन्ही दृष्टींनीं तें असें घडत होतें.

ज्यानें सबंध आयुष्यांत कोणावरहि शब्दाच्या फटकाऱ्यापलीकडे वार केला नव्हता, ज्यानें जन्मभर हृदयपरिवर्तनावर श्रद्धा ठेवून मतें व मनें जिंकलीं होतीं, ज्यानें श्रद्धेनें जरी तितकेंसें नसलें तरी व्यवहाराच्या दृष्टीनें अहिंसा स्वीकारली होती, त्या व्यक्तीच्या मृत्यूसाठीं तोंड झाकलेल्या, सुरा घेतलेल्या, अंधारांत काम करणाऱ्या व्यक्ति यमानें निवडाव्या ना ?

डोळ्याला डोळा भिडला असता तर अधिकारी दृष्टीला ते नमले असतें; आणि ते शस्त्ररहित आले असते तर कदाचित् वाणीविलासाला भुलून परत गेले असते. मला वाटतें, नचिकेताच्या वेळीं केलेली चूक पुन्हा करावयाची नाहीं याच निश्चयानें स्वतः न येतां या आधुनिक व अभिनव दूतांना यमानें धाडलें असावें.

सिद्धान्तासाठीं हिंसा प्रतिपादणारा, व्यवहारांत अहिंसाच असावी असें म्हणणारा, व सिद्धान्ताविषयीं संशयवादी असा असल्यामुळें हिंसात्मक प्रतिक्रियेची शक्यताच तेथें नव्हती. दूत अडाणी व अज्ञानी नेमल्यामुळें वादविवाद करून मी त्यांचें मन वळवीन हेंहि शक्य नव्हतें. आणि म्हणूनच यमाच्या योजनेचें औचित्य ठळकपणें दिसत होतें.

पुन्हा दोन्ही व्यक्तींनीं 'पैसा किधर है, तब्रा करेंगे—' अशी भविष्यवाणी श्रुतिपथावर घातली. 'पैसा नहीं है। क्या कर रहे हो?' म्हणून मीं त्यांना हटकलें!

पुष्कळ वेळां आपण काय करणार आहोंत याचा आपल्यालाच पत्ता नसतो; आणि मग भोंवतालच्या घटनेमुळें आपल्या मनावरील प्रतिक्रिया हसण्यानें, अगर रडण्यानें, अगर शब्दांनीं बाहेर पडतात; आणि त्यांतूनच आपली पुढील कृति जन्म घेते. येथेंहि असेंच झालें. ही घटना झाल्यानंतर अनेकांनीं लक्ष्मीधराच्या नीतीचा अवलंब कां केला नाहीं, आणि तीच नीति खरोखर व्यवहारी होती असें सांगितलें होतें. तो मार्ग त्या वेळीं मला सुचला नाहीं हें खरें! दागिन्याची पेटी पण मजपाशीं नव्हती! किंबहुना ते मागत असलेले पैसे मजजवळ नव्हते. तथापि खरें असें आहे कीं, माणसाच्या ज्या उपजत गोष्टी शिक्षणानें व संस्कारानें आकार घेत जातात त्याच प्रसंगीं उफाळून येतात. 'क्या कर रहे हो?' हें वाक्य संपतांना मीं काय करावें हें मेंदूनें ठरविलें, आणि झटकन् सुरा धरलेल्या माणसाचें मनगट धरलें.

त्यानें आपलें मनगट व मनगटांतील सुरा खालीं रेटण्याचा प्रयत्न चालविला होता, व मी विरोध करीत होतों. या सुऱ्याच्या टोकांतून ओळंबा टाकला असता तर नक्कीच पोटांत गेला असता. तारुण्यांत थोडी मल्लविद्या अवगत केली असल्यानें — आपला प्रतिकार अयशस्वी झालाच तरी सुरी लागूं नये म्हणून शरीर डाव्या कुशीवर वळविलें, आणि त्याचा परिणाम म्हणूनच कीं काय ज्यानें माझ्या खांद्यावरती हात ठेवले होते त्यानें चटकन् मला

खालीं ओढलें. माझ्या हातांतून त्याचें मनगट सुटलें, पण त्याच्या सुऱ्याच्या मारांतून मी निसटलों, आणि डाव्या हाताला नाममात्र जखम करण्याचें श्रेय त्याच्या पदरीं पडलें.

आतां बर्थवरून मी खालीं पडलों होतों, आणि तोंड खालीं व पाठ वर अशी देहाची स्थिति झाली होती. क्षणांत मी उठून उभें राहण्याचा प्रयत्न केलेला पाहतांच त्यांनीं अशी जबरदस्त लाथ मारली— ती नाकावर बसली व रक्त वाहूं लागलें. तसाच ‘क्या कर रहे हो?’ असें दोन-तीनदां मी ओरडलों. तेवढ्यांत उशाशीं असलेला खादीचा शर्ट घेऊन त्यांनीं माझें तोंड दाबलें. गरीबांचा उद्धार करणाऱ्या, निर्धनांना सधन करणाऱ्या, अन्यायाला वाचा फोडणाऱ्या खादीनें माझी वाचा बंद केली, आणि जें अल्पस्वल्प जिव्हेचें बल होतें तेंहि निर्बल करून टाकलें. तथापि मोकळ्या असलेल्या हातांनीं तें मोकळें करण्याचा विचार माझ्या मनांत येण्यापूर्वीच माझ्या हातरुमालानें माझे दोन्ही हात त्यांनीं माझ्या पाठीशीं बांधले. आतां डोळे असून दिसत नव्हतें; कारण जमीन व डोळे यांत नाममात्र अंतर होतें. कार्यप्रवण हात आतां बंदिस्त झाले होते. गति देणारे पाय भूमिगत झाले होते. ओरडून ओरडून कांहीं करणें अशक्य झालें. डोळ्यानें धाक देणें अगर इशारा देणें हेंहि शक्य नव्हतें. या सर्व गोष्टी दहा–पांच क्षणांत झाल्यामुळें – व इतक्या जलद झाल्यामुळें या चित्रपटांत आणखी काय आहे याची कल्पना येईना. रडण्याची सवय नव्हती, आणि रडूनहि कांहीं होणार नव्हतें. लोकशाहीमधील जन्मसिद्ध हक्क ‘ओरडणें’ किंवा ‘शंख करणें’; त्यावर पण आतां गदा आली होती. करावेंसें वाटे, आपली प्रतिष्ठा, आपला अधिकार यांच्या जाणीवेनें तर खासच कांहीं तरी करावेंसें वाटे. पण करण्यासारखें कांहीं सुचत नव्हतें. पाठीशीं हात, तोंड संपूर्णपणें बांधलेलें, अशा स्थितींत एरवींसुद्धां हालचाल करणें कठीण,– मग दोन यमदूत हजर असतांना तें किती कठीण होतें ह्याची कल्पनाच केली पाहिजे. कांहीं तरी करण्याचा माझा विचार होता, परंतु थोडीशी हालचाल सुरू करतांच त्यांपैकीं एकानें पुन्हा एवढी जबरदस्त लाथ मानेच्या वरच्या बाजूस मारली कीं क्षणभर डोळ्यापुढें काजवे चमकले !

भारत सरकारच्या चौदा मंत्र्यांपैकीं एक, भारत सरकारच्या मालकीच्या आगगाडींत, संरक्षणासाठीं दोनचार अधिकारी व दहा–पांच शिपाई असतांना–

या स्थितींत सांपडला. विक्रम राजा उकिरड्यावर पडला. त्याचे हातपाय तोडले गेले,—तरी त्याच्या जिवावर बेतलें नव्हतें—असें शनिमाहात्म्य सांगतें!

नाकावरील लाथेनें त्यांनीं माझ्या मनांतील प्रतिष्ठेलाच धक्का दिला होता. आणि तशी लाथ मारून कदाचित् हाच उद्देश दैवाला साधावयाचा असेल. श्रीविष्णूनें भृगूची लाथ हृदयावर घेऊन तें लांछन मानलें. मग मी तरी या वाइटांतून चांगला अर्थ कां घेऊं नये? भृगु विद्वान् ब्राह्मण होता, व भगवान् विष्णु धातृशक्ति होती. आतां लोकशाही युगांत राजसत्तेला लाथ मारण्याचा अधिकार सर्वसामान्य व्यक्तीला नाहीं का आलेला? आतां हा अधिकार थोड्यांचा राहिला नसून तो जनतेचा झाला आहे. कदाचित् जें झालें तें त्याचेंच निदर्शक आहे कीं काय याचा विचारहि मनांत येऊन गेला. चोरांनीं नाकावर व डोक्यावर लाथ मारली याचा अर्थ चालू जमान्यांत प्रतिष्ठा व बुद्धि हींच महत्त्वाचीं स्थानें आहेत हेंच स्पष्ट झालें. खरें सांगावयाचें म्हणजे नाकांतून वाहणाऱ्या रक्ताला अथवा डोक्यावरील लत्ताप्रहारानें शरीरापेक्षां मनालाच अधिक दुःख झालें, व मनाची जखम अधिक खोल पोंचली. ज्यानें अनेकांना अभय दिलें तो शरणागत असून, त्यास अभय देणारा कोणी नव्हता. मन वाटेल तें करावयाला तयार होतें, पण शरीर चैतन्यरहित केलें होतें. पुढच्या क्षणीं काय होणार हें मीं ठरवूं शकत नव्हतों. मी कोण? कोठें आहे?— स्थळ व काळ याची आतां मनांत गल्लत होऊं लागली. कंटकशल्यें मावळलीं नव्हतीं. अशा कांहीं तरी विलक्षण परिस्थितींत दोन चार क्षण जातात न जातात तोंच गळ्याभोंवतीं कापडाचें वेटोळें पडलें, आणि दोन्ही बाजूंनीं दोघेजण ओढत आहेत याचा साक्षात्कार झाला. कोणतें ताट पुढें वाढून आलें आहे याची झटकन् कल्पना आली. सत्यवानास रेड्यावर बसवून त्याचे प्राण यम ओढीत आहे हें पुराणांतून वर्णिलेलें चित्र डोळ्यांपुढें आलें. आणखी हेंच अर्धा क्षण... आणि गळा अधिक अधिक दाबला जाऊं लागला. ही फाशी होय हें उघड उघड दिसूं लागलें. तसें म्हटलें तर स्वातंत्र्याच्या चळवळीच्या काळांत देशासाठीं फाशीं जाण्याची कल्पना अनेकांना रम्य व आकर्षक वाटत असे, अनेक देशभक्तांनीं असला मृत्यु येऊन 'शहीद' बनावें अशा महत्त्वाकांक्षेचीं काव्यें गायिलीं होतीं. नशिबानें गळ्यांत पुष्पहार घालण्याचें ठरविलें असतां आझादीसाठीं आपण त्याऐवजीं फांस पत्करावा असें सांगणारे कवि बिस्मलचें

काव्य कोण विसरेल! परंतु ही फाशीं देशासाठीं थोडीच होती? देशासाठीं फाशीं जाण्याचा काळ केव्हांच भूतकाळांत जमा झाला होता. आतां देशासाठीं जगून देश संपन्न करावयाचा काळ आलेला होता. कित्येक योजना व्यवहारांत उतरत होत्या, तर कित्येक गेलीं पांच वर्षें मनांत रंगत रंगत आकार घेत होत्या. निवडणुकींतील लक्षावधि मतांनीं मनांत लोकप्रियतेचा अहंकार सिंहासनस्थ झाला होता;—आणि हा काय प्रसंग उभा होता! कोण कुणाला फाशीं देण्यास उद्युक्त झाला होता! क्षणाला युग मानलें तर त्या युगाच्या क्षणांत केवढें प्रचंड घडून येत होतें. आणखी क्षणार्ध ...... आणि आतां श्वासोच्छ्वास घेणें अशक्य झालें. डोळे उघडे होते, अन् तल्लख होते. पण मी काय पाहात होतों, अन् काय ऐकत होतों! जीवन—मृत्यूमधील सीमा आतां मनाच्या पायाखालीं आली होती, व ती ओलांडण्यासाठीं पाऊलहि उचललें होतें. मनानें आपला अंत आला हें जाणलें; जन्मभर ज्यांना पूजिलें, ज्यांना स्मरलें, ते देव अगर दैवतें कुणी डोळ्यांपुढें आलीं नाहींत. मनाला त्यांचा विचारहि शिवला नाहीं.

कफ-वात-पित्त यांनीं कंठाचें अवरोधन केलें नव्हतें, तथापि हरीचें स्मरण झालें नाहीं. अठ्ठावीस वर्षें ज्या व्यक्तीनें जीवनयात्रेंत साथ दिली तिची आठवण झाली नाहीं. तिची जागा भरून काढणाऱ्या व्यक्तीचीहि आठवण झाली नाहीं. ज्यांना जन्माला घालण्यास कारणीभूत झालों त्यापैकीं कुणाचीहि आठवण झाली नाहीं. जणूं कांहीं सर्व मायापाशापासून मी मुक्तच झालों होतों. आपल्यामागें कोणाचें काय होणार हा विचारहि शिवला नाहीं. इहलोकींचा मी व नंतरचा मी यांमध्यें अगदीं क्षणाचाच अंतरपाट उरला होता. मन जागृत होतें. कारण एक एक विचार त्यांत उत्पन्न होत होते. अनेकांचे मृत्यु मीं पाहिले होते. अंतकाळीं काय होतें याची जाणीव मला होती. येथें नाडी व्यवस्थित होती. उचकी गैरहजर होती. मृत्यूचीं सर्वसामान्य लक्षणें नसतांहि मृत्यु उभा होता. जीर्ण न झालेलें वस्त्र टाकून नवें घेण्याचा आग्रह दैव करीत होतें.

दिवा विझत विझत जातो तसेंहि येथें नव्हतें. पण तो जाणार येवढें नक्की दिसत होतें. आतां वरचा श्वास वर, खालचा खालीं! कांहीं विलक्षण दाब गळ्यावर बसूं लागला!—आणि डोळ्यापुढें येरवडा जेलमधील 'अंधारी' आठवली.

या जेलच्या अंधारी हा भाग मुख्य तटापासून सुमारें तीस फूट अंतरावर आहे. मुख्य तटाला लागून फाशीघर आहे. फाशीघराचा दरवाजा व अंधारीची भिंत यांत १० फुटांचें अंतर आहे. अनेक वेळ मी व अन्य राजबंदी या अंधेरींत राहिलों होतों. सामान्यतः आमच्या मुक्कामांत अनेकांना फाशीं दिलेलें आम्हीं पाहिलें होतें. सकाळीं फाशीं जाणारा इसम 'कन्डेम्ड सेल'मधून निघे, व सुमारें पन्नास फूट अंतर चालून फाशीघराच्या दरवाजांतून आंत जाई. जातांना बहुशः 'राम', 'राम' म्हणत जाई. दरवाजा उघडण्याचा आवाज व क्षण–दोन क्षतांण 'खट्' म्हणून तक्त्याचा आवाज,—आणि – संपलें ! असा क्रम असे.

तो सर्व देखावा डोळ्यांपुढें आला आतां. 'खट्ट' व्हायचें बाकी राहिलें आहे, याची जाणीव झाली. संपलें; जीवनयात्रा संपली. आनंद अगर दुःख कांहींच वाटलें नाहीं. गळ्याभोंवतींचा ताण अधिक घट्ट झाला. जाणीव मालवूं लागली,–आणि येवढ्यांत लेखाच्या सुरुवातीचे शब्द कोणी प्रत्यक्ष कानाशीं बोलत आहे असें वाटलें. तेथें कोणीच नव्हतें, म्हणजे हे शब्द बोलणारें कोणीच नव्हतें. मावळत चाललेल्या जाणिवेच्या स्थितींत मन त्या शब्दांना किंमत देईना; कारण प्रत्यक्ष त्या शब्दाविरुद्ध नाचत होतें. 'हें तुझें मरण नाहीं, असें तुझें मरण नाहीं—' कोण हें सांगत आहे, व कशासाठीं, आणि त्याचा आतां काय उपयोग? दांडी पडल्यावर अंपायरनें 'नो बॉल' सांगण्यांत काय रहस्य आहे? मनाची ही प्रतिक्रिया अशी एकीकडे होत आहे व दुसरीकडे गळ्यावरील दाब वाढत आहे.

त्या क्षणाला पुन्हा त्याच आवाजांत ते शब्द "हें तुझें मरण नाहीं, असें तुझें मरण नाहीं!" अधिक स्पष्टपणें ऐकूं आले, आणि मन त्यावर कांहीं विचार करणार– येवढ्यांत गळ्यावरील दाब कमी झाला! कारण त्याच क्षणीं 'गाडी ठेरती आहे' असें त्यापैकीं एकजण उद्गारला, आणि दोघांनींहि तें वस्त्र हातांतून सोडलें.

अर्थात् गळ्याभोंवतीं तें सैल झालें यावरून मीं तें अंदाजलें. आणखी एक क्षण... डब्याचा दरवाजा उघडल्याचा आवाज ऐकूं आला. गळ्याभोंवतींचें वस्त्र सैल होतांच जाणीव झाली कीं मरण टळलें! तथापि कांहीं हालचाल केल्यास हल्ला करणारे आणखी कांहीं करतील म्हणून थांबलों. त्यांच्या हालचाली दिसत नव्हत्या. पण श्रवणेंद्रियांत सर्व जीवनाची शक्ति एकवटली

होती. समोर मृत्यु येऊन पाठमोरा झाला होता. गिऱ्हाइकाला सौदा पटला नाहीं म्हणजे तें निघून जातें तसें झालें होतें. दैवाला काय वाटलें असावें कोणीं सांगावें? गाडीनें मृत्यूला सावरून धरले. 'बुडत्या धाविन्नली नदी' असें झालें. हा पाहुणा आला कां आणि गेला कां हें कोडें कळणार नाहीं—व उलगडणार नाहींच नाहीं. डब्याचें दार बंद झाल्याचा आवाज मीं ऐकला आणि पडलेल्या स्थितींतच मान वळवून मागें पाहिलें. कंपार्टमेंटमध्यें आतां कोणी नव्हतें. आणि मग जनावराप्रमाणें तोंड डब्यांतील तक्त्यावर घासलें. तोंडावर बांधलेला शर्ट बाजूला केला. पाठीशीं बांधलेले हात अर्ध्या मिनिटांत रुमालांतून सोडवून घेतले आणि उभा राहिलों. बिछाना अस्ताव्यस्त झाला होता. कपडे व कागद इतस्ततः पडले होते. तात्काळ धोक्याची साखळी ओढली. तसें म्हटलें तर धोका संपला होता. क्षणांत गाडी थांबली.

संरक्षणासाठीं असलेले अधिकारी व शिपाई गाडींतून पटापट उतरून डब्याजवळ आले, व हल्ले करणारांचा शोध करण्याऐवजीं आपल्या नोकरीवर काय संकट आलें याचीच काळजी प्रदर्शित करूं लागले. गाडींतील गार्ड, गाडींत अगर गाडीखालींच कुठें चोर लपले असतील म्हणून शोध करूं लागले. कोणी सांपडलें नाहीं. गाडी चालूं लागली. कुर्डुवाडी येईपर्यंत डब्यांतील पोलीस अधिकारी – कसें घडलें यासंबंधींच चौकशी करीत होते. पैशाचें पाकीट – ज्यांत दोन रुपयेसुद्धां नव्हते – तें नाहींसें झाल्याचें आढळून आलें. तसेंच फाउंटन पेन – ज्यानें साहित्य व राज्यकारभार या दोन्ही क्षेत्रांत माझी सेवा केली होती – तेंहि गेलें होतें. घड्याळ उशाशीं होतें. आणि कदाचित् त्यामुळेंच मी काळ-प्रसंग उमगूं लागलों असतों तेंहि गेलें. कुर्डुवाडी येईपर्यंत काय झालें या घटनेवर विचार करीत होतों. प्रतिहत झालेल्या मनाची उत्तरक्रिया मनच करीत होतें. हळूहळू आपण केवढ्या प्रसंगांतून वांचलों याची संपूर्ण कल्पना येऊं लागली. उजव्या बाजूच्या खिडकींतून नवोदित दिवसाचा भानु हळूहळू वर येत होता.

शरीरावरील जखमेचा ठणका होताच, पण मनाचाहि कांहीं कमी नव्हता. कुर्डुवाडी स्टेशनावर झालेल्या गोष्टीची कीर्ति आगाऊच कळली होती. डॉक्टर व आणखी कांहीं इसम डब्यांत आले. त्यापैकीं एकानें केस कशी तयार करावी आणि कशी रंगवावी हेंच सांगितलें. आणि त्या परिस्थितींतहि मला त्यानें नकळत केलेल्या विनोदानें हसूं आलें. कोणी चहा

आणून दिला. प्रत्येकजण सेवेची संधि मिळाली म्हणून धन्यता प्रकट करूं लागला. माझ्या दुर्दैवानें त्यांना त्याहिपेक्षां अधिक व अखेरची सेवेची संधि देतां आली नाहीं याचें क्षणभर दुःख झालें. एकच घटना अनेकांच्या प्रकृती-नुरूप परिणाम करीत असते हेंच खरें. कोणी हा एक ' राजकारणी स्टंट होय ' असें म्हणाले. आरोपींच्या वकीलानें तर " तुमच्या राजकीय शत्रूचें हें काम आहे असें नाहीं का वाटत ? " म्हणून प्रश्नहि विचारला. आणि " माझे राजकीय शत्रु आणि विरोधक हीं सभ्य माणसें आहेत " असें मींहि सांगितलें. मैत्रीचें द्योतक म्हणून मिळालेलें घड्याळ परत मिळणार याचा आनंद – चोर सांपडून शिक्षा झाली यापेक्षां अधिक वाटला. केव्हढी जबरदस्त किंमत मीं दिली.

पण त्याहिपेक्षां ज्या प्रान्तांत गेलेला मुशाफिर परत येत नाहीं, व तो प्रान्त कसा आहे हें सांगूं शकत नाहीं त्या प्रान्ताच्या सीमेंत जाऊन – निदान एक पाऊल टाकून न्याहाळून मी परत आलों होतों. श्रुति शाबूत होती, मृत्यूची चाल व गति मीं ऐकली. उघड्या डोळ्यांनीं मी त्याला व त्यानें मला पाहिलें. संताची कणमात्र योग्यता नसतां ' आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां–' म्हणूनच काय तो सोहळा मीं वर्णन केला आहे.

सेशन्स कोर्टांत पंचांसमोर प्रथम निवेदन केलें, व निवेदन संपतांच पंच-प्रमुख कोर्टाच्या आवारांत हें जग सोडून निघून गेला ! असा हा साराच विलक्षण प्रकार !

या घटनेनंतर अनेक मित्रांचीं मला पत्रें आलीं, व त्यांत कांहींनीं हा प्रसंग वर्णन करावा असें सुचविलें. ' हें तुझें मरण नाहीं, असें तुझें मरण नाहीं—' हे शब्द मीं प्रत्यक्ष ऐकले, – हा अनुभव मोठ्या तत्त्वज्ञांशीं चर्चिला. कोणीं मनाचा भास म्हणून निकालांत काढलें, कोणीं त्यांत अपौरुषेय शक्ति आहे असें श्रद्धेनें सांगितलें. माझ्या श्रद्धेवर तिचा काय परिणाम झाला हें गुह्य मीं माझ्यासाठींच राखून ठेविलें आहे. पण मरण पाहण्याचा हा सोहळा अशक्य कोटींतील होय, म्हणूनच तो वाचकांना विश्वासांत घेऊन मीं श्रद्धेनें व आपुलकीनें सांगितला आहे;—व पाहिलेल्या मरणाचा जणूं कांहीं मृत्युलेखच संपादकांऐवजीं मीं लिहिला आहे !

• • •

